199

# चित्पावन



लेखक

**नारायण गोविंद चापेकर**

'बदलापूर', 'एडमंड बर्कचें चरित्र', 'पैसा', 'गच्चीवरील गप्पा', 'वैदिक निबंध', 'समाजनियंत्रण', साहित्यसमीक्षण', 'निवडक लेख', 'पेशवाईच्या सावलींत' इत्यादि पुस्तकांचे कर्ते

शक १८६०

किंमत तीन रुपये

आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २



# प्रस्तावना

चापेकर घराण्याचा इतिहास लिहिण्याचा मूळ हेतु. परंतु योगायोग असा की, मूळ हेतु बाजूस राहून चित्पावनविषयक संशोधनपर ग्रंथ पुढे येत आहे.

चित्पावनांच्या इतिहासास ग्रंथ, कागदपत्र वगैरेसारखी लेखनिविष्ट सामग्री मिळण्यासारखी नाही. चित्पावन ही एक कुतूहलास्पद जात आहे ह्यांत शंका नाही. अनेक शतकें कोंकणांत ताकभात खाऊन कालक्रमण करणारे हे चित्पावन पेशवाईत धूमकेतूप्रमाणे एकदम उदयास कसे आले हें कोडें आनुवंशिक शास्त्रज्ञांस उलगडतां न येण्यासारखें आहे. शौर्य, मुत्सद्देगिरी, बुद्धिमत्ता या गुणत्रयींत तत्कालीन इतर समाज ह्या 'पाणक्या' समाजाने निस्तेज केले ह्यांत संशय नाही. पेशवाईचा अंत झाल्यावरहि आजवर उपर्युक्त गुणांनी चित्पावनांनी सर्व हिंदुस्थानावर आपली छाप बसवली होती. आता मात्र वाऱ्याची दिशा बदललेली स्पष्ट दिसत आहे. अशा ह्या समाजाचा पूर्वेतिहास बराचसा कल्पनेवर अवलंबून राहावा ही अत्यंत खेदाची गोष्ट होय.

प्रस्तुत विषयासंबंधीचें संशोधन मुख्यत्वेंकरून कुलस्वामींवर आधारलेलें आहे. ह्यावरून कुलस्वामींचें महत्त्व ह्या विषयापुरतें तरी फार आहे हें उघड आहे. कुलस्वामींची माहिती लोकांनी पुरविल्यावांचून मिळण्या-सारखी नाही. आमच्याकडे तर सुशिक्षितांतहि शास्त्रीय बुद्धीचा उदय अद्यापि झालेला नाही. म्हणून नागपूरचे श्री. वासुदेवराव चितळे किंवा

मिरजेचे श्री. दामोदरपंत भट ह्यांना एतद्विषयक माहिती मिळवितांना आलेल्या कटु अनुभवाबद्दल आपणांस कितीहि वाईट वाटलें तरी आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. ज्या अज्ञानी लोकांना विषयाचें महत्त्व आकलन करण्याचें बौद्धिक सामर्थ्य नाही त्यांना हा नसता उपद्व्याप वाटला तर त्यांत नवल तें काय ! तेव्हा भरपूर माहिती मिळाली नाही ह्याचा शोक करीत न बसतां ज्या अकराशेवर इसमांनी माहिती दिली त्यांचें अभिनंदन करणेंच युक्त आहे.

अलीकडे बऱ्याच चित्पावनघराण्यांचे इतिहास प्रसिद्ध झाले आहेत. परंतु शास्त्रीय अथवा संशोधनाच्या दृष्टीने ते लिहिले नसल्यामुळे त्यांचा म्हणण्यासारखा उपयोग होत नाही. त्यांत आडनांवांचा ऊहापोह नाही; मूळ ठिकाण शोधून काढण्याचा प्रयत्न नाही; कुलस्वामी निश्चित करण्याची कल्पनाहि नाही; नैवेद्यांतील देवतांवरून घराण्याचें परिक्रमण कोणत्या दिशेने झालें हें दाखविलेलें नाही. सारांश, शास्त्रीय दृष्ट्या ह्या कुलवृत्तान्तांना कांही किंमत नाही. आपाततः त्यांतील संकलित माहितीचा उपयोग होईल तेवढाच.

ह्या ग्रंथांतील संशोधन अपुरें आहे ह्याची जाणीव मला पूर्णपणें आहे; तथापि अधिक संशोधनाला प्रस्तुत ग्रंथ जन्म देईल हें तितकेंच निर्विवाद आहे. मीं केवळ मार्ग दाखविला आहे. चित्पावन हा एक स्वतंत्र समाज आहे; देशस्थादि समाजांहून भिन्न आहे; चित्पावन समुद्रावरून येऊन सावित्री आणि शास्त्री ह्या नद्यांच्या मधील प्रदेशांत समुद्राच्या कांठाने त्यांनी प्रथम वसती केली; ते उपासनेने शैव आहेत; ह्या गोष्टी सिद्ध म्हणून मानण्याइतका पुरावा ह्या ग्रंथांत उपलब्ध होईल.

ह्याशिवाय इतर किरकोळ गोष्टीहि कित्येकांना प्रथमच ह्या पुस्तकावरून समजतील. बौधायनसूत्राचा अंमल चित्पावनांत आहे हें फारच

थोड्या लोकांना माहीत असेल. दिवेकर, फफे वगैरेंचा निर्देश पुस्तकांत आहेच. त्या ठिकाणीं केळशीच्या बापटांचा उल्लेख करावयाचा राहिला. आमच्या मतें बौधायनसूत्र चित्पावनांत बरेंच प्रचलित असावें. प्रश्नपत्रिकेंतील चरण ह्या शब्दाचा अर्थ न समजल्यामुळे पुष्कळांनी माहिती दिली नसावी. हिरण्यकेशी सूत्र जेथे अपुरें पडतें तेथे बौधायनाचा अंगीकार करण्याची वहिवाट आहे असें समजतें.

आडनांवांच्या संबंधाने केलेले तर्क हा केवळ कल्पनांचा बाजार आहे असा आरोप करतां येण्यासारखा आहे. परंतु सध्या तरी असें करण्याविना गत्यंतर नाही. निरनिराळ्या कल्पना सध्या वाचकांपुढे मांडणें हेंच आजच्या लेखकांचें काम आहे. उदाहरणार्थ, ६० आडनांवांपैकी ४१ नांवें एकारान्त, १६ अकारान्त, २ उकारान्त व १ इकारान्त अशीं आहेत. ह्यांतील एकारान्त कांही नांवें गांवांवरून पडलीं हें निःसंशय आहे. त्यालाच अनुसरून सर्व एकारान्त नावें गांवांवरून पडलीं असावीं असें सुचविल्यास त्यांत गैर तें काय ! ह्या सूचनेमुळे तरी परांजपे=पारायण—जपे या व्युत्पत्तीवर अढळ न राहतां परांजपे हा गांव कोठे आढळतो काय ह्याचा शोध करण्यास संशोधक प्रवृत्त होतील. काकतकर ह्यांचें पूर्वीचें नांव कागदकर लेखनिविष्ट असल्याचें नुकतेंच समजलें. अशा ह्या लेखनभेदावरूनहि संशोधकाला साहाय्य मिळतें. मांद्रयाचे आचार्य ह्यांनीहि १२५ वर्षांपूर्वीच्या कागदपत्रांत आपलें आडनांव आचारी असें लागलें असल्याचें सांगितलें. ह्यावरून आचारी व आचार्य हीं भिन्न आडनांवें नाहीत हें समजतेंच, पण शिवाय मनुष्याची गौरवोन्मुख प्रवृत्ति दिसून येते.

गोत्रांच्या संशोधनामुळे बाभ्रव्य, विष्णुवर्धन व नित्युंदन हीं गोत्रें चित्पावनांत कोठून आलीं ही विचार करण्यासारखी गोष्ट अभ्यासकांस ह्यांत आढळेल. तसेंच, बाभ्रव्यासारख्या कांही गोत्रांतील लोकसंख्या

गेल्या दोन हजार वर्षांत इतकी अत्यल्प कां राहावी ह्याचा विचार करण्यास समाजशास्त्रज्ञांस भाग पडेल. कुलाचारांच्या नोंदीमुळे बोडण ह्या शब्दाची व्युत्पत्ति आता निःसंदिग्धपणें करतां येण्यासारखी आहे.

भिड्यांच्याप्रमाणे खऱ्यांचा इतिहास फार बारकाईने तपासणें आवश्यक आहे. खरे गुहागरचे. तथापि त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर नाही. हे मूळ द्रविड देशांतून आले अशी समजूत आहे. तेव्हा प्रश्न असा उत्पन्न होतो की, हे आले तेव्हा कोणत्या शाखेचे होते? सध्या सर्व खरे हिरण्यकेशी आहेत. मूळ ते आपस्तंब होते कीं हिरण्यकेशी होते? आपस्तंब असल्यास हिरण्यकेशी कसे झाले? हिरण्यकेशी असल्यास ह्या शाखेचा लोप झाला होता असें कसें म्हणतां येईल? खरे हे मध्यंतरीं ऋग्वेदी झाले होते असें मानण्यास आधार नाही. मग हिरण्यकेशी शाखा त्यांनी कोठून आणली? हे द्राविड प्रथम गुहागरास आले तेव्हा ते ऋग्वेदी होते असेंहि कोणी म्हणत असल्याचें माहीत नाही. खऱ्यांची दंतकथा विश्वसनीय नाही. परंतु ते बाहेरून आले इतकाच ग्राह्यांश त्यांत दिसतो.

चित्पावन म्हटले जाणारे लोक रत्नागिरींतील समुद्रकिनाऱ्यावर अडीच तीन हजार वर्षांपूर्वी आले असावे असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाही. इसवी सनाच्या आरंभीं गुहागरास ब्राह्मणांची वस्ती होती असें ग्रीक लेखकांनी लिहून ठेविलें आहे. त्याच्या अगोदर कित्येक वर्षें तरी ह्या लोकांची तेथे वस्ती असली पाहिजे. गुहागरच्या मागेपुढे राहणाऱ्या लोकांस सुद्धा गुहागरची आठवण राहिली नाही. चित्पावनांच्या वसाहती काशीस, गोंव्याकडे व दक्षिण कारवार येथे आहेत. ह्या सर्व ठिकाणचे लोक चिपळूण तालुक्यांतून तिकडे जाऊन स्थायिक झाले व त्यांस आपण मूळचे रत्नागिरी जिल्ह्यांतील ह्या गोष्टीची स्मृतिहि राहिली नाही. नागांवाकडील लोकांची सुद्धा हीच स्थिति. फार काय, प्रत्यक्ष रत्नागिरी जिल्ह्यांतील लोकां-

नाहि आपल्या मूळ ठिकाणाचें विस्मरण झालें आहे. हा सर्व प्रकार घडून येण्यास फारच काळ लोटला असला पाहिजे हें उघड आहे.

कोंकणांतहि गोखले, गाडगीळ, बाळ, बेहरे इत्यादि कांही कुटुंबें पाठीमागून आलीं असण्याचा संभव आहे. कारण खुद्द गुहागरांत असलेल्या गाडगिळांचा कुलस्वामी वाडेश्वर नाहीं; त्याचप्रमाणे भावे व जोग ह्यांचाहि नाही. सोहनी, काणे, वैद्य, आठवले, वझे, चक्रदेव, मोडक, कानिटकर वगैरे कित्येक गुहागरास हल्ली वास्तव्य करून राहिलेल्या लोकांचा कुलस्वामी वाडेश्वर नसल्यास त्यांत विशेष नाही. कारण हीं आडनांवें गुहागराच्या बाहेर पडल्यानंतरचीं आहेत. बाहेरून पुनः हीं कुटुंबें गुहागरास आलीं असलीं पाहिजेत. निजामाच्या मुलुखांतील जोगेश्वरी ही आमची कुलस्वामिनी असें मानणारे चित्पावन खुद्द गुहागरांत आहेत. गैरसमज झपाट्याने पसरतात म्हणतात तें खरें! गुहागरच्या पेठ्यांच्या देवांत खंडोबा आहे असें ऐकतों. हें खरें असल्यास हा देव दत्तकच असला पाहिजे. दुसऱ्या कोणत्याहि कोंकणांतील चित्पावनाकडे खंडोबा हें दैवत नाही. घाटावर गेलेल्या कांही चित्पावनांनी खंडोबाचें पाणिग्रहण केलें आहे. तेव्हा एका पेठ्यांच्या उदाहरणावरून चित्पावन हे निजामाच्या मुलुखांतून इकडे आले असें म्हणणें अप्रयोजकपणाचें होईल. एवढेंमात्र दिसतें की, चित्पावन कोंकणांतून देशावर पेशवाईच्यामुद्धा फार अगोदर गेले आहेत व ते चौफेर पसरलेले आहेत.

ह्या माझ्या संशोधनाचा निष्कर्ष आजतागायतच्या लौकिक समजुतीविरुद्ध आहे. उदा. १ चिपळूण हें चित्पावनांचें मूळ ठिकाण नाही; २ परशुरामाचा व चित्पावनांचा कांही संबंध नाही; ३ चित्पावन हे मूळचे देशस्थ नव्हत; ४ आंब्याची जोगाई ही चित्पावनांची कुलस्वामिनी नाही; ५ चित्पावनांचीं आडनांवें आर्ष नाहीत; वगैरे. कोंकणांतील गांवांचीं नांवें हाहि एक फल-

दायी होणारा संशोधनाचा विषय आहे. परंतु तें काम एका माणसाकडून व अल्पावधींत होण्यासारखें नाही; उदा. भावे आडोम, दांडें आडोम ह्यांतील आडोम शब्दाचा अर्थ काय !

असो. ह्या पुस्तकाच्या कामीं मला ज्या अनेकांचें साहाय्य मिळालें त्या सर्वांचा मी आभारी आहें. विशेषतः रा. ब. बांबर्डेकर, श्री. र. कृ. पाटणकर व श्री. आचवल ह्यांचा नामनिर्देश नाही केला तर कृतघ्नतेच्या दोषास मी पात्र होईन. त्याचप्रमाणे नागपूरचे श्री. वासुदेवराव चितळे व मिरजेचे श्री. दामोदरपंत भट ह्यांनी माहितीचे तक्ते लोकांकडून भरवून घेण्याच्या कामीं जी सहनशीलता व्यक्त केली तिचें वर्णन करणेंहि कठीण आहे. श्री. चिंतोपंत कर्वे ह्यांनी सूची तयार करण्यांत आपला उपयुक्त वेळ खर्ची घातला हें त्यांच्या स्नेहशीलतेचेंच फल समजलें पाहिजे.

चापेकरांचा वृत्तान्त सध्या हाताआड केला असला तरी दृष्टीआड केला नाही. मात्र प्रत्येक चापेकराने आपली माहिती द्यावी व आदर्श कुलवृत्तान्त पुढे येण्यास साहाय्य करावें अशी विनंती आहे.

बदलापूर
कार्तिक वा ३ शके १८६० } ना. गो. चापेकर

# अनुक्रमणिका







# चित्पावन



## १ चित्पावन शब्द

रत्नागिरी जिल्ह्यांतील एक ब्राह्मण पोटजात चित्पावन, चिपळोणे, कोंकणस्थ अशा त्रिविध नांवांनी ओळखली जाते. ह्या नांवांपैकी कोंकणस्थ हें नांव इ. स. १७१५ पूर्वी प्रचारांत नव्हतें असें एन्थोव्हनने लिहिलें आहे. चित्पावन शब्दाचा जन्म कोंकणस्थाच्या पूर्वीचा आहे ह्यांत संशय नाही; तथापि त्याचा जन्मकाल अंदाजानेहि सांगणें कठीण आहे. पहिल्या पेशव्यापासून देशावरच्या लोकांनी चित्पावनांना कोंकणस्थ म्हणण्यास आरंभ केला असें दिसतें. राजापूर तालुक्यांत जात सांगतांना कोंकणस्थ न सांगतां चित्पावन सांगतात. कोर्टांत हा अनुभव आम्हांला आला आहे. कोंकणस्थ शब्द रूढ होण्यापूर्वी चिपळोणा हा शब्द प्रचलित होता. चित्पावनांनी आपणांला स्वतः चिपळोणा शब्द लावल्याचें अद्यापि फारसें आढळण्यांत आलें नाही. चितळेभट्ट प्रकरणावरून चिपळुणा शब्द शके १५०५ मध्ये उपयोजिलेला दिसतो (पान ६४). परंतु हें सर्वच प्रकरण अविश्वसनीय वाटतें. ह्याच प्रकरणांत (पान ४२) स्कंदपुराणांतील एक वचन उद्धृत केलें आहे त्यावरून कोंकणस्थ शब्द सारस्वतांना लावीत असें दिसतें (सारस्वतादागता ये कोंकणस्थाः प्रकीर्तिताः). चिपळुणा शब्दाहून कोंकणस्थ शब्दाची व्याप्ति अधिक आहे हें मात्र निश्चित. दैवज्ञांच्या मागेंहि कोंकणस्थ शब्द लावण्याचा प्रघात आहे. गोवा प्रांतांत सत्तरीभागांत १५०

कोंकणस्थ घराणीं आहेत त्यांस तिकडे चिपळुणे म्हणतात. रत्नागिरी जिल्ह्यांत कऱ्हाडे, देवरुखे व जवळ अशा दुसऱ्या ब्राह्मण जाती आहेत; परंतु त्या एकाच नांवाने ओळखल्या जातात. त्यांच्या संज्ञेत अनेकत्व नाही ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

चित्पावन शब्द व्युत्पादण्याचे आजवर अनेक प्रयत्न करण्यांत आले आहेत. कोणी ह्या शब्दाचा चितीशीं संबंध लावतो तर दुसरा कोणी क्षितीशीं त्याचें नातें जडवतो. श्री. आगाशे ह्यांच्या मतें चित्पावन शब्द चितिपावन ह्या शब्दाचें अपभ्रष्ट रूप होय. चिति म्हणजे यज्ञ: चयन यज्ञ. मोठा यज्ञ करणारे ते चितिपावन=चित्पावन.

श्री. आगाशे ह्यांच्याच शब्दांत त्यांचें म्हणणें येथे देणें बरें.

"चितियज्ञाने पावन–पुनीत–झालेले ते चित्पावन. माझ्या कल्पनेप्रमाणे उत्तरध्रुवाजवळ असतांनाच चितिपावन कुलांनी चयनान्त यज्ञ करून आपलें वैशिष्ट्य प्रस्थापित केलें होतें; आणि ह्या ब्राह्मणवंशाला दार्ढ्य येऊन त्याचा स्वतंत्र गट बनला होता. हिमप्रलयाच्या पहिल्या महान् संकटामध्ये हा वंश इतर आर्यांबरोबर कश्यपसमुद्राच्या आसपास येऊन राहिला. जलप्रलयाच्या दुसऱ्या संकटामध्ये जी दाणादाण झाली तिच्यामध्ये बाकीचे आर्य अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानांत गेले आणि चितिपावनवंश कांही काल इराणच्या आखाताजवळ राहिला. बाकीचे आर्य हिंदुस्थानांत जाऊन सुप्रतिष्ठित झाले. ही वार्ता कर्णोपकर्णी ऐकल्यावर ते गलबतांत बसून हिंदुस्थानांत रत्नागिरी जिल्ह्याच्या चिपळूण आदि बंदरांत येऊन दाखल झाले. ह्या किनाऱ्याशीं फोनीशिअन वगैरे लोकांचें व्यापारी दळणवळण चालू होतेंच.

ही कल्पना जर ग्राह्य धरली तर पळापळीच्या आणि स्थलांतराच्या काळांत चितियज्ञासारखे अवघड, अनेक वस्तू व मनुष्यें यांचें सहकार्य

जरूर असणारे माठे यज्ञ या कुलाकडून इराणांत असतांना फारसे होत नसावेत; आणि हिंदुस्थानांतहि विरळा होत असावेत. अर्थात् चितिपावन हें नांव त्यांना पूर्वीच (उत्तरध्रुवावर असतांना –सं.) मिळालें असावें."[1]

नुसते तर्क करावयाचे तर आणखीहि एक तर्क करतां येण्यासारखा आहे. चित्तपावनाचा आग्रह धरण्यापेक्षा श्रितपावन ह्या शब्दापासून चित्पावन शब्द झाला असें म्हणतां येईल. श चा च होतो; आणि उच्चारसौख्यार्थ र चा लोप होतो. उ. चन्द्र = चांद. श्रितपावन = चितपावन = चित्पावन. श्रित म्हणजे आश्रयाला आलेले; त्यांना पावन करणारे ते श्रितपावन. श्रितपावन हें विशेषण श्रुतींना लावलेलें आहे. उ. श्रियै नित्याः श्रये नित्याः श्रुतीस्ताः श्रितपावनीः[2]; किंवा ज्याचा आश्रय केला त्याला पवित्र करणारे असाहि अर्थ करतां येईल. चितास्थानाला पवित्र करणारे !

चित्यपावन शब्दावरून चित्पावन शब्द कित्येक साधूं पाहतात. वि. का. राजवाडे ह्यांनी ही व्युत्पत्ति दिली असून[3] इरावती कर्वे ह्यांस ती अमान्य नाहीं. चित्याग्नि अथवा चितियजन करून पावन म्हणजे पवित्र झालेले ते चित्पावन. आम्हांला ही सर्व ओढाताण वाटते. चित्पावनांनी असल्या प्रकारचे यज्ञ केल्याचें कोठे प्रसिद्ध आहे ! शिवाय एकट्या चित्पावनांकडेच या प्रकारच्या यज्ञांचा मक्ता दिला होता; दुसऱ्या ब्राह्मणांनी असले यज्ञ कधी केलेच नाहीत काय ! तसेंच एवढ्या पवित्र ब्राह्मणांविषयी इतर ब्राह्मणांनी बहुतकालपर्यंत साशंक कां असावें वगैरे प्रश्नांचीं उत्तरें कोणीच देत नाही.

---

१ पेणचे गणेश सखाराम आगाशे ह्यांचें पत्र.

२ मीमांसाप्रकाश ३३.

३ दि. संमेलन वृत्त पृ.८.

रा. ब. साने चितपोळण (चिपळूणचें पूर्वीचें नांव) वरून चित्पावन शब्द बनला असें म्हणतात[1]; आणि कच्छ काठेवाडाकडून चित्पावन आले असावे असा तर्क करतात. कारण चित्पावनी भाषेंत व कच्छी भाषेंत साम्य असल्याचें ते सांगतात. शुद्ध मनाचे म्हणून चित्पावन असें नांव आपल्या वसाहतीला मदत करणाऱ्या ब्राह्मणांस परशुरामाने दिलें असें त्यांचें मत आहे. आम्हांस ह्या सर्व कल्पना निराधार वाटतात. मुख्य अडचण ही आहे की, चित्पावनी भाषा मुख्यत्वें राजापूर तालुक्यांतील कोंकणस्थ बोलतात. चिपळूण तालुक्यांत ही बोली फारशी प्रचारांत नाही—मुळीच नाही म्हटलें तरी चालेल. जयगडखाडीपलीकडे चित्पावनांची वस्ती मूळची नाही हें आम्ही पुढे दाखविणार आहों. चित्पावनी भाषा झाली तरी ती प्राकृतोद्भव आहे. त्यामुळे दुसऱ्या पुष्कळ भाषांशीं तिचें साम्य असूं शकेल. सिंधी भाषेशींहि नातें जोडतां येईल. गुजराथीशींहि कांहीं बाबतींत चित्पावनीचें साम्य आहे. शिवाय पोळण ह्या शब्दाचें रूपांतर पावन शब्दांत कोणत्या नियमाने झालें तें समजत नाही.

रा. मोडक हे क्षितिपावनापासून चित्पावन शब्द बनल्याचें प्रतिपादितात[2]. पू धातूपासून पावन शब्द झाला. पू म्हणजे त्यांच्या मतें स्वच्छ करणें—खणणें. क्षिति म्हणजे जमीन. जमीन खणून साफसूफ करण्यास परशुरामाला मदत करणारे म्हणून त्या लोकांस चित्पावन म्हणूं लागले. ही काल्पनिक व्युत्पत्ति आहे. चौदा ब्राह्मण परशुरामाला मदत करणार आणि समुद्र हटणार !

इजिप्तवान पासून जिप्तवान = चिप्तवान, आणि नंतर वर्णव्यत्यास होऊन चित्पावन शब्द बनला असें रा. सा. मण्डलिकांनी प्रतिपादन केलें

१ अहवाल शके १८३३ पृ. १२८ (भारत इ. सं. मंडळ).

२ ब्राह्मणांतील पोटजातींचें एकीकरण, उ. खं. ६४.

आहे. चित्पावन हे इजिप्त देशाहून आले असें निःसंशय सिद्ध होईल तर कदाचित् ही व्युत्पत्ति दूरान्वयाने तरी समर्थनीय मानतां येईल.

श्री. घाणेकर ह्यांनी एक निराळीच व्युत्पत्ति सुचविली आहे. ते म्हणतात[1] चिपळूण येथे मलबारकडील कोंगनाडांतील पुन्नाडकडून परशुरामाबरोबर आलेल्या लोकांनी नवीन वसाहत केली व त्या वसाहतीला चिक्पुण किंवा चित्पुण असें नांव दिलें. चिक्क म्हणजे लहान. हा कानडी शब्द आहे. ह्या चित्पुणाचें संस्कृत रूप चित्पावन हें होय.

ह्या व्युत्पत्तींत अनेक गोष्टी गृहीत धरल्या आहेत. पुन्नाडाहून कांही लोक कोंकणांत येऊन त्यांनी वसाहती केल्या ह्यास ऐतिहासिक पुरावा नाही. चिक्चें चित् कसें झालें तें घाणेकर सांगत नाहीत. कानडींत चिट् शब्द आहे. त्याचें चित् होणें शक्य आहे; पण मग चित्पुण असाच मूळ शब्द असला पाहिजे. चिक्प्रमाणे चिट् ह्याचाहि अर्थ लहान असा होतो. चिटगुप्पी ह्या गांवाच्या नांवांत चिट शब्द आपणांस आढळतो. घाणेकरांच्या मतें चिक्पुण किंवा चित्पुण ह्याचें अपभ्रष्ट रूप चिपळूण हें होय. ह्या कल्पनेप्रमाणे परशुराम उत्तरेकडून दक्षिणेस न जातां दक्षिणेकडून उत्तरेस आला. घाणेकरांची व्युत्पत्ति मानवण्यासारखी नाही.

ब्राह्मणपत्रिकेंत (वर्ष ६, अंक ८) रामतनय ह्यांनी आणखी वेगळ्या रीतीने चित्पावन शब्दाची व्युत्पत्ति सुचविली आहे. चितास्थानीं पावन झालेले लोक ते चितापावन असें त्यांचें म्हणणें आहे. चितापावनाचें ऱ्हस्व रूप चित्पावन होय. चितास्थान म्हणजे स्मशान. समुद्रकांठ ही स्मशानभूमि असते. ह्या व्युत्पत्तीमध्ये असा दोष आहे की, मुख्य शब्द जो स्थान त्याचा आत्यंतिक लोप होतो. आणि असा लोप होण्यास कोणतेंहि योग्य कारण दिसत नाही. शिवाय समुद्रकांठीं चित्पावन लोक येण्यापूर्वी प्रेतें जाळीत

---

१ प्राचीन द्राविड १०८.

ह्यास आधार काय ? त्या वेळीं समुद्रकांठावर शूद्रांची वस्ती होती. त्यांचीं प्रेतें पुरीत, जाळीत नसत. प्रेतें जाळणाऱ्या ब्राह्मणांची वस्ती चित्पावनांच्या अगोदर समुद्रकिनाऱ्यावर होती ह्यास कोठेहि प्रमाण मिळण्यासारखें नाही.

गुहागरमहात्म्यांत चित्पावन ह्यांस चित्तपूर्णाः असें म्हटलें आहे (अत्यल्पदानसंतुष्टाः चित्तपूर्णा इति स्मृताः); आणि "आर्यावर्तो नाम देशस्तत्र मे चित्तपूरणम्" अशी कोटी लढवून चित्तपूर्ण नांवाची सार्थकता ह्याच महात्म्यांत दाखविली आहे. सह्याद्रिखंडांत एका ठिकाणीं आर्यावर्त हेंच चित्पावनांचें नांव म्हणून दिलें आहे (आर्यावर्त्ता इति ख्याता आर्यावर्त्तादुपागताः).

ह्या संशयित पुराणांतील तर्कांच्या कसरती सोडून आपण ऐतिहासिक वाङ्मयाकडे वळलों तर चित्तपावनस्थ ब्राह्मण असा उल्लेख राजवाड्यांनी शोधून काढला आहे.[१] त्यावरून चित्तपावन हें प्रांताचें किंवा गांवाचें नांव असलें पाहिजे असें अनुमान करतां येण्यासारखें आहे. आमच्या मतें हेंच अनुमान सर्वांत अधिक संभवनीय आहे. हरिहरेश्वरमहात्म्यांत चित्तपावन हें क्षेत्र असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे "अधुना नाम चित्तस्य पावनं क्षेत्रमस्तु तत्" आणखी "तच्चित्तपावनं क्षेत्रं लोके ख्यातिमगात् तदा".

पावन हा गांव असणें असंभवनीय नाही. ठाणें जिल्ह्यांत डहाणू तालुक्यांत पावन नांवाचा गांव आहे त्यास चरीपावन म्हणतात. चरी हा दुसरा शेजारचा गांव आहे. चरीपावन ह्या जोडनांवावरून पावन नांवाचा दुसरा गांव असलाच पाहिजे; जसें हर्णै मुरूड व जंजिरा मुरूड; परळी वैजनाथ व भिवपुरी वैजनाथ इत्यादि. चित शब्द स्थलवाचक नांवाच्या पूर्वी अनेक वेळां लावलेला केदारविजयनामक ग्रंथांत आम्हांस आढळला. उ. चित्रत्नागिरीमंदिरीं; चित् समुद्रीं तपाचरणें; कीर्तिध्वज उभारी चित् रत्नागिरीं अक्षयीं; चित् रत्नाद्रीं समुद्रतटीं पातल्या; मारोनि रत्नासुर

१ भा. इ. सं. मं. इतिवृत्त शके १८३२.

रक्तभोजन चित् रत्नागिरीं घालोनि ठाण; चित् रत्नागिरीं द्वादशलिंगार्चन मुनिवर्य करी कीं द्वादशार्क एकत्र उगवले इ. ह्याशिवाय चित्‌रत्नांचे अलंकार, सूत म्हणे चित् सुभाष्यकारा असेहि शब्द येतात. ह्यावरून चित्पावन हा शब्द चित्+पावन ह्या दोन शब्दांचा बनला असावा. पावन गांव रत्नागिरी जिल्ह्यांत असल्याचें माहीत नाही. पण पूर्वी असणें अशक्य नाही.

चित्पावन हा शब्द चित् आणि पावन या दोन शब्दांचा बनलेला आहे, हें इतर ग्रामनामांवरून सिद्ध होण्यासारखें आहे. चितगांव (चित्तगांग) हें बंगाल प्रांतांत जिल्ह्याचें शहर आहे. चित हा मूळ शब्द असून चित्तगांग यामध्ये तो चित्त झाला आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. चितपावन आणि चित्तपावन ह्या प्रकारासारखाच वरील प्रकार होय. ह्याशिवाय संयुक्त प्रांतांत चितफिरोझपूर नांवाचें शहर आहे. चितरत्नागिरी-प्रमाणे फिरोझपुराला चित् शब्द जोडलेला आहे हें स्पष्ट आहे. चित्तूर या गांवाच्या नांवांत सुद्धा चित् शब्द असण्याचा संभव आहे. मद्रास इलाख्यांत चिदंबर नांवाचें गांव आहे. त्याला चिदंबलहि म्हणतात. तामिळ भाषेंत अंबल याचा अर्थ सभा असा होतो. ह्यावरून चित्सभा असाहि शब्द बनला आहे. चित्सभेश हें देवाचें नांव आहे. सामान्य जन चिरंबलम् याचा उच्चार चित्तंबलम् असा करतात[1]. हा उच्चार हुबेहुब चित्तपावन ह्या उच्चाराप्रमाणे आहे. चिदंबर हें शिवालयहि आहे.

तात्पर्य, चित्पावन हा स्थलवाचक शब्द आहे असें आम्हांस वाटतें. स्थलवाचक नांव जसेंच्या तसेंच व्यक्तीला लागतें तसेंच जातीला लागूं शकेल. चैतन्ययुक्त, ओजस्वी ह्या अर्थानें वरील चित् शब्द वापरला असल्याचा संभव आहे.

---

१ Hindu Iconography, प्रस्तावना पृ. ४३-४४.

## २ परशुराम आणि चित्पावन

परशुरामाचा आणि चित्पावनांचा निकट संबंध आहे ही गोष्ट गृहीत धरली जाते. परंतु आमच्या मतें ज्या प्रकारचा संबंध आहे अशी समजूत आहे त्या प्रकारचा संबंध असल्याचा यत्किंचितहि पुरावा नाही.

चित्पावनांचा परशुराम कुलस्वामी नाही. परशुरामजयंती चित्पावनांच्या घरोघरीं होत नाही. सध्या परशुरामजयंती साजरी करणारे चित्पावन चित्पावनाचार म्हणून तसें करीत नाहीत. परशरामाचा उत्सव काही निमित्ताने केला जातो; उ. कल्याणच्या मेघःश्यामांकडे परशुरामाच्या निमित्ताने आपला उत्कर्ष झाला अशा समजुतीने जयंतीचा उत्सव करतात.

परशुरामाचें प्रख्यात प्राचीन देऊळहि रत्नागिरी जिल्ह्यांत नाही. हल्ली ज्या गांवाला परशुराम म्हणतात त्याचें पूर्वीचें नांव पेढें असें होतें. श्रीदेव परशुराम मौजे पेढें ह्या नांवावर सरकारतिजोरींतून एकंदर २०१८ रु. दरसाल खर्चीं पडत असतात. इ. स. १७६४ सालीं परशुराम हें नांव प्रचलित नव्हतें; उ...... यांनी हुजूर विदित केले की तालुके अंजनवेल वगैरे तालुके येथील ब्राह्मणांचे दर घरास दर ८= प्रमाणे व कुणबियांचे दर घरास ८– प्रमाणे तीन आणे श्री. परशुराम वास्तव्य मौजे पेढें तर्फ चिपळोण सुभा दाभोळ येथील इमारतीस व अन्नच्छत्रास सरकारजमेशिवाय रयत निसबतीने सरकारांतून नूतन नेमणूक करून देऊन सनद सादर केली असे[1]......परशुराम येथील देवळांत तीन मूर्ति आहेत त्या अनुक्रमें काल, काम व परशुराम ह्यांच्या. काल म्हणजे शंकर व काम म्हणजे ब्रह्मा. परशुराम हा विष्णूचा अवतार समजला

१ पे. रो. ७.१०१.

जातो.[1] ह्याप्रमाणे ब्रह्मा, विष्णु व महेश अशा त्रिमूर्तींचें हें देऊळ आहे. घोरपड्यांच्या भारतप्रवासवर्णनांत परशुरामाच्या देवळाच्या वर्णनांत भार्गवराम, परशुराम व काळकराम अशा तीन मूर्ति असल्याचें लिहिलें आहे. तसेंच भार्गवराम, परीसराम तीन मूर्ति एकचि नाम असें मुलींच्या गाण्यांत एक कडवें आहे.[2] ह्या मूर्तींखाली लिंग आहे असें म्हणतात. त्यावरून हें पूर्वी शंकराचें देऊळ असावें. सध्या असलेल्या मूर्तींची स्थापना नारो अनंत परचुरे यांनी केलेली आहे. त्याच्यापूर्वी ब्रह्मेन्द्रस्वामींनी मूर्तींची स्थापना केली होती. रेणुकेचें स्वतंत्र देऊळ आहे; तें स. १७१९ सालीं बांधलें. रेणुका ही परशुरामाची आई. देवाच्या गोठण्यास दुसरें देऊळ ब्रह्मेन्द्रस्वामींनी बांधविलें. तेथील देवास भार्गवराम म्हणतात. ह्याशिवाय कोळबांदरें (दापोली), आडें (आंजर्लें) आणि पालशेत येथेहि भार्गवरामाचीं देवळें असल्याचें सांगतात. आजगांव येथे असलेलें परशुरामाचें देऊळ तेथे चित्पावनांची वस्ती झाल्यानंतर त्यांनी बांधलेलें असावें. त्याचे पुजारी नाटेकर आडनांवाचे ब्राह्मण आहेत व तें एकच घराणें चित्पावनेतर असें त्या गांवांत हल्ली आहे. ह्याशिवाय परशुरामाचें दुसरें देऊळ नाहीं. हीं देवळें प्राचीन नाहीत.

ह्याच्या उलट भडोच जिल्ह्यांत भृगूचें देऊळ ६ व्या शतकांतील आहे. दुसरें लुहारा येथे परशुरामाचें देऊळ आहे. तसेंच भार्गव नांवाचे ब्राह्मण गुजराथेंत आहेत. ते आपणांस भृगूचे वंशज समजतात. भडोचचें संस्कृत नांव भृगुकच्छ असेंच आहे. भृगुकच्छ म्हणजे भृगूचा प्रांत. परशुरामाविषयी बऱ्याच दन्तकथा गुजराथेंत प्रचलित आहेत. परशुराम त्या प्रांतीं ठिकठिकाणीं नेहमी येतो जातो अशी लोकांची समजूत आहे.

---

१ केशव धृतभृगुपतिरूप जय जगदीश हरे. —गीतगोविंद.

२ बांबर्डेकर.

श्राद्धाकरता कोळ्यांना . परशुरामाने ब्राह्मण बनविलें ही पौराणिक कथा अगदीच टाकाऊ आहे. अशा प्रकारच्या कथा भार्गवराम आणि दाशरथि राम ह्यांच्या संबंधाने जागजागीं प्रचलित आहेत. म्हणून त्यांत नाविन्यहि नाही. एका पैची चूक नाहीशी करण्याकरता रात्रभर जाग्रण केल्याच्या कथांप्रमाणेच ही श्राद्धार्थ ब्राह्मण बनविण्याची कथा आहे. ह्या कथांचा ऊहापोह पुढे करण्यांत येईल. सध्या इतकेंच सांगावयाचें की, चित्पावनांचा परशुरामाशीं असामान्य असा संबंध नाही. परशुरामाने चित्पावनांस कोंकणांत आणलें असें मानलें तरी तसें गोव्याकडील गौडहि त्यानें आणिले. त्यामुळे चित्पावनांचा व गौडांचा परशुरामावर सारखाच हक्क आहे. "पश्चात्परशुरामेण ह्यानीता मुनयो दश गोमांचले स्थापितास्ते पञ्चक्रोश्यां कुशस्थले."[१]

त्रेतायुगांतील परशुरामाने यज्ञार्थ, श्राद्धार्थ किंवा भूमिदानासाठी आम्हांस आणलें असें नंबुद्री, केरळ, तुळव, शेणवी वगैरे जाती सांगत आल्या आहेत. शेणवी म्हणतात की, परशुराम हा त्यांच्या जातीचाच. एवढेंच नव्हे तर कांही ब्राह्मणेतर जाती ह्याप्रमाणेच सांगतात. जमदग्नि उपनांव धारण करणारे उत्तरभारतांत कांहीं ब्राह्मण आहेत त्यांना ह्या दाक्षिणेंतील कथांची मुळीच माहिती नाहीं. ते आपल्या ह्या प्राचीन पूर्वजाचे उत्सव मोठ्या अभिमानाने करीत असतात.[२]

मार्कंडेय पुराणांत गोदावरीवर गोवर्धननगर हें भार्गवांचें निवासस्थान असल्याचें वर्णन आहे[३]. ५ व्या शतकांत परशुरामाने समुद्र हटवल्याची व २१ वेळां क्षत्रियांना मारल्याची आख्यायिका कालिदासालाहि माहीत

१ शांतादुर्गा सं.चा संक्षिप्त इतिहास, टीप पान १६.

२ बांबर्डेकर.

३ अ. ५४ श्लोक ३४।३५.

होती.[1] बाणाने आपल्या कादंबरींतहि परशुरामाच्या पराक्रमाचें वर्णन दृष्टान्ताच्या स्वरुपांत केलें आहे.[2] बाण हा सातव्या शतकांतील कवि होय. कानडी प्रांतांत इ. सनाच्या सहाव्या शतकापासून तों सोळाव्या शतकापर्यंत अनेक ताम्रपटांतून परशुरामाचा उल्लेख आढळतो.[3] स.५२२-२३ च्या लेखांत दुर्विनीत राजा शस्त्रास्त्रें वापरण्यांत परशुरामासारखा आहे असें म्हटलें असून स. ६९२ च्या लेखांत चालुक्य राजा विनयादित्य सत्याश्रय हा परशुरामाप्रमाणे इतर राजांना अंकुशासारखा भासे असें वर्णन केलेलें आढळतें. ह्यापुढे स. ७४९, ७७६, ७९७ व ९०३ ह्या सालीं जमदग्नीच्या पुत्राप्रमाणे पराक्रमी असें दुसरा श्रीपुरुष कोंगुणिवर्मा व दुसरा पृथ्वीकोंगुणि वर्मा ह्या राजांचें वर्णन केलेलें आढळतें. स. १०१९ ते ११०१ पर्यंतच्या शिलालेखांत चोलदेव राजाचे पराक्रम वर्णितांना परशुरामाने २१ वेळां युद्धांत क्षत्रियांचा पराभव केल्याचा उल्लेख आला आहे. स. १०७७ च्या लेखांत विक्रमांक राजाची तुलना निश्चयाच्या बाबतींत परशुरामाबरोबर केली आहे. स. १११२ च्या शिलालेखांत पुढील मजकूर आढळतोः— क्षत्रियांचा संहार करीत करीत जामदग्न्य आला तेव्हा किष्किंधा पर्वताच्या गुहांतून वीर जन्मास आले तेच बलिवंशाचे पूर्वज होत.

स. ११६० च्या लेखांत झाडाला कुऱ्हाड किंवा सहस्रबाहूला परशुराम त्याप्रमाणे नरसिंह वर्म्याला (चोलराजा) विष्णुवर्धन होता; ह्या विष्णूने क्षत्रियांचा शंभरदा संहार केला असे विष्णुवर्धन बिट्टकदेवाचे पराक्रम वर्णिले आहेत. स. ११७१-७२ मध्ये महामंडलेश्वर बुद्धराजा

१ रघुवंश ४.५३,५८; ६.४२; ११.६६,६७.

२ शुकनासस्यापि ज्येष्ठायां ब्राह्मण्यां मनोरमाभिधानायां राम इव रेणुकायां तनयो जातः.

३ सॅलेटोर पृ.१५.

नांवाचा जो शूद्र राजा त्याला आपली प्रतिज्ञा खरी करून दाखविण्याच्या बाबतींत परशुरामाची उपमा दिली आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं परशुराम क्रोधाच्या आवेशांत सर्व राजांना खाऊन टाकीत असतां अश्वत्थाम्याने आपला शिष्य जो रायमुरारी देव त्याच्या दाढीमिशांचें संरक्षण केलें (स. ११७४) असें वर्णन आढळतें. स. १२२३ सालच्या लेखांत वीर नरसिंह हा परशुरामापेक्षाहि पराक्रमी असल्याचें वर्णिलें आहे. इ.स. ११६८ च्या शिलालेखांत परशुरामाने समुद्र हटवला, क्षत्रिय ठार केले आणि समुद्रापर्यंतची सर्व जमीन ब्राह्मणांस दिली वगैरे कथा दिली आहे.

ह्यानंतर स. १५३८ च्या शिलालेखांत राजा अच्युतराय लिहितो की, दहनकोलाल नांवाच्या पुण्यक्षेत्रांत परशुरामाने कोलालदेवीची स्थापना केली आणि तेव्हांपासून त्या स्थळाला कोलालभार्गव म्हणूं लागले. होसकोट तालुक्यांतील लक्कोंडनहल्ली ह्या गांवीं व्यंकटरमण देवाची मूर्ति परशुरामाने स्थापिली असें तेथील स्थलमाहात्म्यावरून समजतें.

उडपीच्या आग्नेयेस आठ मैलांवर कुंजारगिरी नांवाचें खेडें आहे. तेथे रेणुकेचें देवालय असून तें परशुरामाने बांधल्याची आख्यायिका तेथील स्थलमाहात्म्यांत कथन केली आहे. ह्याच गांवांत परशुतीर्थ, गदातीर्थ, धनुष्तीर्थ आणि शरतीर्थ अशीं चार तीर्थें आहेत. चितळदुर्ग जिल्ह्यांत परशुरामपूर म्हणून एक गांव आहे. केरलोत्पत्तिनामक ग्रंथांत केरलदेश परशुरामाने निर्माण केल्याची कथा आहे. हिरेमंगलूर ह्याचें प्राचीन नांव भार्गवपुरी आहे असें रा. ब. बांबर्डेकर म्हणतात. रेणुका चन्द्रगुत्तीवर सती गेली अशीहि दंतकथा ऐकिवांत आहे.

म्हैसूर संस्थानांत चन्द्रद्रोण नांवाचा पर्वत आहे. ह्या पर्वतावर कोंकणा =कुंकणा देवीचें देवालय आहे. कुंकणा हें रेणुकेचें दुसरें नांव. त्याचप्रमाणे

तिनवेली जिल्ह्यांत डोंगरावर परशुराम व रेणुका ह्यांचीं देवालयें आहेत. नाशीक जिल्ह्यांत चांदवड येथे रेणुकेचें देऊळ आहे.

इतर प्रांतांतहि परशुरामाच्या आख्यायिका प्रचलित आहेत. खत्री लोकांत अशी एक दंतकथा आहे की, परशुराम क्षत्रियांच्या मागे हात धुवून लागला असतांना एक गरोदर बाई पळून एका सारस्वत ब्राह्मणाच्या घरीं दडून राहिली. परशुरामाचे लोक तिचा पाठलाग करीत त्या ब्राह्मणाच्या घरीं आले तेव्हा त्या ब्राह्मणाने ही आमची स्वयंपाकीण बाई आहे असें सांगून तिच्या हातचें अन्न खाल्लें. ही आख्यायिका काल्पनिक असावी. कारण ब्राह्मण व क्षत्रिय परशुरामाच्या काळीं सहभोजन करीत असत. सतलजजवळचे निर्मेद ब्राह्मण व विहारमधील पालीय ब्राह्मण ह्यांच्यांतहि परशुरामासंबंधी दन्तकथा प्रचलित आहेत.

आसामांत पाहाडांत परशुरामक्षेत्र म्हणून एक ठिकाण ओळखलें जातें. मलबारांतील त्रिचूर गांव परशुरामाने वसविला अशी दंतकथा आहे; व परशुरामाच्या नांवाचा शक तिकडेच चालू आहे. सातार्‍यानजीक कृष्णा-वेण्णेच्या संगमावर खेड म्हणून एक गांव आहे. ह्यालाच पूर्वी परशुराम-क्षेत्र म्हणत असत असें सांगतात.[२] सोपार्‍याला परशुरामक्षेत्र मानणारे अरनाळ्यास रेणुकेची स्थापना परशुरामाने केली असें म्हणतात, आणि तेव्हापासून आगाशी प्रांतास कीकट देश म्हणूं लागले[३] असें समजतात. वज्रेश्वरीच्या बाजूस ठाणें जिल्ह्यांत परशुरामक्षेत्र असल्याची माहिती मिळते. वाडें पेठ्यांत गुंज म्हणून गांव आहे तेथे डोंगरावर परशुरामाचें देऊळ आहे. टकले नांवाचे चित्पावन ब्राह्मण पुजारी आहेत. मूर्तीच्या हातांत परशु असल्याचें दिसत नाही. गळ्यांत जानवें नाही. हातांत कुंडलें, डोक्यावर मुकुट, हातांत कडीं, नेसूं धोतर अशा थाटाची, अंगच्या

१ प्राचीन द्राविड १००. २ डिसकळकर टिपण.
३ यजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मणांचा इतिहास.

दगडाची ही सुमारें २-२।। फूट उंचीची मूर्ति आहे. दोनहि हातांत कांही तरी आहे पण त्याचें स्वरूप निश्चितपणें आम्हांस सांगतां येत नाही. देवास गांव इनाम नाही परंतु सुमारें वीस बिघे भातजमीन व शिवाय गवतजमीन देवाला इनाम आहे. १३॥॰ रु. जुडी सरकारांत भरावी लागते. सरकारदप्तरीं भार्गवराम असें ह्या देवाचें नांव लागलेलें आहे. सध्या केशव पुरुषोत्तम टकले हे वहिवाटदार आहेत. हे गृहस्थ महाडास असतात. त्यांच्यातर्फे एक ब्राह्मण देवाची पूजा करण्यास ठेविलेला आहे. अक्षय्यतृतीयेच्या दिवशीं सर्व गांवाची जेवणावळ घालतात. गांवांत सर्व वस्ती शूद्रांची आहे. ब्राह्मणवस्ती तेथे पूर्वकालीं केव्हा तरी असल्याचें कोणी सांगत नाही. पूर्वी ह्या गांवांत प्रत्येकाला वर्षांत गुंजभर तरी सोनें जमिनींत मिळत असे म्हणून गांवाला गुंज नांव पडलें असें म्हणतात. टेकडीला परशुरामाची टेकडी असें म्हणण्यांत येतें. पायथ्यापासून अजमासें अर्ध्या तासाच्या चढावावर देऊळ आहे. चिरेबंदी दगडांचें तें बांधलेलें आहे. सुमारें २० फूट लांब व तितकेंच रुंद असावें. देऊळ फार जुनें दिसत नाही. मूर्ति पूर्वाभिमुख आहे. गांवांत एक मोठ्या दगडांचा चबुतरा आहे. ह्यावर पूर्वी देऊळ होतें असें म्हणतात. ह्या देवळांत रेणुका, वज्रेश्वरी व कालिका ह्या तीन देवींच्या मूर्ति होत्या अशी लोकसमजूत आहे. गुंज गांवापासून थोड्याच अंतरावर ह्याच देवतांचें देऊळ आहे. वज्रेश्वरीला ह्याच देवींच्या मूर्ति आहेत. ह्यांत रेणुका व वज्रेश्वरी ह्यांचा संबंध काय आहे तें समजत नाही. वज्रेश्वरी ही कोळ्यांची देवी. रेणुका ही परशुरामाची आई कीं दुसरी कोणी हेंहि समजण्यास मार्ग नाही. टकल्यांकडे सनदेची चौकशी करितां सनद नाही म्हणतात[१].

---

१ ठाण्याच्या गॅझेटिअरमध्ये देवाला भार्गवराम व टेकडीला भार्गवरामाची टेकडी म्हणतात असें लिहिलें आहे. देवाला साडेपन्नास एकर जमीन जव्हार संस्थानाकडून इनाम असल्यामुळे देऊळ जव्हारच्या कोळी राजाने बांधलें असावें असा

ब्राह्मणक्षत्रियांचें भांडण ऋग्वेदकालीन वसिष्ठविश्वामित्रांपासून आहे. परशुरामानें कश्यपाला पृथ्वी दान करून तो पश्चिमेस समुद्रकिनाऱ्यावर आला. ह्याचा स्पष्ट अर्थ असा की, परशुरामाचा शेवटीं पराभव होऊन तो पश्चिमसमुद्रावर आश्रयार्थ आला.

परशुराम ही कल्पनिक व्यक्ति नाही, ऐतिहासिक आहे. परशुरामाच्या बरोबर किंवा मागून दुसरे ब्राह्मण आले असावे. हे ब्राह्मण आले कोठून हा प्रश्न स्वाभाविकपणें उद्भवतो. ह्याकरता प्राचीन इतिहास थोडासा अवलोकिला पाहिजे. जमदग्नीचा आश्रम नर्मदाकांठीं होता. परशुरामाला भार्गवराम म्हणतात. भृगूचा वंशज म्हणून भार्गव. परशुरामाची वंशावळ सर्व पुराणांचा विचार करून विद्वानांनी ठरविली आहे ती अशी—




तर्क आहे. देऊळ चारशें वर्षांपूर्वी बांधल्याचें गांवकरी सांगतात असें त्यांत आणखी नमूद केलें आहे. मूर्ति सहा हात उंच असल्याचें वर्णन आहे. गुंज हें पहिलें वज्राबाईचें स्थान. परंतु पोर्तुगिजांनी देऊळ पाडल्यामुळे मूर्ति वडवलीला नेऊन तेथे स्थापन केली.

कान्यकुब्जाच्या गाधि राजाची मुलगी सत्यवती ही ऋचिकाची बायको आणि परशुरामाची आजी. जमदग्नीची बायको रेणुका ही सहस्रार्जुनाच्या बायकोची बहीण आणि अयोध्येच्या प्रसेनजित् राजाची मुलगी. गाधि आणि सहस्रार्जुन हे क्षत्रिय राजे. प्राचीन काळीं क्षत्रियकन्या ब्राह्मणांना वरीत. श्रीमंतींतून त्या आपण होऊन दारिद्र्यांत जात. कामधेनूवरून जमदग्नीचें व सहस्रार्जुनाचें भांडण जुंपलें. मोठें युद्ध झालें. वसिष्ठाप्रमाणे जमदग्नीने आपल्या कामधेनूकडून सहस्रार्जुनाचा पराभव करविला. सहस्रार्जुनाचें दुसरें नांव कार्तवीर्य. ह्या पराभवाचा सूड पुढे सहस्रार्जुनाने (कित्येकांच्या मतें त्याच्या मुलांनी) जमदग्नीचा खून करून उगवला. परशुरामाला हें समजतांच त्याने निःक्षत्रिय पृथ्वी करण्याची प्रतिज्ञा केली. परशुरामाने सहस्रार्जुनाला धुळीस मिळविलें,[१] त्याचा अनुपदेश सर केला आणि माहिष्मती नगरी नष्ट करून टाकली. चित्ररथ राजाचा शाल्व देशहि त्याने काबीज केला. अयोध्येपासून कान्यकुब्जापर्यंत भार्गवांची सत्ता होतीच; शिवाय काशी आणि पांचाल ह्या देशांतहि परशुरामाने आपली सत्ता स्थापिली. एकवीस वेळां क्षत्रियांचा उच्छेद केल्यावर भार्गवी साम्राज्य हिंदुस्थानच्या बऱ्याच मोठ्या भागांत कित्येक वर्षें चाललें.

वरील परिच्छेदामध्ये उल्लेखलेल्या व्यक्ति व स्थलें ह्यांचें थोडें स्पष्टीकरण करणें अवश्य आहे. कार्तवीर्य सहस्रार्जुन हा हैहय वंशांतील राजा. माहिष्मती ही ह्या राजांची राजधानी. सध्या भडोच शहर आहे तेथेच पूर्वी माहिष्मती शहर होतें. गुजराथ व काठेवाड हा पूर्वीचा अनुप देश होय. शाल्व देश हस्तिनापुराच्या पूर्वेस होता. कार्तवीर्याचा एवढा मोठा प्रदेश परशुरामाने जिंकून महाभारतकालीं त्याचें नांवहि उरूं दिलें नाही. इकडे

१ कार्तवीर्याची माहिष्मती (इंग्रजी) Indian Antiquary Vol. II. 1922 pages 217 to 221

परशुरामाने शूर्पारक प्रान्त हस्तगत करून घेतला होता; "ततः शूर्पारकं देशं सागरस्तस्य निर्ममे। सहसा जामदग्न्यस्य सोपरान्तो महीतलम् ॥" ह्यांत ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे शूर्पारक देश सागराने परशुरामाकरता निर्माण केला असें भारताचें म्हणणें आहे. परशुरामाने तो सागरापासून ओढून काढला नाही. ह्याचा अर्थ इतकाच दिसतो की, हैहयांचें राज्य जिंकल्यावर नर्मदेच्या उत्तरेस व दक्षिणेस सोपाऱ्यापर्यंत परशुरामाचें राज्य होतें. शूर्पारकक्षेत्रीं परशुराम राहत असे असें वनपर्वांत वर्णन आहे. शूर्पारक म्हणजे ठाणें जिल्ह्यांतील सोपारा. शूर्पारक देश सोपाऱ्यापासून नर्मदेच्या उत्तरेपर्यंत पसरला होता. ह्या शूर्पारक देशांत अनुप देश सामील करून टाकला असावा. कारण महाभारतांत अनुप देश प्रामुख्याने झळकत नाही.

आता परशुरामाने कश्यपाला पृथ्वी दान केली ह्याचा अर्थ काय समजावयाचा ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें पाहिजे. कश्यप हा यदूंचा व कौरवांचा पुरोहित होता. यदू हे हैहयांपैकीच होते. तेव्हा यदुकुरूंनी परशुरामाचा पराभव केला म्हणून किंवा तो आपण होऊन उतारवयांत क्षत्रियांच्या हत्येच्या पापाचें क्षालन करण्यासाठी कोंकणासारख्या निर्जन प्रदेशांत येऊन एकान्तवासांत राहिला असावा. परंतु कश्यपाने परशुरामाला ज्या शब्दांत जाण्यास सांगितलें त्यावरून पराभवाच्या अनुमानास बळकटी येते. कश्यप म्हणतो "गच्छ तीरं समुद्रस्य दक्षिणस्य महामुने। न ते मद्विषये राम वस्तव्यमिह कर्हिचित् ॥" शां. ४८-६५.

हैहय आणि भृगू ह्यांचें भांडण फार जुनें आहे. भृगू हे हैहयांचे पुरोहित होते. एकदा हैहयांना पैशाची गरज लागली तेव्हा त्यांनी भृगूंकडे मागणी केली. भृगूंनी नाकारलें. ह्याचा राग येऊन हैहयांनी सर्व भृगूंचा संहार

१ म. भा. उपसहार पृ. ३७६.

केला. एक स्त्री गरोदर होती ती हिमालयाकडे[१] पळून जात होती; हैहयांनी तिचा पाठलाग केला. त्यांनी तिला पकडून ठार केलें असतें. इतक्यांत त्या स्त्रीच्या मांडींतून मुलगा निघाला. त्यानें आपल्या तेजानें सर्व हैहयांना आंधळें केलें. ह्या मुलाचें नांव और्व. ह्यानें तपश्चर्या करून धनुर्विद्या संपादन केली आणि ती आपला मुलगा ऋचिक ह्यास शिकविली. हीच विद्या व पराक्रम हीं परशुरामामध्ये आनुवंशिक रीत्या आलीं होतीं. कित्येकांच्या मतें और्व आणि ऋचिक हें एकाचेंच नांव आहे.[२]

रामाला भार्गवराम किंवा परशुराम असें म्हणतात. भार्गव हें कुलाचें नांव दिसतें. कारण च्यवन, गृत्स, मद वगैरेंना भार्गव नांवानें संबोधलेलें आढळतें. पर्शु नांवाचे लोक होते; किंवा त्या नांवाची एक जातहि असावी. पृथुपर्शवः असें म्हणून पृथूंचा (पार्थियन) व पर्शूंचा (पर्शियन) निर्देश करण्यांत येतो. ऋग्वेदांतील सुदास राजाचे पृथु व पर्शु हे सहायक होते. परंतु सुदासाचे शत्रु जे द्रुह्यु त्या द्रुह्यूंचे पुरोहित भृगु होते. म्हणून परशुराम हा पर्शूंपैकी असेल असें संभवत नाही. ऋग्वेदांत परशुरामाचा उल्लेख नाही हें मागे सांगितलेंच आहे. परंतु राम हा १०·११० ह्या सूक्ताचा विकल्पानें द्रष्टा आहे. सूत्रांत मात्र त्याचें नांव नाही. ह्याशिवाय १०·३·३ व १०·९३·१४ ह्या दोन ठिकाणीं राम शब्द आपणांस आढळतो. परंतु तेथे राम म्हणजे परशुराम असें कोणीच समजत नाही. एकंदरींत जमदग्निपुत्र राम ह्याचा स्पष्ट उल्लेख ऋग्वेदांत नाही हें खरें.

परशुराम हा चिरंजीव आहे अशी समजूत आहे. ह्याचा अर्थ तो पुष्कळ वर्षे जगला असाच समजला पाहिजे. वस्तुतः पाहतां जमदग्नीनें परशुरामाला तूं इच्छामरणी होशील असा आशीर्वाद दिला होता. परशु-

---

१ हिमालय नांवाचा दुसरा एक पर्वत धोलपूरनजीक आहे.

२ मुनशी. प्रा. भा. इ. सी. पृ. १६.

रामाला पुष्कळ आयुष्य लाभलें ह्यावरून ही आशीर्वादाची क्लृप्ति निघाली असावी. परशुरामाचा बाप जमदग्नि हा वैदिक ऋषि आहे. अथर्ववेदांत जमदग्नि हा कृमींचा नाश करण्यांत वाकबगार आहे अशी स्तुति केलेली आहे.[१] विश्वामित्राबरोबर जमदग्नि हा ऋग्वेदांत एका सूक्ताचा कर्ता आहे.[२] जमदग्नि विश्वामित्राचा स्नेही आणि वसिष्ठाचा शत्रु असें त्याचें वर्णन तैत्तिरीयसंहितेंत केलेलें आढळतें. परशुरामाचें नांव मात्र वेदांत कोठेंहि उल्लेखलेलें नाही. परंतु पुराणें परशुरामाच्या कथांनी भरलीं आहेत. तथापि भृगू हे ब्राह्मणांचे पक्षपाती व सृंजय राजांना वठणीस आणणारे असें त्यांचें वर्णन वेदांत आहे. सृंजय वीतहव्य अथवा वीतिहोत्र हा हैहयवंशांतील होता. हा पुढे ब्राह्मण झाला. भृगु हे अग्न्युपासक होते.

परशुराम हा रामावतारीं हयात होता इतकेंच नव्हे तर कृष्णावतारींहि जिवंत होता असें पुराणें सांगतात. परशुरामाच्याच सांगण्यावरून कृष्ण गोकर्ण पर्वतावर जाऊन राहिला. कार्तवीर्य आणि जमदग्नि ह्यांच्या भांडणापासून एकंदर कथेला प्रारंभ होतो. कार्तवीर्याच्या पराक्रमाला परशुरामाने पायबंद घातला हें आपण पाहिलेंच. कार्तवीर्याच्या मागून त्याचे वंशज तालजंघ यांनी मध्यदेशावर स्वाऱ्या केल्या आणि काशी व अयोध्या हीं राज्यें जिंकिलीं. तालजंघांच्या पश्चात् वीतहव्य आले. हे आपल्या पूर्वजांइतके पराक्रमी नव्हते. काशीच्या प्रतर्दन राजाने आपलें गेलेलें राज्य हैहयांपासून म्हणजे वीतहव्यांपासून परत घेतलें. परंतु त्याला हैहयांना पुरें चीत करतां आलें नाही. तें काम अयोध्येचा राजा सगर याने केलें. हैहयांनी आरंभीं मोठा दिग्विजय केला; परंतु अखेरीस त्यांचा समूळ नाश झाला. परशुरामाने त्यांना प्रथम हात दाखविला हें निःसंशय. शेवटला घाव कोणीं घातला हें

१ २-३२,३.

२ ३-१०,१६७,४.

तितकें निर्विवाद नाही. हैहयांच्या वैभवाचा प्रारंभ व अखेर ह्यांत बराच काळ लोटला असला पाहिजे. तो कित्येक पिढ्यांचा काल आहे. ह्या सर्व काळभर परशुराम जिवंत होता काय? का एकाहून अनेक परशुराम होते? का परशुरामासारख्या ब्राह्मणाने अतुल पराक्रम करून लोकांना दीपवून टाकल्यामुळे दुसऱ्यांकडून केलें गेलेलें कृत्य त्याच्या नांवावर लादलें गेलें? हा प्रश्न सोडवण्याचें आपणांस येथे प्रयोजन नाही. एवढी गोष्ट खरी की, परशुरामाच्या पराभवाविषयी अथवा निवृत्तीविषयी पुराणें मुग्ध आहेत. ह्या गोष्टी केवळ तर्कानेच ठरवावयाच्या आहेत. परशुरामाने सहस्रार्जुनाला मारलें हें त्याचें एकच शौर्याचें कृत्य आहे असें म्हणतां येणार नाही. कार्तवीर्याला मारल्यामुळे त्याला दक्षिणेंत पळून यावें लागलें हा तर्क बरोबर होणार नाही. एकवीस वेळां क्षत्रियांचा धुव्वा उडवला हें ऐतिहासिक सत्य मानणें भाग आहे. त्यामुळेच परशुरामाला अवतारांत गणलें गेलें; तो चिरंजीव म्हणजे अमर्त्य आहे असा समज उत्पन्न झाला आणि त्याच्याभोवतीं दंतकथांचें जाळें पसरलें गेलें. गंगाकांठावरून भार्गव मध्यदेशांत येऊन राहिले. तेथे त्यांनी क्षत्रिय राजांशीं शरीरसंबंध केले आणि वैभवशील झाले. ऋचीकाने सत्यवतीशीं लग्न करून कान्यकुब्जाधिपति कौशिकांशीं सोयरीक केली. जमदग्नीच्या यज्ञामुळे अयोध्येच्या ईक्ष्वाकु वंशाशीं नातें जडलें. च्यवन ऋषीची भार्या सुकन्या ही हैहय वंशांतील शर्याति राजाची कन्या होती. ह्यावरून भार्गवांच्या बायका क्षत्रियकन्या होत्या हें दिसून येईल. भार्गव हे हैहयांचे पुरोहित होते हें वर सांगितलेंच आहे. तेव्हा यजमान आणि पुरोहित ह्यांमधील हा कलह होता. परंतु तो पुढे विकोपाला गेला. परशुरामाने सहस्रावधि क्षत्रिय मारले असल्यामुळे त्याला शत्रु असणें स्वाभाविक होतें. अशा स्थितींत विंध्याद्रीच्या दक्षिणेस फारशी वस्ती नसल्यामुळे त्या बाजूला परशुराम व इतर ब्राह्मण येऊन राहणें

स्वाभाविक आहे. तथापि पश्चिम किनाऱ्यावर कोणत्या जागीं परशुराम प्रथम आला व त्याच्याबरोबर कोण लोक आले हा अद्यापि वादग्रस्त प्रश्न आहे.

गणेशपुराणांत परशुरामाविषयी खाली लिहिल्याप्रमाणे माहिती मिळते. श्वेतद्वीपामध्ये जमदग्नि म्हणून विख्यात महामुनि होऊन गेला. त्याची रेणुका नामक पत्नी होती. तिच्यापासून जमदग्नीला राम नांवाचा मुलगा झाला. पितृगृहीं कांही विद्या शिकल्यानंतर अनेक विद्यांचा अभ्यास करण्यासाठी राम नैमिषारण्यांत गेला. तेथे कार्तवीर्य राजा आपल्या प्रचंड सैन्यासह सह्याद्रीच्या शिखरावर जमदग्नीच्या आश्रमांत आला. मुनीचें दर्शन होऊन अर्घ्य, पाद्य, इत्यादि उपचार झाल्यानंतर जमदग्नीने राजास गाय दिली व शिष्याकडून सर्वांचें पूजन करविलें. नंतर मुनीने त्या राजाला तुझें नांव काय व तूं काय हेतूने आला आहेस असें विचारलें असतां राजाने उत्तर दिलें आपलें कर्तव्य बजावणाऱ्या राजाला कांही मागावयाचें नसतें. मी कृतवीर्याचा मुलगा कार्तवीर्य नावाचा आहें. आपल्यासारख्यांचें दर्शन हेंच माझें कार्य. तें माझें कार्य आता झालें. आपण आज्ञा दिल्यावर मी आपल्या नगराप्रत जाणार आहें. हें ऐकून मुनीने राजाला भोजनाचा आग्रह केला. परंतु एवढ्या सैन्याला जेऊं घालण्याचें सामर्थ्य मुनीमध्ये कोठून असणार अशा समजुतीने न जेवतांच परत जाण्याचा त्याने निश्चय केला. परंतु मुनीने तपस्व्यास असाध्य कांहीच नसतें; मी तुझ्या सैन्यास यथेच्छ भोजन घालूं शकेन; तूं नदीच्या तीरावर क्षणभर विश्रांति घे; तोंपर्यंत अन्न सिद्ध होईल असें सांगितलें. आणि त्याप्रमाणे खरोखरच आपल्या कामधेनूची प्रार्थना करून तिच्या प्रसादाने मुनीच्या पत्नीने भोजनाची उत्तम प्रकारें व्यवस्था केली. राजवाड्याप्रमाणे अरण्यामध्ये मुनीला सर्व व्यवस्था करतां आली ह्याचें राजाला आश्चर्य वाटलें. परंतु हें सर्व काम-

धेनूच्यामुळे मुनीला करतां आलें हे ऐकतांच राजाने कामधेनूची[1] मागणी मुनीजवळ केली. या मागणीने जमदग्नीला संताप आला. पुढे त्या धेनूकरता त्या दोघांमध्ये युद्ध होऊन अखेरीस कार्तवीर्याचा पराभव झाला. तथापि जमदग्नि राजाच्या हातून मारला गेला. पतीच्या वधामुळे रेणुका राजास कांही बोलली असतां राजाने तिलाहि एकवीस बाण मारून विव्हल केलें. त्या वेळीं राम आश्रमांत नव्हता. परंतु पुढे थोड्याच वेळाने राम आश्रमांत येऊन पाहतो तों पिता मरून पडला आहे व माता मरणोन्मुख स्थितींत आहे असें आढळलें. प्राण सोडण्यापूर्वी रेणुकेने आपल्या मुलाला बजाविलें कीं ज्या अर्थी माझ्या शरीरांत कार्तवीर्याने एकवीस बाण मारले आहेत त्या अर्थी तूं एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी कर. तसेंच ज्या ठिकाणीं कोणींहि जाळलें नसेल त्या ठिकाणीं तूं आमचा संस्कार कर. सर्वज्ञ दत्तात्रेयमुनीस बोलावून आमचे तेरा दिवस कर्मान्तर कर. इतकें सांगून रेणुकेने देहत्याग केला. रेणुकेने सांगितल्याप्रमाणे जमदग्नीची यथा-शास्त्र उत्तरक्रिया केल्यावर कार्तवीर्याला मारण्याची पूर्वतयारी म्हणून शंकराच्या सांगण्यावरून रामाने पृथ्वीपर्यटन करीत करीत कृष्णानदीच्या उत्तरदेशांत वस्ती करून अनुष्ठान करण्यास आरंभ केला. तेथे गजानन प्रकट होऊन त्याने रामाला एक परशु दिला व ह्या परशूच्या योगाने तूं विजयी होशील असा त्यास वर दिला आणि अखेरीस तूं परशुराम ह्या नांवाने त्रैलोक्यांत प्रसिद्ध होशील असा आशीर्वाद दिला.

दुसरी एक कथा[2] पुराणकारांनी ग्रथित केली आहे ती अशी :— ब्राह्मणांना परशुरामाने पृथ्वी दान केल्यावर तेथे आचमनसुद्धा करूं नये

१ कामधेनु म्हणजे सुरभि. म्हैसूर संस्थानांत सोराब नांवाचा तालुका आहे. सुरभि म्हणजे सोराब तर नाही ? सुरभि मागितला म्हणजे सोराब प्रांत मागितला ?

२ केदारविजय अध्याय १.

असें मनांत आणून तो पश्चिमसमुद्रावर आला. तेथे वाळवींचीं घरें हजारों होतीं. तीं समुद्राच्या लाटांनी उद्ध्वस्त होत. तेव्हा त्या उदींनी समुद्राला म्हटलें की तूं समर्थ म्हणून आम्ही तुझा आश्रय मिळेल ह्या हेतूने कुटुंबानिशीं येथे येऊन राहिलों असें असून आमचा संहार कां करतोस? लहान मोठ्या, बऱ्या वाईट सर्व वस्तूंचा मोठे लोक संग्रह करतात. तुझें नांव मोठें पण बालविधवेला सावित्री म्हणण्यासारखी तुझी स्थिति आहे. आम्ही तुला शरण आलों आहों. आमचा सांभाळ कर. त्यावर समुद्राने वाळवींना निर्भय राहा असें आश्वासन दिलें. त्यामुळे पश्चिम समुद्रकिनाऱ्यावर वारूळ विस्तीर्ण वाढलें. कांही काळाने उदींच्या बेटांत परशुराम आला. तेथे त्याने आपलें धनुष्य ठेविलें आणि जपाला बसला. हें पाहतांच उदींनी परशुरामाच्या धनुष्याची शतपदरी दोरी होती तिचा एक पदर ठेवून बाकीचे सर्व खाऊन नष्ट केले. पुढे परशुरामाने बाण मारण्यासाठी धनुष्याची दोरी ओढली ती तुटून गेली. तरीसुद्धा तेवढ्याने समुद्रांत भयंकर क्षोभ झाला. तेव्हा शतपदरी धनुष्य कायम राहतें तर माझा पुरा नाश झाला असता. ह्या वाळवींचे माझ्यावर अनंत उपकार आहेत असें समुद्रास वाटलें. भार्गवाने दहा योजनें समुद्र आपल्या बाणाने मागे हटविला आणि तेथे तो आश्रम करून राहिला.

बनवासी येथील स्थलमाहात्म्यांत कथा आहे ती अशी:— मयूरवर्म्याचा मुलगा चन्द्रांगद ह्याने केरल, तुलव, हैग, कोंकण व करहाट ह्या प्रांतांत ब्राह्मणांची वसाहत करविली. नंतर परशुराम ह्या देशाला आला तेव्हा त्याच्याबरोबर चौसष्ट कुटुंबें होतीं. त्यांच्यांत परशुरामाने वैदिक परंपरा स्थापन केली. परंतु या चौसष्ट ब्राह्मणांचे पूर्वीच्या ब्राह्मणांशीं जमेना. परशुरामाने आपल्याबरोबर आणलेले ब्राह्मण म्हणजे चित्पावन होत. आर्यनाडदेशांतून हे ब्राह्मण आणले. पर्पर (बर्बर?) देशाच्या ब्राह्मणांना

मधिन्यनळ ही संज्ञा असे. चन्द्रांगदानेच ह्यांना कांही हक्क दिले.[१]

*ह्या सर्व हकीकतीवरून परशुरामाचा संबंध कोंकणापेक्षा गुजराथ व कानडी मुलुखांत जास्त असल्याचें स्पष्ट दिसतें. परंतु दुसऱ्या एका प्रकरणांत निर्दिष्ट केलेल्या दन्तकथेवरून कोंकणांत परशुराम आधी आला, नंतर चित्पावन ब्राह्मण आले असेंच म्हणावें लागेल.* परशुराम हा मूळचा कोणत्याहि देशाचा असो. त्याचें पराक्रमक्षेत्र हिंदुस्थान आहे. सोपाऱ्यापर्यंतचा प्रांत त्याच्या स्वामित्वाखाली होता. कोंकणांत तो सोपाऱ्याकडूनच गेला असावा. परशुराम निर्जन देश बघून कोंकणांत राहावयास गेला असावा. तेव्हा त्याच्याबरोबर पुष्कळ लोक जाणें संभवनीय नाही. कांही गेलेच तर तुरळक गेले असतील. कोंकणांत परशुरामाने पराक्रम केल्याचें वर्णन कोठेंहि आढळत नाही. सारांश, परशुरामाने चित्पावन आपल्याबरोबर आणले असें मानण्यास आधार नाही.

---

१ सॅलेटोर ३२६.

## ३ गोत्रें

*चित्पावनांत १४ गोत्रें आहेत. म्हणजे सर्व चित्पावन ब्राह्मण १४ गोत्रांत वांटले जातात. तीं गोत्रें येणेंप्रमाणेः– १ अत्रि, २ कपि, ३ काश्यप,* ४ कौंडिण्य, ५ कौशिक, ६ गार्ग्य, ७ जामदग्न्य, ८ नित्युंदन, ९ बाभ्रव्य, १० भारद्वाज, ११ वत्स, १२ वासिष्ठ, १३ विष्णुवृद्ध, १४ शांडिल्य. शब्दकल्पद्रुमांत मनु व धर्मप्रदीपकार ह्यांनी सांगितलेलीं २४ गोत्रें दिलीं आहेत त्यांत वत्स, कपि, बाभ्रव्य, नित्युंदन, विष्णुवृद्ध ह्या गोत्रांचा उल्लेख नाही. पूर्वी चोवीसच गोत्रें होतीं असें दिसतें. अत्रि, काश्यप, शांडिल्य, वासिष्ठ वगैरे कित्येक गोत्रें हिंदुस्थानांत सर्वत्र म्हणजे प्रत्येक गोत्र असलेल्या जातींत आढळतात. तसेंच दुसरें कोणतेंहि गोत्र इतरत्र कोठे तरी आढळतेंच. त्यामुळे एका गोत्राचीं सर्व माणसें एकाच रक्ताचीं आहेत असा आग्रह धरल्यास काय प्रसंग ओढवेल तें सांगवत नाही; चातुर्वर्ण्यच लुप्त होईल.

ब्राह्मणांना गोत्रें आहेत ह्याविषयी वाद नाही, परंतु क्षत्रियांना गोत्रें होतीं कीं नाही ह्यासंबंधाने मतभेद आहे. राजाने पुरोहिताचा प्रवर लावावा असें वचन आहे (पुरोहितस्य प्रवरेण राजा वृणीते–आपस्तंबसूत्र). तसेंच सर्व क्षत्रियांना व सर्व वैश्यांना एकच प्रवर कित्येकांनी सांगितला आहे (पुरोहितप्रवरो राज्ञामथ यदि सार्षं प्रवृणीरन् मानवैलपौरूरवसेति; वैश्यांचा प्रवर "भालंदनवात्सप्रिमांकीलेति"). ह्यावरून पूर्वी क्षत्रिय-वैश्यांना प्रवर नसावेत असें वाटतें; अर्थात् गोत्रेंहि नसावीं असें मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होते. अग्निपुराण तर स्पष्टच तसें म्हणतें; क्षत्रिय-

वैश्यशूद्राणां गोत्रं च प्रवरादिकम् तथान्यवर्णसंकराणाम् येषां विप्राश्च याजकाः. ऐतरेयब्राह्मणकालीं हेंच मत प्रचलित होतें. "पुरोहितस्य आर्षेयेण दीक्षामावेदयेयुः पुरोहितस्य आर्षेयेण प्रवरं प्रवृणीरन्." क्षत्रियाने यज्ञाच्या वेळीं पुरोहिताचें गोत्र घ्यावें (७.१४८). गोत्र-ऋषि ह्या शब्दावरून गोत्रकार ऋषिच असला पाहिजे हें अनुमान करणें भाग आहे. ऋषींमध्ये ब्राह्मणांप्रमाणे क्षत्रिय, वैश्य ह्यांचा समावेश होतो कीं नाही ह्याबद्दल निश्चित मत नाही. देव, पितर, मनुष्य, ऋषि हे निरनिराळे समाज होते असें ब्राह्मण, पुराणें इत्यादि अनेक ग्रंथांवरून सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. "देवर्षिमानवाः" असा शब्दप्रयोग वारंवार येत असतो. ऋषींचें वैशिष्ट्यहि थोडेंसें आपणांस सांगतां येतें. वेदमन्त्र करणारांस ऋषि ही संज्ञा आहे. वेदांचा आणि ऋषींचा निकट संबंध दाखवितां येतो; ऋषि अरण्यामध्ये राहत; ते राजांच्या आश्रयाने असत. ते यज्ञ करीत; यज्ञांतील पुरोहितत्व तर त्यांच्याकडेच असावयाचें. अध्यापनाचें काम ऋषींचें होतें. क्षत्रिय, वैश्य हे अध्यापनाकरता ऋषींकडे जाऊन राहत. ह्यालाच उपनयन म्हणत. ऋषि बहुधा विवाहित असल्यामुळे गृहस्थाश्रमी असत. ८८००० ऋषि असल्याचें पुराणांत कथन केलें आहे.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हेहि स्वतंत्र समाज होते असें आमचें मत आहे (वैदिक निबंध—चातुर्वर्ण्य पाहा). देवांमध्ये, ब्राह्मणांमध्ये आणि क्षत्रियांमध्ये जे ऋषि असत त्यांस अनुक्रमें देवर्षि, ब्रह्मर्षि आणि राजर्षि अशा संज्ञा असत. वेदांतील थोड्या मंत्रकर्त्या राजांवरून प्रथम राजर्षि हा शब्द प्रचारांत आला असावा. तथापि देवर्षि आणि राजर्षि ह्या सन्मानार्थी संज्ञा असाव्या. हे ऋषि अरण्यांत राहत असें नाही. नारद हा देवर्षि होता. तो तर आजन्म ब्रह्मचारी होता. त्याने यज्ञ केले अथवा शिष्यांस शिकविलें असा कोठेहि उल्लेख नाही. ऋषितर्पण घरांत करावयाचें नसतें; घराबाहेर जाऊन करावें लागतें.

ह्यावरूनहि ऋषि ग्रामस्थ नसत असा सयुक्तिक तर्क करतां येण्यासारखा आहे. अध्यापन हें ऋषींचें प्रमुख कर्तव्य असल्याकारणाने ब्राह्मणाने त्यांचें ऋण फेडावयाचें तें वेदाध्ययन करूनच फेडतां येतें. प्राचीन ऋषींपैकी अमुक क्षत्रिय होता किंवा वैश्य होता हें सांगणें कठीण आहे. पुराणकारांनी हें ठरविण्याचा प्रयत्न केला, परंतु त्यांचा आधार डळमळीत दिसतो. तथापि ऋषींपैकी महर्षि जे सप्तर्षि हे ब्राह्मण असून ब्राह्मणांची उत्पत्ति सप्तर्षींपासून आहे असें वायुपुराणांत स्पष्टच म्हटलें आहे "मनोः क्षत्रं विशश्चैव सप्तर्षिभ्यो द्विजातयः" (अध्याय ६२, श्लोक २२). म्हणजे मनूपासून क्षत्रिय व वैश्य, आणि सप्तर्षींपासून ब्राह्मण झाले असें वायुपुराणकाराचें मत आहे. हा आधार जमेस धरला तर ऋषींमध्ये क्षत्रिय-वैश्यांचा अन्तर्भाव होत नाही असें म्हणावें लागतें. ऋषितर्पणांत मनूचा निर्देश नाही; योगीश्वर याज्ञवल्क्याचा आहे हीहि गोष्ट विचार करण्यासारखी आहे. वायुपुराणांत ऋषि हे देवपुत्र आहेत (ऋषयो देवपुत्राश्च —अध्याय ६२, श्लोक २१) असें सांगितलें आहे. म्हणजे देव→ऋषि→ब्राह्मण हे सर्व एकच होत.[1] सप्तर्षि हे ब्राह्मण होते असें वायुपुराणांत स्पष्ट म्हटलें आहे *"एते सप्तर्षयो विप्रा ब्रह्मक्षेत्रनिवासिनः" (अ. ५९, श्लो. १०६). "प्रवर्तयन्ते वेदांश्च भुवि सप्तर्षयो द्विजाः" (अध्याय १५०, श्लोक २१) असें अग्निपुराणांत वचन आहे. त्यावरून सप्तर्षि हे वेदप्रवर्तक होत असें उघड दिसतें. विष्णुपुराण अंश ३, अध्याय २ मध्ये असाच श्लोक आहे. या सर्व विवेचनावरून ऋषि ब्राह्मण होते व त्यांनाच गोत्रें होतीं, क्षत्रिय-वैश्यांना गोत्रें नसावीं असें सिद्ध होतें.*

आता गोत्र शब्दाचा अर्थ काय त्याचा विचार केला पाहिजे. ऋग्वेदांत गोठा, कळप, दुर्ग अशा अर्थी गोत्र शब्द वापरलेला दिसतो

[1] वसिष्ठ हा मित्रावरुणांचा पुत्र (ऋ. ७.३३.११).

गोत्रऋषि म्हणजे पूर्वज व त्या गोत्रांतील सर्व लोक त्याचे वंशज असा सध्या रूढ अर्थ आहे. अशा अर्थाने गोत्र शब्द ऋग्वेदांत वापरलेला दिसत नाही. पुढच्या वाङ्मयांत हा अर्थ गोत्र शब्दाला प्राप्त झाला ह्यांत शंका नाही. तथापि ह्या एकाच अर्थाने गोत्र शब्द समजणें चुकीचें होईल. गोत्रावरून आडनांवेंहि पडलीं होतीं ह्यांत संशय नाही. उ. वासिष्ठाः, काण्वाः, भार्गवाः, कापिलेयाः. ह्याचा अर्थ वसिष्ठाच्या, कण्वाच्या, भृगूच्या, कपिलाच्या वंशांतील. तथापि असें दिसतें की काण्व, वासिष्ठ, भार्गव हे स्वतः गोत्रऋषि होते (चेन्त्सलरावांचें गोत्रप्रवरनिबंधकदंबम् पाहा). म्हणून वासिष्ठगोत्री का वसिष्ठगोत्री हा संशयोत्पादक प्रश्न राहतो. वसिष्ठा एव वासिष्ठाः असें मत्स्यपुराणकार म्हणतात[1]. आत्रेय हा प्रवरऋषि आत्रेगणातला असून अत्रि हें गोत्र आहे. पहिला अत्रि कीं आत्रेय!

धर्मशास्त्रकारांनी सगोत्रविवाहाला मनाई केली आहे ह्यांत गोत्रऋषि हा त्या घराण्याचा किंवा कुलाचा मूळपुरुष आहे अशी समजूत आहे. उ. कौशिकगोत्राचा मुलगा व त्याच गोत्राची मुलगी ह्यांचा विवाह शास्त्राने निषिद्ध मानला आहे; कारण दोनहि एका रक्ताचीं आहेत, त्यांच्यांत सहोदरत्व आहे ही कल्पना. वारसहक्कांचा विचार करतांना ही सहोदरत्वाची कल्पना शास्त्रकारांच्या ठिकाणीं होती ह्यांत संदेह नाही. तथापि सगोत्रविवाहनिर्बंध फार जुना नसावा असा जो तर्क करण्यांत आला आहे तो बरोबर आहे. गोत्रसंस्था प्राचीन मानली तर कित्येक स्मृतिकारांनी पैत्रिक पिढ्यांची मर्यादा विवाहाच्या बाबतींत घातली आहे तिचें प्रयोजन दिसत नाही. असो.

गोत्राची प्राचीनतम कल्पना सोदरत्वाची नाही ह्याविषयीं आम्हांस

---

१ अ. १०० श्लो. २.

संशय वाटत नाही. गोत्र हें जन्मतः प्राप्त होत नसून उपनयनाने प्राप्त होत असतें. मातापित्यांच्या कामप्रेरित संयोगापासून झालेल्या जन्माला संभूति म्हणतात. ह्या जन्माला आर्यांच्या धर्मशास्त्रांत कांहीच स्थान नाही. दुसरा जन्म म्हणजे उपनयन. तो सर्वांत श्रेष्ठ. "आचार्यस्त्वस्य यां जातिं विधिवद्वेदपारगः। उत्पादयति सावित्र्या सा सत्या साजरामरा॥" (मनु अ. २ श्लो. ४८)

उपनयनानंतर गोत्र प्राप्त होतें. उपनयनाच्या पूर्वी मूल मेलें तर तें सगोत्री झालें नसल्यामुळे सर्व गोताला त्याचें सुतकसोयर धरावें लागत नाही. उपनयनानंतर मुलगा गोत्रांत शिरतो. मुलीच्या उदाहरणावरून हें तत्त्व चांगलें विशद होतें. कन्येचा विवाह हेंच तिचें उपनयन असें मनु म्हणतो. ह्या वैवाहिक उपनयनानंतर कन्या पतिगोत्र स्वीकारते. पतीच्या घरांत तिचा जन्म झाला असें समजून तिचें नामकरणहि करतात. विवाहानंतर पित्याच्या गोत्राशीं तिचा कोणताहि संबंध राहत नाही- पित्याच्या मिळकतीवर तिचा हक्क नसतो. सारांश, पित्याच्या कुळाशीं तिचा संबंध तुटतो. अशीच स्थिति प्राचीनकाळीं मुलाच्या उपनयना. नंतर होत असे "ब्रह्मचारी आचार्यं परिचरेत् आशरीरविमोक्षणात्". मरे-पर्यंत ब्रह्मचाऱ्याने आचाऱ्याची सेवा करावी असें वसिष्ठधर्मसूत्र आहे (अ.७.४). गौतमाने पिण्डसंबंध व गोत्रऋषिसंबंध असा भेद दर्शविला आहे. (पिण्डगोत्रऋषिसंबंधा रिक्थं भजेरन् स्त्रीचानपत्यस्य) उपनयन होण्याच्या पूर्वी मुलाला दत्तक घ्यावा असें पूर्वीचें शास्त्र होतें. कारण उपनयनानंतर तो परगोत्री होतो. तात्पर्य, जेव्हा मुलाला गुरूच्या घरीं अध्ययनाकरता ठेवण्याची वहिवाट होती तेव्हा गुरूचें गोत्र शिष्याला मिळे. कौशीतकी सूत्रावरून ही प्राचीन चाल समजून येते. "समानार्षेयो

१ धर्मसूत्र २८.२१ quoted by Kane.

भवान् ब्रूहि; समानार्षेयोऽहम् भोः" असें उपनयनाच्या वेळीं शिष्य गुरुला म्हणतो. उपनयनाने गुरु व शिष्य समानप्रवर होतात हें उघड दिसतें. स्मृतींच्या पूर्वी ही चाल अस्तित्वांत होती व स्मृतिकालीं तिचा लोप झाला होता इतकी ती जुनी आहे[१]. हल्ली वेदविद्या शिकविणारे ऋषि नसल्यामुळे बापच गुरु होऊन आपल्या मुलाचें उपनयन करतो. प्रयोगकार व स्मृतिकार पित्यावांचून अन्याला गुरु म्हणून ओळखीत नाहीत. ह्या कारणाने अनुयायित्व अथवा शिष्यत्व आणि सोदरत्व ह्यांचें एकीकरण होऊन गुर्वार्जित गोत्राचा लोप झाला. मुलगा जनक बापाच्या घरीं फक्त पहिलीं आठ वर्षें असावयाचा, नंतर गुरुगृहीं बारा अथवा चोवीस वर्षेंहि त्याला काढावीं लागत. म्हणून गुरूची योग्यता फार मानीत. सारांश, गोत्र म्हणजे गुरुपरंपरा असें म्हणण्यास हरकत नाही. ह्या परंपरेची व्याप्ति इतकी होती की, तिच्यामुळे मनुष्य ओळखण्यास सुलभ पडे. म्हणून करारांत नांव, गांव, जात वगैरेबरोबर गोत्रहि लिहून घ्यावें असें कौटिल्य म्हणतो (अध्याय ५८).

एकुलती एक मुलगी ज्याला आहे तो तिच्या लग्नाच्या वेळीं जांवयाबरोबर करार करी की हिला मुलगा होईल तो माझा. अशा मुलीला पुत्रिका म्हणत. ह्या मुलाने आपल्या आईचें श्राद्ध मातामह गोत्राने करावें असें वचन आहे. "मातामहस्य गोत्रेण मातुः पिण्डोदकक्रियाम् । कुर्वीत पुत्रिकापुत्रः एवमाह प्रजापतिः" इति लौगाक्षिः (प्रयोगपारिजात).

आमच्या मतें हा नातू पूर्वी आजाचें गोत्र लावीत असावा.

गोत्र हें प्रवरान्वित असतें म्हणून प्रवरांचाहि संक्षेपतः विचार करणें अवश्य आहे.

---

१ भागवत स्कंध ७, अ. १२, श्लोक १३।१४.

चौदा गोत्रांचे प्रवर येणेंप्रमाणेः—

| गोत्र | प्रवर |
|---|---|
| अत्रि | आत्रेय, आर्चनानस, श्यावाश्व |
| वासिष्ठ | वासिष्ठ, इन्द्रप्रमदा, भरद्वसु |
| कौंडिण्य | वासिष्ठ, मैत्रावरुण, कौंडिण्य |
| कौशिक[1] | वैश्वामित्र, अघमर्षण, कौशिक |
| काश्यप[2] | काश्यप, आवत्सार, नैध्रुव |
| शांडिल्य | शांडिल, असित, दैवल |
| गार्ग्य[3] | आंगिरस, शैन्य, गार्ग्य |
| भारद्वाज | आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज |
| कपि | आंगिरस, आमैह्यव, औरुक्षस |
| जामदग्न्य | भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व, जामदग्न्य |
| विष्णुवृद्ध[4] | आंगिरस, पौरुकुत्स, त्रासदस्यव |
| वत्स | भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व, जामदग्न्य |
| नित्युंदन | आंगिरस, पौरुकुत्स, त्रासदस्यव |
| बाभ्रव्य[5] | विश्वामित्र, औदल, बाभ्रव्य |

ह्यांत विष्णुवृद्ध व नित्युंदन ह्या दोन गोत्रांचे प्रवर सारखे आहेत. तसेंच वत्स आणि जामदग्न्य ह्यांचा प्रवर एकच आहे. दोघेहि पंच-

१ नागपूरचे देवल विश्वामित्र, अघमर्षण, कौशिक असा प्रवर उच्चारतात. वैश्वामित्र म्हणत नाहींत.

२ मिरजचे दा. मो. भट व वासुदेव गोपाळ भट (पुराणिक) हे काश्यप, अवत्सार, असित असा प्रवर म्हणतात.

३ अणसुऱ्याचे गाडगीळ गार्ग्य, आंगिरस, भारद्वाज हे आपले प्रवरऋषि मानतात.

४ मिटगांवण्याचे परांजपे ह्यांच्या प्रवरांत पौरुकुत्स, आंगिरस, भारद्वाज हे ऋषि येतात.

५ ऋषींच्या नांवांत उच्चारभेद आढळतात.

प्रवरी आहेत. वत्सजामदग्न्यांच्या प्रवरांत वत्स ऋषि कोठेंच आढळत नाही हें विशेष आहे. नित्युंदन आणि कपि ह्यांमध्यें तर नित्युंदनहि नाही व कपिहि नाही. त्याचप्रमाणे विष्णुवृद्धालाहि त्याच्या प्रवरांत स्थान नाही. जमदग्नि आणि वत्स हे भृगुगणांपैकी आहेत. भृगूंचे एकंदर पांच गण आहेत ते—

जामदग्न्या वीतहव्यास्तथा गार्त्समदा अपि ।

वाध्य्यश्वाश्चैव वैन्याश्च भृगोः पञ्च गणाः स्मृताः ॥

ह्यावरून असें दिसतें की, वत्सांचा स्वतंत्र गण नाही; जमदग्नि-गणांत त्यांचा समावेश होतो. उ. वत्सा विदा आर्ष्टिषेणा इत्येते जमदग्नयः. वत्सांना जामदग्न्यवत्स असें म्हणतात. येथे जामदग्न्य हें वत्सांचें विशेषण आहे. ह्यावरून एका गोत्रांतून अनेक गोत्रें निघतात असें सिद्ध होतें. प्रथम भृगुगण. त्यांत जमदग्नि गोत्रकर्ता आणि त्यांतहि अनेक गोत्रें असा प्रकार असल्याचें अभिनवमाधवीयाच्या प्रस्तावनेवरून वाटतें. तो म्हणतो— "अथ द्वितीये प्रकरणे भृगुगणः । तत्र गोत्रकर्ता जमदग्निः । तस्य गोत्राणि शुद्धभृगुगणा निरूप्यन्ते." गोत्रकार दहा आहेत; जसें "शुद्धभृगवः शुद्धांगिरसः गौतमो भरद्वाजो जमदग्निरत्रि-र्विश्वामित्रः कश्यपोऽगस्त्यो वसिष्ठः इति एते दशगोत्रकर्तारः" ह्यांनाच गोत्रकार म्हणण्याचें कारण काय?

गोत्रकार थोडे असले तरी गोत्रें मात्र असंख्य आहेत "गोत्राणां तु सहस्राणि प्रयुतान्यर्बुदानि च" ( माधवाचार्य ). नित्युंदन हें गोत्रनाम कोठून आलें समजत नाही. श्री. चेन्त्सलराव ह्या ऋषीचें नांव देत नाहीत. विष्णुवृद्ध व नित्युंदन ह्यांचा प्रवर एकच आहे. त्यामुळे विष्णु-वृद्धांत नित्युंदन समाविष्ट झाला असावा. विष्णुवृद्ध हाच मुळी केवलाङ्गि-रसगणापैकी आहे आणि विष्णुवृद्धांत नैतुन्द्य व नितुन्दिल असे दोन ऋषि

आढळतात; तथापि नित्युन्दनाशीं ह्यांचा संबंध जोडतां कसा येणार तें समजत नाही. विष्णुवृद्ध व नित्युंदन एकाचींच नांवें नाहीत ना ?

काश्यप आणि वासिष्ठ यांचे प्रवर भिन्न आहेत. काश्यप आणि वासिष्ठ अशा दोन गोत्रांचे कित्येक लोक असल्याचें प्रवरमंजरीवरून दिसतें. दिवसा वसिष्ठगोत्री आणि रात्रीं कश्यपगोत्री असे लोक होतात असें प्रवरमंजरीकार म्हणतात (दिवा वसिष्ठाः इत्येते नक्तं ज्ञेयाश्च कश्यपाः). मत्स्यपुराणांतून वरील वचन मञ्जरीकारांनी उद्धृत केलें आहे. असें असूनहि काश्यपवासिष्ठांचा विवाहसंबंध होण्यास प्रत्यवाय नाही. कश्यपाचा मुलगा लोगाक्षी याचें उपनयन वसिष्ठाने केलें म्हणून लोगाक्षी दिवसा वसिष्ठ व रात्रीं कश्यप होता म्हणून लोगाक्षी गोत्राचें कश्यप व वसिष्ठ गोत्राशीं जुळत नाही असें गोत्रप्रवरमंजरीमध्ये माधवाचार्य सांगतात.

"लोगाक्षिः कश्यपसुतो वसिष्ठेनोपनीतवान् ।
अहर्वसिष्ठो रात्रौ तु कश्यपस्तेन स स्मृतः ॥" ६५

ह्याच्यावरील व्याख्याहि बोधप्रद आहे.

उपनयनं द्वितीयं जन्म । उपनयनस्य दिवा विहितत्वात् अहर्वसिष्ठत्वम् । निषेकस्य प्रथमजन्मनः रात्रौ जातत्वात् च रात्रौ कश्यपत्वम्......अत एव भिन्नगोत्रे उपनीतस्य द्व्यामुष्यायणत्वम् अहरुपदेष्टृ रात्रौ निषेक्तुरिति. धर्मशास्त्रें रचलीं गेलीं त्यापूर्वी उपनयन करणाराचें गोत्र उपनीताला मिळत होतें हें ह्यावरून सिद्ध होतें. आमच्या मतें एकच गोत्र त्या वेळीं उपनीताचें असावें. पुढे जेव्हा पिताच उपनयन करूं लागला तेव्हा भिन्न गोत्राचा प्रश्न उत्पन्न होण्याचें कारण नाही. परंतु खऱ्या प्रकाराचा विसर पडून उपनयन दुसऱ्याकडून झाल्यास दोन गोत्रांची कल्पना निघाली. लोगाक्षी धरून तेरा जण द्व्यामुष्यायणी आहेत. ह्या सर्वांचे आपसांत विवाह होतात. कश्यपवसिष्ठांशीं मात्र होत नाहीत.

काश्यपांत तीन भेद—निध्रुव, रैभ आणि शाण्डिल. काश्यपावत्सार नैध्रुवेति हा प्रवर नैध्रुवांचा आहे. म्हणजे सध्या कश्यपगोत्री जे हा प्रवर उच्चारतात ते सर्व निध्रुव आहेत असें दिसतें. शण्डिलांचा प्रवर "काश्यपावत्सारशाण्डिल्येति" असा असून रेभ्यांचा प्रवर "काश्यपावत्साररैभेति" असा आहे. काश्यप आणि शांडिल्य गोत्रांचें जमत नाही असें म्हणतात. परंतु काश्यपांपैकी जे शाण्डिल असतील त्यांचेंच फक्त शाण्डिल्यगोत्राशीं जमूं नये. कारण दोघांच्या प्रवरांत शाण्डिल्य ऋषि समान आहे[1]. "काश्यपावत्सारनिध्रुवेति" असा प्रवर म्हणणाऱ्या काश्यपगोत्री नैध्रुवांचें शाण्डिल्यांशीं जमण्यास अडथळा नसावा. अवत्सार हा ५ व्या मंडलांतील ४४ व्या सूक्ताचा द्रष्टा आहे.

वसिष्ठांमध्ये कौंडिण्याचा समावेश होतो. वसिष्ठांचे मुख्य पांच गण आहेत. "वसिष्ठाः कुण्डिनाः उपमन्यवः पराशराः जातुकर्ण्यांश्चेति." *म्हणून कौण्डिण्यांचा प्रवर "वासिष्ठमैत्रावरुण कौंडिण्येति" असा आहे. आणि वासिष्ठांचा "वासिष्ठेन्द्र प्रमदाभरद्वसु इति" हा प्रवर आहे[1]. वासिष्ठगणांत आम्हांला इंद्रप्रमद आणि भरद्वसु ह्या ऋषींचा पत्ताच लागला नाही. हे मन्त्रकार असल्याचेंहि माहीत नाही.*

कौशिक आणि बाभ्रव्य ह्यांच्या प्रवरांत विश्वामित्र ऋषि तिहींपैकी एक आहे म्हणून हीं दोन गोत्रें अविवाह्य होत. प्रवरांत एका ऋषीची जरी अनुवृत्ति झाली तरी समानगोत्रत्व होतें असें गोत्रप्रवरनिर्णयकार म्हणतात; "एकएव ऋषिर्यावत् प्रवरेष्वनुवर्तते । तावत्समानगोत्रत्वं अन्यत्राङ्गिरसो भृगोः" ॥ २०; ह्या नियमाला भृगुअङ्गिरसांच्या बाबतींत अपवाद आहे. कौशिक गोत्राचा प्रवर "वैश्वामित्राघमर्षणकौशिकेति" असा आहे.

---

१ कांही वासिष्ठांचा प्रवर एकार्षेय आहे असें मत्स्यपुराणावरून दिसतें.
(अ. २००, श्लो. १)

विश्वामित्र हा स्वतः कुशिकाचा नातू असल्यामुळे कौशिक आहेच. अघमर्षणांचा हाच प्रवर आहे. म्हणजे अघमर्षण व कौशिक ह्यांचा प्रवर एकच आहे. विश्वामित्रगणांपैकी अघमर्षण व कुशिक हे आहेत. कात्यायन लोगाक्षीच्या मताप्रमाणे बाभ्रव्य हेहि विश्वामित्रगणांत मोडतात. "विश्वामित्र-अवदल बाभ्रव्येति" हा बाभ्रव्यांचा प्रवर. बाभ्रव्य हा मन्त्रकार ऋषि नाही.

शांडिल्य गोत्राचा प्रवर "शांडिलासितदैवलेति" हा आहे. शंडिल हे कश्यपगणान्तर्गत आहेत. असित व देवल हे कश्यपकुलांतील ऋषि असल्याचें सर्वानुक्रमणीवरून म्हणावें लागतें. सर्वानुक्रमणीकार ह्या ऋषिद्वयास सूक्तद्रष्टे म्हणून संबोधितात. ऋग्वेदांत त्यांच्या नांवावर ९ व्या मंडळांत ५ ते २४ हीं सूक्तें आहेत. परंतु त्यांच्या नांवाचा उल्लेख त्या सूक्तांत नाही. हे दोन ऋषि कश्यपांत कसे आले तें समजण्यास मार्ग नाही. असित ऋषीचें नांव ऋग्मंत्रांत कोठेहि आलें नाही. शाण्डिल्य आणि काश्यप हे परस्पर अविवाह्य आहेत. आता शाण्डिल्य व काश्यप हीं गोत्रें *निराळीं. त्यांचे प्रवरहि निराळे. काश्यपांच्या प्रवरांत कश्यप, अवत्सार आणि नैध्रुव हे ऋषि आहेत तर शाण्डिल्यांत शांण्डिल्य, असित व दैवल हे ऋषि आहेत. तेव्हा सगोत्र किंवा सप्रवर होण्याचें वस्तुतः कारण नाही.* शांडिल्य हे काश्यपच आहेत असें म्हटलें तर गोष्ट वेगळी.

परंतु शंडिल गोत्राचे चार प्रकारचे प्रवर आहेत. त्यांपैकी तीन प्रवरांत काश्यप ऋषि सर्वसाधारण आहे. उ. १ काश्यपावत्सार शांडिल्येति; २ काश्यपावत्सार दैवलेति; ३ काश्यपावत्सार असितेति. ह्यावरून चौथ्या प्रवरांतहि काश्यप ऋषि आहे असें समजावें असें गोत्रप्रवरनिर्णयांत माधवाचार्य म्हणतातें. हा युक्तिवाद सर्वमान्य होण्याजोगा नाहि.

---

१ ज्ञानकोश खंड ३, पान ४८६.

२ चेन्तसलराव, पान ३४४.

गार्ग्य, भारद्वाज आणि कपि ह्यांच्या प्रवरांत आङ्गिरस हा एक ऋषि सामान्य असल्यामुळे ह्या तीन गोत्रांचे विवाहसंबंध होत नाहीत. ह्यांचे प्रवरऋषि येणेंप्रमाणें–

गार्ग्य— १ आङ्गिरस, २ शैन्य, ३ गार्ग्य.

भारद्वाज— १ आङ्गिरस, २ बार्हस्पत्य, ३ भारद्वाज.

कपि— १ आङ्गिरस, २ आमह्य किंवा आमहीय, व ३ औरुक्षय

भारद्वाजांचे चार गण आहेत. "भरद्वाजाः गर्गाः रौक्षायणाः कपयः". अर्थात् भरद्वाज हा मुख्य ऋषि. तथापि स्वतः भारद्वाज हे आङ्गिरस-गणान्तर्गत आहेत. अङ्गिरसाचा मुलगा बृहस्पति आणि बृहस्पतीचा मुलगा भरद्वाज. ऋग्वेदांत गर्गाला भरद्वाजपुत्र अथवा भारद्वाज म्हटलें आहे. गर्ग हा ऋ. ६.४७ ह्या सूक्ताचा द्रष्टा आहे. ह्याशिवाय गर्गाचा उल्लेख ऋग्वेदांत इतरत्र कोठे नाही.[१] शैन्य ऋषीविषयी अशी माहिती मिळते की, तो गर्गपुत्र असून गार्ग्य नांवाने प्रसिद्ध होऊन तपाने ब्राह्मण झाला. हा आंगिरसकुलांतील मंत्रकार होता. मत्स्यपुराणांत ह्यालाच शिबि म्हटलें आहे.[२] हें खरें मानलें तर ह्याच प्रवरांत पुढे गार्ग्य येतो त्याची वाट काय ! उरुक्षय हा क्षत्रियाचा ब्राह्मण झाला होता. कपि हा ह्याचा मुलगा. तोहि ब्राह्मण झाला. उरुक्षय-आमहीयव हा सूक्तद्रष्टा होता (ऋ. १०.११८).[३]

गर्गाचा आङ्गिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, गार्ग्य, शैन्य असा दुसरा एक पंचप्रवर आहे. कपि हे स्वतंत्र व अस्वतंत्र असे दोन प्रकारचे आहेत. स्वतंत्र कपींचा भरद्वाजांबरोबर विवाहसंबंध होऊं शकतो. अस्वतंत्रांचा मात्र होत नाही. बोधायन शुद्धअङ्गिरसगणांत स्वतंत्र कपींची गणना

---

१ ज्ञानकोश खंड ३, पान ४८९.

२ प्रा. च. को. ५७९.

३ प्रा. च. को. ७६.

करतो. "आङ्गिरसामहीयौरुक्षय्येति" हा त्यांचा प्रवर. भारद्वाज गोत्राशीं कपींचें सगोत्रत्व किंवा सप्रवरत्व होत नाही म्हणून भारद्वाज–कपि–विवाह व्हावयास नड नाही.[1] भारद्वाजकपि आणि आङ्गिरसकपि असे हे भेद आहेत. पंचागांतून कपींचा प्रवर दिला आहे त्यावरून ते आङिरसकपि असावे असें असून भारद्वाज, गार्ग्य आणि कपि हे अविवाह्याच्या कोष्टकांत एकत्र कां गुंफले आहेत समजत नाही.

आंगिरस ऋषि भारद्वाज, गार्ग्य, कपि, नित्युंदन व विष्णुवृद्ध इतक्या गोत्रांच्या प्रवरांना सामान्य आहे. असें असून विष्णुवृद्धनित्युंदन ह्या समुहाचें भारद्वाज-गार्ग्य-कपि ह्या गटाशीं जुळतें. ह्याचें कारण भृगुआंगिरसांसंबंधाने अपवाद सांगितला आहे.

एक एव ऋषिर्यावत्प्रवरेष्वनुवर्तते।

तावत्समानगोत्रत्वमन्यत्र भृग्वङ्गिरसां गणात् ॥ [2]प्रवरमञ्जरी.

ह्या अपवादाचें कारण असें देण्यांत येतें की, भृग्वाङ्गिरसगणांतील ऋषि पूर्वी क्षत्रिय असून पाठीमागून ब्राह्मण झाले. अशा वर्णान्तरित क्षत्रियांना ह्या गणांत घालून सगोत्रत्वाचा ब्राह्मणी नियम त्यांस लागू केला नाही.[3] अत्रि प्रवर स्वतंत्र असल्यामुळे दुसरें कोणतेंहि गोत्र लग्न जुळण्याच्या मार्गांत आड येत नाही. १ आत्रेय, २ आर्चनानस, ३ शावाश्व हे सर्व ऋषि ऋग्वेदिक आहेत. ते सूक्तकारहि आहेत. अर्चनानस् ऋषीचे ते आर्चनानस. आत्रेय व अत्रि हीं एकाचींच नांवें आहेत कीं काय असा संशय येतो. कारण अथर्ववेदी शावास्य (शावास्व!) गोत्राचा प्रवर अत्रि, अर्चन, शावास्य.

भृगु व अङ्गिरस वगळले तर आठ गोत्रकार ऋषि होतातः—

---

१ चेन्त्सलराव, पा. ३३५.

२ चेन्त्सलराव १४.

३ हिंदु एक्झोगमी ६८.

१ विश्वामित्र, २ जमदग्नि, ३ भरद्वाज, ४ गौतम, ५ अत्रि, ६ वसिष्ठ, ७ कश्यप, ८ अगस्त्य. पहिल्या सातांना सप्तर्षि असें म्हणतात. आकाशांतील सप्तर्षि तारे ही मागाहूनची कल्पना आहे. ह्या ताऱ्यांचें नांव पूर्वी दुसरेंच होतें. शतपथब्राह्मणांत ह्यांना सप्तऋक्ष (सात आस्वल) म्हटलें आहे. सप्तर्षीनुहस्म वै पुरक्षीत्याचक्षते (२, १, २, ४). शांतिपर्वांत अङ्गिराः, कश्यप, वसिष्ठ आणि भृगु हींच मूळ चार गोत्रें सांगितलीं आहेत.[1] ह्यांपैकी सप्तर्षींमध्ये कश्यप व वसिष्ठ हे दोन आहेत. भृगूच्या ऐवजी त्याचा वंशज जमदग्नि, त्याचप्रमाणे अंगिरसाऐवजी त्याचे दोन नातू भरद्वाज आणि गौतम हे आहेत. अर्थात् भारतांतील चार गोत्रकारांची कल्पना प्राचीन असली पाहिजे. विश्वामित्र आणि अत्रि हे बाहेरील सामील केलेले दिसतात. त्यांत विश्वामित्र क्षत्रियाचा ब्राह्मण झाला त्यामुळे तो पाठीमागून येणें स्वाभाविक आहे. वसिष्ठ, भरद्वाज, अत्रि, विश्वामित्र, गौतम, अगस्त्य व जमदग्नि हे सातहि ऋषि मन्त्रकर्ते होते. अत्रि हा विश्वामित्राचा वंशज असून दोघांचींहि नांवें सप्तर्षींत येतात. ह्यावरून हे सर्व एका वेळचे ऋषि नाहीत हें उघड होतें. संस्कृत ग्रंथकार ह्या ऋषींना गोत्रकार म्हणतात; कारण त्यांनी स्वतंत्र गोत्रें स्थापन केलीं. गोत्र म्हणजे कुल. सप्तर्षींबरोबर अगस्त्यहि घ्यावयाचा असतो. ह्या आठांच्या वंशजांपैकी कोणीतरी गोत्रऋषि असला पाहिजे. म्हणून गोत्रें असंख्य आहेत. गोत्रांतील लोकांनी आपापसांत लग्न करतां कामा नये; परंतु एका गोत्रांतील माणसांनी दुसऱ्या गोत्रांतील माणसांशीं विवाहसंबंध करण्यास हरकत नाहीं हा सामान्य नियम. ह्यावरून आठ ऋषींच्या वेळीं हा विवाहनिर्बंध अस्तित्वांत नव्हता हें सिद्ध होतें. कश्यप, वसिष्ठ व अगस्त्य

---

१ वैद्य म. भा. उपसंहार, पा. १८६.

हे मरीचीचे वंशज होते.[१] असें असून काश्यप–वासिष्ठांत विवाह होतात. आठ ऋषींपैकी कोणत्याहि ऋषीच्या नातवापासून पुढील पिढीला गोत्र ही संज्ञा आहे असें पाणिनीने व्याख्या करतांना सांगितलें आहे. बौधायनाने हीच व्याख्या घेतली. बौधायन हा गोत्रप्रवरांवर लिहिणारा मोठा विद्वान होता. ह्या पाणिनीय व्याख्येप्रमाणे सप्तर्षींना गोत्रें म्हणतां येत नाहीत. त्यांच्या वंशजांना गोत्र म्हणावयाचें. परंतु महाभारतांत[२] अंगिराः, कश्यप, वसिष्ठ व भृगु ह्यांना गोत्र असें संबोधिलें आहे. प्रवरऋषि हे गोत्रऋषींचे पूर्वज समजले जातात. अगस्त्यसह सप्तर्षींच्या वंशजांना गोत्र नांव लावलें तर वसिष्ठ हें गोत्र नसून वासिष्ठ गोत्र म्हणणें निर्दोष होईल परंतु प्रवरांचा उच्चार केल्यावर "वसिष्ठगोत्रोत्पन्नोहम्" असें म्हणतात. हा वसिष्ठ कोण ही शंका येते. प्रवराला आर्षेय असा दुसरा शब्द आहे. प्रवर म्हणजे निवडणें. हा अर्थ त्यांतील वृ धातूचा आहे. एखाद्या संप्रदायाची निवड करणें असा अर्थ हल्लीचे विद्वान करतात तो धात्वर्थावरून. शिवाय ऋषिभिः आर्षेयं प्रवृणीते अशीं वचनें श्रौतसूत्रांत येतात. त्यावरून वरील अर्थाला बळकटी येते. संस्कृत पंडितांच्या मताप्रमाणे प्रवरऋषि सूक्तकार असला पाहिजे आणि तो गोत्रऋषीचा पूर्वज असला पाहिजे. गोत्रऋषि सूक्तकार नसला तरी चालतो. अर्वाचीन पंडितांना हें मत मान्य नाही. त्यांच्या मतें प्रवर हे संप्रदाय होते. अगस्त्यसहित सप्तर्षींना गोत्रकार म्हणतात. त्याप्रमाणें प्रवरसंस्थापक म्हणूनहि म्हणतात. आमच्या मतें गोत्रप्रवरांच्या कल्पनेंत कुल-संबंधी व वेदसंप्रदायसंबंधी अशा दोनहि गोत्रांच्या कल्पनांची भेसळ झालेली आहे. "असमानार्षगोत्रजाम् कन्यामुद्वहेत्" हा नियम मोडला तरी तें अशास्त्र

---

२ वसिष्ठ अनेक होते हेंहि ह्या ठिकाणीं लक्ष्यांत ठेविलें पाहिजे.

३ शांतिपर्व अ. २९६.

होईल असें आम्हांस वाटत नाहीं.[१] पांच व सात पिढ्यांची घातलेली मर्यादा पाळणें मात्र अत्यवश्यक असून शास्त्रशुद्ध आहे. यज्ञांत प्रवरांचें अस्तित्व उत्पन्न झालें. वासिष्ठांचा प्रवर "वासिष्ठेन्द्रप्रमदाभरद्वसु" असा आहे. ह्याच्यापुढे प्रवरमञ्जरीकार "वासिष्ठवत्, इन्द्रप्रमदावत्, भरद्वसुवत् असें लिहितात. ह्याचा अर्थ वासिष्ठाप्रमाणे, इन्द्रप्रमदाप्रमाणे, भरद्वसूप्रमाणे मी हें कर्म करतों असा होतो. ह्यावरून एकवंशकल्पना करणें अपरिहार्य आहे असें म्हणतां येणार नाही.

पूर्वीच्याहि लोकांनी प्रवर शब्दाचा अर्थ अशाच तऱ्हेचा केलेला आढळतो; उ. *प्रव्रियन्ते होत्रध्वर्युभ्याम् इति प्रवराः. म्हणजे होता आणि अध्वर्यु यांनी यज्ञामध्ये वर्णिले जातात म्हणून त्यांस प्रवर म्हणतात असें एके ठिकाणीं म्हटलें आहे.*[२] *ह्याच्या उलट गोत्रकाराचा बाप, आजा व पणजा हेच प्रवर असें निर्णयसिंधुकार म्हणतात (गोत्रभूतस्य पितृपितामहप्रपितामहा एव प्रवराः). ह्याखेरीज धर्मसिंधुकार गोत्रवंशप्रवर्तकऋषीणां व्यावर्तकाः ऋषिविशेषाः प्रवराः म्हणजे गोत्रप्रवर्तक जे जामदग्न्यादि ऋषि व वंश*-प्रवर्तक जे भृग्वादि ऋषि, ह्यांचे भेददर्शक त्यांच्या वंशांतील ऋषिविशेष तेच प्रवर असें म्हणातात. कोणाचा कोणाशीं मेळ नाही हें ह्यावरून सिद्ध होतें. भागवतांत[३] पुत्राला प्रवर ही संज्ञा लावली आहे. मांधात्याला अंबरीष नांवाचा पुत्र होता. त्याला आज्याने पुत्र म्हणून स्वीकारिलें (पितामहेन प्रवृतः) होतें. अंबरीषाचा पुत्र यौवनाश्व व त्याचा पुत्र हारीत. हे मांधात्याच्या गोत्रांतील प्रवर होत (मांधातृप्रवराइमे). प्रवर हे श्रौत सूत्रां-

१ गुजराथेंत अनाविल ब्राह्मणांत सगोत्रविवाह होतात (लोकशिक्षण, १९३८ एप्रिल, पृ. ७५५).

२ उपयुक्त धर्मशास्त्रसंग्रह पान १२७.

३ स्कंध ९ अ. ७

तच सांगितले आहेत; धर्मशास्त्रांत किंवा गृह्यसूत्रांत त्यांचा निर्देश नाही.

आता आपल्या कामापुरता विचार करूं.

सप्तर्षींचीं निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळीं नांवें असलीं तरी सध्या १ जमदग्नि, २ भरद्वाज, ३ गोतम, ४ कश्यप, ५ वसिष्ठ, ६ अत्रि, ७ विश्वामित्र, व ८ अगस्त्य हेच आठ ऋषि सर्व ब्राह्मणांचे पूर्वज समजले जातात. चित्पावनांच्या गोत्रांत गोतम, विश्वामित्र, अगस्त्य हे किंवा त्यांचे वंशज ह्यांपैकी कोणी नाही. तेव्हा चित्पावनांचे पूर्वज जमदग्नि, भरद्वाज, कश्यप, वसिष्ठ आणि अत्रि हेच पांच ऋषि होत.

चित्पावनांचीं गोत्रें

| | | | |
|---|---|---|---|
| *१ अत्रि* | *४ कौशिक* | *७ गार्ग्य* | *१० जामदग्न्य* |
| *२ वासिष्ठ* | *५ काश्यप* | *८ भारद्वाज* | *११ विष्णुवृद्ध* |
| *३ कौंडिण्य* | *६ शांडिल्य* | *९ कपि* | *१२ वत्स* |
| | *१३ नित्युंदन* | *१४ बाभ्रव्य* | |

ह्यांत सप्तर्षींची एकदम आठवण करून देणारीं गोत्रें म्हणजे १ अत्रि, २ जामदग्न्य, ३ वासिष्ठ, ४ काश्यप, ५ भारद्वाज हीं होत. बाकीचीं नऊ गोत्रें म्हणजे ह्या पांचांच्याच शाखा होत. वसिष्ठाचा मुलगा ( कित्येकांच्या मतें नातू ) कुण्डिन. ह्याने निराळें कौंडिन्य गोत्र स्थापलें. कुशिक हा विश्वामित्राचा आजा. त्याच्या नांवावर गोत्र चालतें. विश्वामित्राचा अर्थात् हा पूर्वज होय. विश्वामित्राच्या संततींत कौशिक ऋषि असल्याचें कोणी सांगत नाही. शंडिल हा लिंगपुराणाप्रमाणे आसिताचा मुलगा व कश्यपाचा नातू होय. म्हणून शांडिल्य आणि काश्यप एकच कुल. गर्ग हा भरद्वाजाचा पुत्र आणि कपि हा नातू. ह्यास्तव गार्ग्य, कपि व भारद्वाज ह्यांचें जमत नाही. मागे सांगितल्याप्रमाणे वत्स गोत्राचें गूढच आहे. एवढें मात्र खरें की जामदग्न्य आणि वत्स ह्यांच्यामध्यें सर्वजण अभिन्नत्व पाहतात. विष्णुवृद्ध हा त्रसद-

स्यूचा नातू असून बोलूनचालून क्षत्रिय होता. तो पुढे ब्राह्मण झाला. अर्थात् सप्तर्षींशीं त्याचा संबंध येत नाही. नित्युंदन हा विष्णुवृद्धांपैकी असावा असें मानलें तरच ह्या दोन गोत्रांचा एक गट पडूं शकेल. तेव्हा एकंदर गट पडतात ते—

*१ भारद्वाज; गार्ग्य; कपि* | *२ जामदग्न्य; वत्स*

*३ कौशिक; बाभ्रव्य* | *४ विष्णुवृद्ध; नित्युंदन*

*५ वासिष्ठ; कौंडिण्य* | *६ काश्यप; शांडिल्य*

*७ अत्रि*

भारद्वाज गोत्रांत इतर गोत्रियांचा समावेश झाला असावा असें वाटतें. अकामतः झालेल्या सगोत्रविवाहाची प्रजा भारद्वाज गोत्रांत सामील करावी असें एक वचन आहे. 'सगोत्रां समानप्रवरां कामतः परिणीय प्रजां उत्पाद्य गुरुतल्पव्रतं चरेत् प्रजां च चण्डालेषु विनिक्षिपेत्। अकामतः प्रजाकामः तप्तकृच्छ्रम् प्रजायाः भारद्वाजगोत्रान्तर्भावः' ह्यावरून भारद्वाज गोत्राच्या लोकांना तरी असगोत्रविवाहाची अट असूं नये. स्वतः भरद्वाजाची उत्पत्ति संशयाकुल आहे. त्यामुळेच सगोत्रविवाहप्रजेला भारद्वाज गोत्र देण्याचा प्रघात पडला असावा. बृहस्पतीचा भाऊ उतथ्य. उतथ्याची पत्नी ममता. ममता गर्भिणी असतां बृहस्पति तिच्याबरोबर चौर्यरति करण्यास प्रवृत्त झाला. परंतु उदरांत दुसऱ्या गर्भाला राहण्याला जागा नव्हती म्हणून आंतील गर्भाने आक्रोश करून बृहस्पतीला प्रतिबंध केला. तेव्हा बृहस्पतीने गर्भाला शाप दिला व बलात्कारें गर्भस्थापना केली. बृहस्पतीच्या शापामुळे मूळचा गर्भ आंधळा झाला. हाच पुढे दीर्घतमा ह्या नांवाने प्रसिद्धीस आला. त्याने लाथ मारून बृहस्पतीचें वीर्य बाहेर लोटलें. तें भूमीवर पडतांच त्यापासून पुत्र झाला तो भरद्वाज होय.

१ भागवत ९ स्कंध अ. २०.

वासिष्ठ-कौंडिण्य गोत्रांसंबंधाने गुरुचरित्रांतील एका आख्यानाचा उल्लेख करण्यासारखा आहे. ह्या आख्यानावरून वासिष्ठगोत्रोत्पन्न सुशीला ही कौंडिण्य ऋषीची भार्या झाली असें दिसतें. ह्या कौंडिण्य ऋषीचें गोत्र कौंडिण्य असेल असें आम्ही गृहीत धरलें आहे हें येथें सांगणें अवश्य आहे. गुरुचरित्रांतील ओव्या येणेंप्रमाणे—

अंसे पूर्वी कृतयुगेसी । सुमंतु नाम विप्र परियेसी ।
उत्पन्न झाला विसिष्ठगोत्रासी । भृगुकन्या दीक्षानामें ॥
तेचि झाली सुमंतूची भार्या । पतिव्रता औदार्या ।
कन्या तिची झाली सुतनया । नाम तिचें सुशीला ॥
सुशीला कन्या झाली उपवर । सुमंतु चिंती वारंवार ।
इशी एखादा मिळता वर । कन्यादान करीन म्हणे ॥
ऐसें चिंतितां एके दिवशीं । तेथे आला कौंडिण्य ऋषी ।
विचारितां कन्येसी । सुमंतूने अंगिकारिलें ॥
कन्यादान गृह्योक्तेसीं । देता झाला कौंडिण्यासी ।
मिळोनी होती दोन मासीं । आषाढ आणि श्रावण ॥

अध्याय ४३ श्लोक २४६ ते २६५

ही कृतयुगांतील गोष्ट आहे.

पुढील कोष्टकावरून असें दिसतें की अत्रि, भारद्वज, जामदग्न्य, कौशिक, वासिष्ठ, काश्यप हीं गोत्रें वरील पांची जातींत आहेत. शांडिल्य गोत्र सारस्वतांत व कुडाळदेशकरांत नाही. कपि, बाभ्रव्य, विष्णुवर्धन व नित्युंदन हीं केवळ चित्पावनांतच आहेत. विष्णुवर्धन गोत्र शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणांत नाही, ऋग्वेदी देशस्थांत मात्र आहे. कपि, बाभ्रव्य आणि नित्युंदन

गोत्रें

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ चित्पावन | अत्रि | गार्ग्य | कौंडिण्य | भारद्वाज | वत्स | जामदग्न्य | कौशिक | वासिष्ठ | काश्यप | बाभ्रव्य | कपि | शांडिल्य | विष्णुवर्धन | नित्युंदन | | | | | | |
| २ कऱ्हाडे | अत्रि | गार्ग्य | कौंडिण्य | भारद्वाज | वत्स | जामदग्न्य | कौशिक | वाशिष्ठ | काश्यप | | | शांडिल्य | | | कुत्स | गौतम | नैध्रुव | | | उपमन्यु; भार्गव; वैत्य; वैश्वामित्र; शालाक्ष; लोहिताक्ष; मुद्गल; बादरायण; पार्थिव; अंगिरस |
| ३ कुडाळदेशकर | अत्रि | गार्ग्य | कौंडिण्य | भारद्वाज | वत्स | जामदग्न्य, वत्स | कौशिक | वासिष्ठ | काश्यप | | | | | | कुत्स | गौतम | नैध्रुव | धनंजय | सांख्यायन | |
| ४ देवरुखे | अत्रि | गार्ग्य | | भारद्वाज | | जामदग्न्य | कौशिक | वासिष्ठ | काश्यप | | | शांडिल्य | | | | | | | | पराशर; अंगिरस; शौनक; मुद्गल |
| ५ सारस्वत | अत्रि | | कौंडिण्य | भारद्वाज | वत्स | जमदग्नि | कौशिक | वासिष्ठ | काश्यप | | | | | | | गौतम | | | | विश्वामित्र |

हीं तीनहि गोत्रें ऋग्वेदी देशस्थ आणि यजुर्वेदी ह्यांच्यांत नाहीत.[1] सारांश चौदांपैकी तीन गोत्रें महाराष्ट्र ब्राह्मणांत फक्त चित्पावनांतच आढळतात ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. ह्यावरून चित्पावनसमाज अन्य ब्राह्मण-समाजाहून स्वतंत्र असावा असा संशय येतो. हीं गोत्रें चित्पावनांत कोठून आलीं ह्याचा विचार संशोधकांनी करण्यासारखा आहे. सर्व हिंदुस्थानांतील ब्राह्मणांचीं गोत्रें समजतील तेव्हाच ह्या प्रश्नावर अधिक प्रकाश पडण्याचा संभव आहे. दिवेकरांच्या पुस्तकांत व ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडांत अनेक ब्राह्मण-जातींचीं गोत्रें दिलीं आहेत. तथापि त्यांत बाभ्रव्य, नित्युंदन व कपि हीं गोत्रें आढळत नाहीत. नाही म्हणावयास अवळ ब्राह्मणांत नित्युंदन गोत्र आहे असें दिवेकरांच्या पुस्तकावरून दिसतें.

असो. आता कोणत्या गोत्राशीं कोणतें गोत्र जमत नाही ह्याविषयीची प्रचलित कल्पना पुढील श्लोकांत व्यक्त केली आहे.

ज्या गोत्रांचा परस्परसंबंध होत नाही त्यांची सांखळी

श्लोक

[2]भारद्वजाश्च गार्ग्याः कपिकुलमिलिता । जामदग्न्याश्च वत्सा ।

भाभ्रव्याः कौशिकाः स्युः प्रवरसमयुताः । विष्णुवृद्धानितुंदाः । वासिष्ठाः कौंडिण्याः पुनरपि मिलिताः । काश्यपाः शांडिलेयाः । ज्ञेया विद्वद्भिरेते परिणय-समये वर्जनीयाः प्रयत्नात् इति शौनकोक्तिः ।

ह्यावरून काय निष्पन्न होतें तें आतां आपण बघूं. गोत्र म्हणजे गोत्रऋषि न समजतां कुल असा अर्थ केला पाहिजे. नाही तर काश्यप आणि शांडिल्य

---

१ शुद्ध पंचांग शके १८६० (ह्या पंचांगांत कपि व कौंडिण्य गोत्रें देवरुख्यांचीं म्हणून दिलीं आहेत; पण हा केवळ निष्काळजीपणा. पुढील नांवांच्यापुढे कोठेहि हीं गोत्रें नाहीत).

२ एका जुन्या वहींतून वरील मजकूर घेतला आहे.

ह्या गोत्रांचे जमण्यास प्रत्यवाय नव्हता. कारण काश्यप व शांडिल्य ही गोत्रें भिन्न व त्यांचे प्रवरहि भिन्न. काश्यप, शांडिल्य हे दोन ऋषि एकाच कुलांत जन्मलेले असें गृहीत धरावें; गोत्र याचा अर्थ कुल करावा तेव्हाच ह्यांचा विवाहनिषेध अर्थयुक्त होईल. आता स्मृतिकार सगोत्रविवाहनिषेध सांगतात परंतु कुलऋषि सांगत नाहीत. शास्त्रच मानावयाचें म्हटलें तरी काश्यप व शांडिल्य हे एकाच कुलांतले असें कोणता शास्त्रकार म्हणतो ? कोणता ऋषि कोणत्या कुलांतील हा इतिहास आहे; तें शास्त्र नव्हे. बरें, कुलालाच जर प्राधान्य दिलें तर आणि काश्यप हा शांडिल्याचा पूर्वज होता असें गृहीत धरलें तर शांडिल्याने निराळें गोत्र कां स्थापावें ? उद्या-पासून शांडिल्यगोत्री लोकांनी आपणांस काश्यपगोत्री म्हटलें तर तें अशा-स्त्रीय होईल काय ? अशास्त्रीयत्व असें करण्यांत नसेल तर शांडिल्य गोत्र वगळून काश्यप ठेवल्यानें सोय होणार आहे हें निश्चित. शांडिल्य गोत्र स्वतंत्र स्थापण्यांत जर कांही हेतु असेल आणि तो शास्त्रसंमत असेल तर काश्यप आणि शांडिल्य हीं गोत्रें विवाह्य कां समजूं नयेत ?

त्याचप्रमाणे बाभ्रव्य व कौशिक हे दोन भिन्न ऋषि आहेत. त्यांच्या प्रवरांत दोघांना सामान्य असा एकहि ऋषि नाहीं. बाभव्याचा प्रवर विश्वामित्र[२], अवदल, बाभ्रव्य असून कौशिकांचा प्रवर वैश्वामित्र, अघ-मर्षण, कौशिक असा आहे. विश्वामित्र व वैश्वामित्र एकच म्हणतां येणार

---

१ काश्यप, अवत्सार व असित हा काश्यपगोत्र्यांचा वैकल्पिक प्रवर आहे व कित्येक काश्यपगोत्री तोच प्रवर म्हणतात.

२ पंचांगांत विश्वामित्र असें लिहिलें आहे परंतु तोंडाने वैश्वामित्र उच्चार कर-तांना आम्हीं ऐकलें आहे. वैश्वामित्र देवरात बाभ्रव्येति असाहि प्रवर कित्येक म्हणतात.

नाहीं. बाभ्रव्य हे विश्वामित्रगणांत मोडतात असें लोगाक्षी ह्याचें मत आहे. अशा ह्या एकाच्या मतावरून शास्त्रीय निर्बंध म्हणून पाळणें कितपत योग्य आहे ह्याचा विचार झाला पाहिजे. गोत्रकार होण्यास पात्रता लागते काय? का वाटेल त्याला गोत्रकार होतां येतें? गोत्र म्हणजे कुल समजल्यास एक गोत्र चालू असतांना एखाद्या वंशजाने वेगळें गोत्र आपल्या नांवाने स्थापन करण्याचें कारण काय? एका आडनांवांतून अनेक आडनांवें निघतात त्यांतलाच हा जर प्रकार असेल तर पुढील वंशजांनी निर्माण केलेलीं गोत्रें मोडणें अनुचित कसें होईल! परंतु गोत्र म्हणजे वंशप्रवर्तक ऋषि हें सर्वांस मान्य नाही. धर्मसिंधुकारांनी गोत्रऋषि व वंशऋषि ह्यांतील भेद दाखविला आहे. त्यांनी प्रवरलक्षण सांगतांना लिहिलें आहे तें असें:— प्रवरलक्षणं तु गोत्रवंशप्रवर्तकऋषीणां व्यावर्तका ऋषिविशेषाः प्रवराः इति. ह्याचा अर्थ गोत्रप्रवर्तक व वंशप्रवर्तक जे ऋषि त्यांच्याहून वेगळे जे ऋषिविशेष ते प्रवर. गोत्रवंशप्रवर्तक ऋषि ह्याची स्पष्टता धर्मसिंधुकारांनी उदाहरण देऊन केली आहे. गोत्रप्रवर्तक म्हणजे विश्वामित्रादि ऋषि आणि वंशप्रवर्तक म्हणजे भृग्वादि ऋषि असें धर्मसिंधुकार म्हणतात[१]. ह्यावरून गोत्रऋषि म्हणजे वंशऋषि नव्हे हें सिद्ध होतें. मागे सांगितल्याप्रमाणे सप्तर्षि व अगस्ति ह्यांच्या अपत्यांनाच गोत्र ही संज्ञा आहे. तेव्हा गोत्र ही एक पारिभाषिक संज्ञा आहे असें म्हणावें लागतें अथवा ह्या आठ ऋषींच्या अपत्यांकडून उपनयन होईल तेथेंच गोत्र शब्द प्रयुक्त करतां येईल असें म्हटलें पाहिजे. गोत्र शब्द कुलवाचक आहे हें मान्य केलें तरी गोत्रप्रकरणांत तो कुलवाचक नाही हें निश्चित.

कांही ब्राह्मणांना गोत्रें नव्हतीं असें पंचविंशति ब्राह्मणावरून म्हणतां

---

१ धर्मसिंधु, निर्णयसागर प्रत, दुसरी आवृत्ति पान १७५.

येतें.[1] आज तर सर्व ब्राह्मणांना गोत्रें असल्याचें दिसतें. ह्या गोत्रहीन ब्राह्मणांनी आपल्या उपाध्यांचीं गोत्रें घेतलीं असावीं. मानव आणि काश्यप हीं सार्ववार्णिक गोत्रें आहेत. म्हणजे ज्यांना गोत्र नसेल त्यांना ह्यांपैकी एखादें गोत्र देण्यांत येतें. संस्काराने व्रात्यांचे ब्राह्मण बनतात तेव्हा त्यांना काश्यप अगर दुसरें कोणतें तरी गोत्र मिळणें अवश्य आहे. काश्यप-गोत्रांत अशा रीतीने बाहेरच्या लोकांचा समावेश झाला असल्यास सर्व काश्यपगोत्री एकाच रक्ताचे आहेत असें मानणें युक्त होणार नाही.

---

१ २०.१५.१०.

## ४ वेद व शाखा

चित्पावन कांही ऋग्वेदी व कांही कृष्णयजुर्वेदी असे आहेत. पूर्वी सर्व चित्पावन हिरण्यकेशी होते असें एका पक्षाचें म्हणणें आहे. त्याचा आता विचार करूं.

चित्पावनांचीं गोत्रें १४. त्यांत कांही आश्वलायन व कांही हिरण्यकेशी असून बाकीचीं उभयविध आहेत.

| आश्वलायन | हिरण्यकेशी | उभयविध |
|---|---|---|
| १ अत्रि | ७ नित्युंदन | ८ वासिष्ठ |
| २ कौंडिण्य | | ९ काश्यप |
| ३ गार्ग्य | | १० शांडिल्य |
| ४ जामदग्न्य | | ११ विष्णुवर्धन |
| ५ वत्स | | १२ भारद्वाज |
| ६ बाभ्रव्य | | १३ कपि |
| | | १४ कौशिक |

६० आडनांवांची गोत्राप्रमाणें विभागणी—

| *आश्वलायन* | | *हिरण्यकेशी* |
|---|---|---|
| *गोत्र* | *उपनामसंख्या* | *नित्युंदन* २ |
| अत्रि | ३ | — |
| वत्स | १ | २ |
| जामदग्न्य | २ | |
| बाभ्रव्य | २ | |

| | |
|---|---|
| गार्ग्य | ५ |
| कौंडिण्य | २ |
| | — |
| | १५ |

उभयविध

| आश्वलायन संख्या | गोत्र | हिरण्यकेशी संख्या |
|---|---|---|
| १ | काश्यप | ४ |
| ६ | शांडिल्य | १ |
| ५ | वासिष्ठ | ७ |
| १ | विष्णुवर्धन | ३ |
| ३ | भारद्वाज | ३ |
| ३ | कपि | १ |
| ३ | कौशिक | २ |
| — | | — |
| २२ | | २१ |
| | = ४३ | |

मिळून ६० आडनांवांत ३७ आश्वलायन आणि २३ हिरण्यकेशी आहेत. ऋग्वेद्यांची संख्या अधिक आहे.

चित्पावनांत आश्वलायनी व हिरण्यकेशी अशा दोनहि शाखांचे लोक आहेत. ही स्थिति ४००।५०० वर्षें तरी असावी असें दिसतें. द. कानडा प्रांतांतील चित्पावनांत ह्या दोनहि शाखा आहेतच.

हिरण्यकेशी, आपस्तंब व बौधायन हीं सूत्रें जवळ जवळ सारखीं आहेत. आमच्याकडे ह्या तैत्तिरीयकांना हिरण्यकेशी न म्हणतां आपस्तंब म्हणण्याचा परिपाठ आहे. ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडांत "विशेषेण द्विजा ह्येते सर्वे वै

तैत्तिरीयकाः। आपस्तंबादिसूत्रानुयायिनो गुणवत्तराः "[1] ह्यांत हिरण्यकेशी शाखेचा उल्लेख नाही. आदि शब्दाने हिरण्यकेशी शाखा घेतां येईल हें खरें परंतु तिला प्रामुख्य असतें तर त्या शाखेचाच उच्चार झाला असता. शिवाय तैत्तिरीयकांत बौधायनसूत्रानुसारहि कर्मे होत असतात. आमच्याकडे आलेल्या माहितींत दाते, बापट, दिवेकर, फफे यांनी बौधायनसूत्राप्रमाणे कांही कर्मे आम्ही करतों असें कळविलें आहे. मंडलिक उर्फ परांजपे हे बौधायनसूत्रानुयायी होते. आज ते आश्वलायन आहेत. दाते, दिवेकर, बापट हे वासिष्ठगोत्री आहेत. फफे भारद्वाज आणि मंडलिक विष्णुवर्धन ह्या गोत्रांचे आहेत. मार्तंडांतील वचनावरून चित्पावन आपस्तंबसूत्रानुयायी आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे. केवळ आपस्तंबांजवळ वेदाध्ययन केल्यामुळे हिरण्यकेशीयांना आपस्तंब म्हणतात असें नव्हे. एखाद्याने अथवा कांही जणांनी आपस्तंबाजवळ वेदाध्ययन केलें असेल पण तेवढ्याने सर्व तैत्तिरीयांना आपस्तंब म्हटलें जाणें स्वाभाविक दिसत नाही.

एकंदर शाखाभेद पुष्कळ झाले. पतंजलीने आपल्या महाभाष्यांत यजुर्वेदाच्या एकशेंएक शाखा (एकशतमध्वर्युशाखाः), सामवेदाच्या सहस्र (सहस्रवर्त्मा सामवेदः), एकवीस ऋग्वेदाच्या (एकविंशति बाह्वृच्यं), आणि नऊ अथर्ववेदाच्या (नवधा अथर्वणो वेदः) असें सांगितलें आहे. परंतु आज सर्व भरतखंडांत ऋग्वेदाची एकच शाकलशाखा उपलब्ध आहे. बाष्कलशाखा बनवतां येईल असें साहित्य मात्र आहे. ऋग्वेदाच्या एकोणीस शाखा आज अनुपलब्ध आहेत. बाकीच्याहि वेदांच्या अनेक शाखा नष्ट झाल्या आहेत. कृष्णयजुर्वेदाच्या चरक व तैत्तिरीय ह्या दोन पोटविभागांपैकी चित्पावनांतील कांही लोक तैत्तिरीयवेदाध्ययन करणारे आहेत;

१ पृ. ३१९ श्लो. ५०.

आणि त्यांत आपस्तंबी, बौधायनी, सत्याषाढी आणि हिरण्यकेशी व औधेयी अशा पांच शाखा आहेत. आंध्र देशांत आपस्तंब, कृष्णातीरीं सत्याषाढी, माल्यपर्वत देशांत औधेयी व परशुरामक्षेत्रीं हिरण्यकेशी ह्याप्रमाणे शाखा चालत असल्याचें चरणव्युहावरून दिसतें.[१] ह्या सर्व शाखा दक्षिणदेशांत म्हणजे नर्मदेच्या खालीं आहेत. दक्षिणदेशांत जेथे आपस्तंबी, सत्याषाढी, औधेयी, हिरण्यकेशी ह्या शाखा नाहीत तेथे बौधायनी आहे. माल्यपर्वत म्हणजे तुंगभद्रेच्या तीरावर असलेली अनगुंडी नांवाची टेकडी होय. महार्णवांत पुढील श्लोक आढळतोः—

आन्ध्रादि दक्षिणाग्नेयी गोदासागर आवधि
यजुर्वेदस्तु तैत्तिर्ये आपस्तंबी प्रतिष्ठिता ।
सह्याद्रिपर्वतारम्भाद् दिशां नैर्ऋत्यसागरात्
हिरण्यकेशी शाखा च परशुरामसान्निधौ ।

वस्तुतः तैत्तिरीयांचे प्रथम दोन मोठे भेद पडले : एक औख्य आणि दुसरा कांडिकेय. औख्यांमध्ये विभजन झालें नाही पण कांडिकेयांत वर सांगितल्याप्रमाणे आपस्तंब, बौधायन, सत्याषाढ, हिरण्यकेशी आणि औधेय असे पांच पोटविभाग पडले. ह्यांमध्येहि एकवाक्यता आहे असें नाही. दुसऱ्या एका चरणव्युहाच्या प्रतींत कालेय, शाट्यायन, हिरण्यकेश, भारद्वाज आणि आपस्तंब असे पोटभेद वर्णिले असून देवीपुराणांत शाट्यायनाच्या ऐवजी बौधायन येतात.[१] ह्यावरून चरणव्यूह रचले गेले तेव्हा वरील शाखा विरळ व विखुरलेल्या असल्या पाहिजेत. नाही तर इतका घरसोडपणा असता ना. वरील शाखांची आपस्तंब, बौधायन, हिरण्यकेशी,

---

१ Journal of Vedic Studies Vol. 2, No.1 Pp.75,76,66.

सत्याषाढ व भारद्वाज हीं सूत्रें आहेत. हीं सर्व तैत्तिरीयसंहितेवर आधारलेलीं आहेत. हिरण्यकेशी सूत्र निराळें असें नाही. हिरण्यकेशी यांचेंच दुसरें नांव सत्याषाढ असें आहे.[1] हें खरें असेल तर सत्याषाढ व हिरण्यकेशी अशा दोन शाखा स्वतंत्र होणें शक्य दिसत नाही. एका माणसाने दोन निरनिराळ्या शाखा स्थापल्या हें संभवनीय नाही. शिवाय हिरण्यकेशी सूत्रांत शेवटचा भाग भारद्वाजसूत्रांतून घेतला आहे; आणि आपस्तंब सूत्राशीं ह्या सूत्राचें साम्य आश्चर्यकारक आहे. ह्यावरून हिरण्यकेशी शाखेला स्वतंत्र अथवा विशिष्ट अस्तित्वच नाही असें म्हणावें लागतें. आपस्तंब, सत्याषाढ, हिरण्यकेशी व भारद्वाज जवळ जवळ एकच. पांचव्या शतकांतील दानपत्रावरून कांही लोकांना हिरण्यकेशी ही संज्ञा प्राप्त झाली होती यांत शंका नाही. हिरण्यकेशी हें लौकिक अगर टोपणनांव होतें.

हिरण्यकेशी सूत्राचा उच्चार अभिवादनांत तैत्तिरीय करीत नाहीत. "तैत्तिरीयशाखान्तर्गत हिरण्यकेशीशाखाध्यायी" असें प्रयोगकार लिहितात.

कृष्णयजुर्वेदाची आत्रेयी नांवाची एक शाखा आहे. तैत्तिरीयसंहिता हा तिचा आधार आहे. काण्डानुक्रमांत कृष्णयजुर्वेद्यांची शिष्यपरंपरा पुढीलप्रमाणे दिली आहे :—

वैशंपायनाने यास्काला; यास्काने तित्तिरीला; तित्तिरीने उखाला; उखाने आत्रेयाला शाखा शिकविली.[2]

हिरण्यकेशी शाखा इतरत्र नाही; निदान चरणव्यूहकारांना ठाऊक नाही. ह्यावरून चित्पावन हिरण्यकेशी होते असें अनुमान करण्यांत येतें.

---

१ प्रा. चरित्रकोश पृ. ६५३.

२ Vedic Journal Vol. 2, No. 1, P. 67.

परंतु देवरुख्यांत हिरण्यकेशी शाखा आहे आणि देवरुखे कोंकणांत राहतात. तेव्हा चित्पावनांतच हिरण्यकेशी शाखा आहे असें नाही.

हिरण्यकेशीयांचें गृह्यसूत्र नाही. हिरण्यकेशी सत्याषाढ श्रौतसूत्र आहे त्यांतच थोडेंसें गृह्य आहे. ह्या सूत्राचा लोप झाल्याची दंतकथा आहे. टीकाकार महादेव म्हणतो :—

लुप्तप्रायमिदं सूत्रं दैवादासीत् क्वचित् क्वचित्
दाक्षिणस्यां ताम्रपर्ण्यास्तीरेष्वेवेदमाहृतम् ।

सूत्राचा लोप झाला म्हणजे सूत्रानुयायांचा लोप झाला की सूत्राच्या पोथ्यांचा लोप झाला ? अनुयायांचा लोप होण्याचें कारण नाही. पूर्वीचें सर्व शिक्षण गुरुपरंपरेने मिळत असे. ही परंपरा तुटण्याचें कारण काय व केव्हा तुटली ? कोकणांत ठिकठिकाणीं असलेले सर्व चित्पावन एकदम स्वशाखाहीन कसे झाले ह्याचें उत्तर कोणी देत नाही. आश्वलायन हिरण्यकेशी बनणें व हिरण्यकेशी आश्वलायन बनणें हा क्रम सध्या चालू आहे हें खरें. ह्याचें कारण भिक्षुकवर्गाचा अभाव. सध्या खेडेगांवांत भिक्षुकांचें चालत नाही. ज्या शाखेचा एखादा भिक्षुक असेल त्याच्यावर अन्यशाखीयांना भागवून घ्यावें लागतें. आजच्या ब्राह्मणांत भिक्षुक आणि गृहस्थ हा भेद उत्पन्न झाल्यामुळे आणि त्यांतहि भिक्षुक अल्पसंख्याक आणि गृहस्थ बहुसंख्याक अशी स्थिति झाल्यामुळे शाखालोप होऊं शकतो. तरी संध्येंतील अभिवादन मूळचें राहण्यास हरकत नाही. स्थानत्यागाचे व प्रवासाचे प्रसंगहि वारंवार येत असल्याकारणाने निरुपायाने शाखान्तर करावें लागतें. तरी सुद्धा शाखान्तराचीं उदाहरणें विरळाच म्हणावयास हरकत नाही. माहुलीच्या बाजूचे अथर्ववेदी ऋग्वेदी झाले हें खरें आहे परंतु त्याचेंहि कारण समजण्यासारखें आहे. अथर्ववेदी अगोदर ह्या बाजूला थोडे. त्यामुळे भिक्षुकवर्गाचें चालेनासें झालें. भिक्षुक गृहस्थ बनले. अशा ह्या गृह-

त्यांनी आपलीं धर्मकृत्यें शेजारच्या ऋग्वेद्यांकडून करून घेणें स्वाभाविक आहे. असा प्रकार कोंकणांत पूर्वी कधी होता काय! हल्लीच्या चित्पावन पिढीचे पणजे सर्व भिक्षुकच होते असें शोधाअंतीं समजून येईल. प्रत्येक ब्राह्मण भिक्षुकच होता. सारांश शाखालोप होण्याचें योग्य कारण दिसत नाही.

आश्वलायन व हिरण्यकेशी चित्पावनांत लग्नसंबंध होतात ह्यासाठीं सर्व चित्पावन मूळचे हिरण्यकेशी असले पाहिजेत असें एक प्रमाण पुढें करण्यांत येतें. परंतु हेंच कारण जर घेतलें तर सर्व चित्पावन मूळचे हिरण्यकेशी नसून ऋग्वेदी होते असेंहि म्हणतां येईल. तथापि भिन्नशाखीयांत विवाह होत नाही हें म्हणणें निराधार दिसतें. ह्याला शास्त्राधार तर नाहीच परंतु रूढीहि विरुद्ध असलेली दिसत नाही. देशावर ऋग्वेदी आश्वलायन व तैत्तरीय आपस्तंब ह्यांच्यांत बेटीव्यवहार घडत असल्याचें आमच्या ऐकिवांत आहे; अनेक लोक सांगतात. देवरुख्यांतहि दोन्ही शाखांच्या अनुयायांत बेटीव्यवहार होतो. "सवेद आणि सवर्ण पाणिग्रहण नेमिलें" हें एकनाथांचें म्हणणें शास्त्राच्या बाहेरील आहे. 'सजाताम्' हें एका स्मृतींतील वचन उद्धृत करून त्याचा अर्थ 'सशाखाम्' असा करण्यांत उघड चूक केली जाते. "सजाताम्" म्हणजे "सवर्णाम्" आपल्याच वर्णाची असा अर्थ केला पाहिजे. नारदस्मृतींत "ब्राह्मणक्षत्रियविशां-शूद्राणां च परिग्रहे सजातिः श्रेयसी भार्या सजातिश्च पतिः स्त्रियाः" असें वचन आहे. ह्यावरून वर्ण म्हणजे जाति हें स्पष्ट होतें. आश्वलायनानें वराच्या शाखेच्या गृह्यप्रमाणें मधुपर्क करावा असें सांगितलें आहे.[1] ह्यावरून परशाखेच्या वराची संभाव्यता व शक्यता त्यास मान्य होती हें स्पष्ट आहे. भिन्नशाखीयांत विवाह होण्यास शास्त्राचा प्रत्यवाय नाही

१ वरस्य या भवेच्छाखा तच्छाखागृह्यचोदितः ।
मधुपर्कः प्रदातव्यो ह्यन्यशाखेपि दातरि ॥

असें त्याचें मत असलें पाहिजे. गोकर्णांत सामवेदी व बौधायनसूत्री कृष्णयजुर्वेदी ह्यांच्यांत विवाह होऊं शकतात.[१]

आता ऋषितर्पणांतील ऋषींचा विचार करूं. हिरण्यकेशीयांच्या तर्पणांत "आत्रेयं पदकारं तर्पयामि" "कौंडिण्यं वृत्तिकारं तर्पयामि" असें म्हणून आत्रेय व कौंडिण्य ह्यांना तर्पण करतात. आश्वलायनांच्या तर्पणांत हे ऋषि नाहीत. आणि आज तर कौंडिण्य किंवा अत्रि गोत्राचा कोणीहि चित्पावन हिरण्यकेशी नाही. ह्यावरून ह्या गोत्राचे चित्पावन ब्राह्मण मूळचे हिरण्यकेशी असले पाहिजेत असें अनुमान करण्यांत येतें. आमच्या मतें ही तार्किक पद्धति सदोष आहे. वृत्तिकार कौंडिण्य व गोत्रकार कौंडिण्य हे एकच मानण्यास आधार काय ? कौंडिण्याने कोणती वृत्ति केली हें माहीत नाही; अशी वृत्ति उपलब्ध नाही. हें एक असो पण दोन कौंडिण्य जर नसते तर वृत्तिकार कौंडिण्य म्हणण्याचें प्रयोजन काय ? शिवाय सारस्वत सर्व ऋग्वेदी असून त्यांच्यांतहि कौंडिण्य गोत्र आहे. सारस्वतहि हिरण्यकेशीच होते काय ? पदकार आत्रेयाचीहि वासलात अशाच रीतीने लावतां येईल. आत्रेयाने तैत्तिरीयसंहितेचा पदपाठ केल्यामुळे हिरण्यकेशीयांच्या तर्पणांत त्याला स्थान मिळणें अवश्य आहे. कदाचित् दोन आत्रेय असतील. आणि म्हणून भिन्नता दाखविण्याकरिता पदकार आत्रेय असें मुद्दाम म्हटलें. शिवाय अत्रि आणि आत्रेय एक नाहीत. अत्रि ऋषि निराळा व आत्रेय ऋषि निराळा. कोणाच्याहि ब्रह्मयज्ञांत ऋषींचीं नांवें पद्धतशीर आलेलीं दिसत नाहीत. कोणत्याहि ब्राह्मणांच्या तर्पणांत सप्तर्षि आले पाहिजेत, पण ते सर्व येतातच असें नाही.

"शाकलबाभ्रव्यमांडुकेयास्तृप्यन्तु" असें आश्वलायनांच्या ब्रह्मयज्ञ-

---

१ गोकर्ण महाबळेश्वर येथील कृष्णंभट तिमणभट जोशी (कृष्णयजुर्वेदी) ह्यांच्या मुलाला सामवेद्याची मुलगी केली असल्याचें त्यांनी सांगितलें.

तर्पणांत म्हणावें लागत असून "आश्वलायनसूत्रांत तर ह्या गोत्राचा उल्लेख नाही" असें वे. रा. आपटे कसें म्हणतात समजत नाही.[1] गोत्र बाभ्रव्य आहे, बभ्रु नाही. हिरण्यकेशीयांच्या तर्पणांत बभ्रु ऋषि आहे आणि आश्वलायनांच्या तर्पणांत बाभ्रव्य आहे. दोन्ही निरनिराळे ऋषि असूं शकतील. बभ्रु हा विश्वामित्राच्या पुत्रांपैकी एक आहे. बाभ्रव्य हा बभ्रूचा वंशज असावा. ह्याने क्रम म्हणण्याची पद्धति सुरू केली[2]. ह्यावरून ऋग्वेद्यांच्या आश्वलायनसूत्रांतील ब्रह्मयज्ञांगतर्पणांत त्याचा अन्तर्भाव झाला असावा.

गोत्रप्रवरांवरून निश्चित अनुमान कांहीच काढतां येत नाही. निरनिराळ्या वेदशाखांच्या अनुयायांत एकच गोत्रें व प्रवर आहेत. अत्रि, वसिष्ठ, कौशिक, भारद्वाज, काश्यप, वत्स, कौंडिण्य, गार्ग्य हीं गोत्रें शुक्लयजुर्वेद्यांत आहेत. तसेंच अत्रिगोत्री यजुर्वेद्यांचा प्रवर आत्रेयार्चनानसश्यावाश्वेति असाच आहे. तीच गोष्ट शांडिल्य गोत्राची. शांडिल्यासितदैवलेति हाच प्रवर ऋग्वेदी व यजुर्वेदीयांचा. ह्याशिवाय वत्स गोत्राचा प्रवरहि सारखाच आहे.

अथर्ववेदी ब्राह्मणांत कौशिक, शावास्य, उपमन्यु, भारद्वाज व भालंजन अशीं पांच गोत्रें प्रचलित आहेत. शावास्य (शावास्व) हा अत्रिप्रवरांतील असल्यामुळे अत्रिगोत्राचा व शावास्यगोत्राचा प्रवर एकच आहे. त्याचप्रमाणे ऋग्वेदी व अथर्ववेदी कौशिकगोत्री ब्राह्मणांचा प्रवर एकच आहे. अर्थात् गोत्रप्रवरावरून कोणतेंहि अनुमान निघूं शकत नाही.

कूनिपूरच्या[3] ताम्रपटांत ६५ दानीय विप्रांचीं नांवें आलीं आहेत त्यांचीं गोत्रें व वेद येणेंप्रमाणे—

---

१ स. चि. मू. हिरण्यकेशी पा. ८. २ प्रा. च. को. ३७४.

३ ह्या परिच्छेदांतील माहिती राजापूरचे श्री. र. कृ. पाटणकर ह्यांनी दिली.

| विप्रसंख्या | गोत्र | ऋग्वेद | यजुर्वेद | सामवेद |
|---|---|---|---|---|
| ११ | आत्रेय | ५+१ आश्व. | ३+१ आप. | १ |
| ५ | काश्यप | १ | २+२ आप. | ० |
| ५ | कौंडिण्य | ० | ३+१ सत्या. | १ |
| ८ | कौशिक | १ | ३+४ आप. | ० |
| १ | धनंजय | १ | ० | ० |
| १४ | भारद्वाज | २+१ आश्व. | ८+२ आप. | १ |
| १ | भार्गव | ० | ० | १जैमिनी |
| १ | लोहितायन | ० | १ | ० |
| ७ | वत्स | २ | २+१ सत्या. | ० |
| १ | विश्वामित्र | १ | ० | ० |
| १ | शालावतस | १ | १ आप. | ० |
| १ | संकृति | ० | १ बौधा. | ० |
| ३ | हरितस | ० | २ | ० |
| ६ | ० | ० | ० | ० |
| ६५ | | १४+२ | २४+१० आप. +२ स.+१ बौ. | ३+१ जैमिनी |
| | | १६ | ३७ | ४ |

ह्या ६५ ब्राह्मणांत ऋग्वेदी १६ असून त्यांत २ आश्वलायन आहेत. बाकी १४ च्या सूत्रांचा उल्लेख नाही. यजुर्वेदी ३७ आहेत. त्यांपैकी १० आपस्तंब, २ सत्याषाढ व १ बौधायन मिळून १३ तैत्तिरीय असून बाकीचे २४ शुक्लयजुर्वेदी आहेत. सामवेदी ४ आहेत; त्यांत १ जैमिनीसूत्राचा आहे. बाकीच्यांच्या सूत्राचा उल्लेख नाही. एकूण ५७ संख्या झाली.

बाकीच्यांच्या नांवांपलीकडे उल्लेख नाही. ह्यावरून उघड दिसतें की, एकाच गोत्राचे ब्राह्मण कांहीं तीन वेदांत व कांहीं दोन वेदांत सापडतात.

वरील १३ गोत्रांपैकी १ आत्रेय, २ काश्यप, ३ कौंडिण्य, ४ कौशिक, ५ भारद्वाज, ६ भार्गव, ७ वत्स, ८ विश्वामित्र हीं ८ गोत्रें आज कऱ्हाडे व कोंकणस्थ ह्या दोन जातींत मिळून आहेत.

कौंडिण्य गोत्र आपस्तंबांत आहे. तेलंगे ब्राह्मणांत ह्या गोत्राचे ब्राह्मण आढळतात. हा ताम्रपट कन्याकुमारीजवळील तिनवेलि परगण्यांतील आहे.

यादवकुलोत्पन्न कृष्णराजाच्या अमात्याचें एक दानपत्र काव्यमालेंत प्रसिद्ध झालें आहे. त्यांत अनेक दानीय विप्रांचीं गोत्रें व उपनांवेंहि दिलीं आहेत. त्यावरून पटवर्धन (पट्टवर्धन) भारद्वाजगोत्री, आत्रेयगोत्री, काश्यपगोत्री, गर्गगोत्री, विष्णुवर्धनगोत्री व विश्वामित्रगोत्री असें असल्याचें दिसून येतें. ह्यांत कौंडिण्यगोत्री पटवर्धन नाहीत. ह्यावरून गोत्रावरून अनुमान काढणें किती निष्फळ आहे हें दिसून येईल. पटवर्धन हें अधिकारप्राप्त नांव असावें.

परशुरामक्षेत्राच्या आसपास हिरण्यकेशी असल्याचा उल्लेख खरा मानला तरी परशुरामक्षेत्र म्हणजे हल्लींचा चिपळूण तालुक्याच्या आसपासचा मुलूख हें कशावरून ? कन्याकुमारीपासून गुजराथ-काठेवाडपर्यंत परशुरामाचें क्षेत्र होतें व आहे.

मूळचे चित्पावन हिरण्यकेशी असून मागून ऋग्वेदी बनले ह्याला पुरावा नाहीच, परंतु उलट प्रकार मात्र म्हणतां येईल. उदाहरणार्थ उभयविध गोत्रांपैकी पुष्कळ गोत्रें ऋग्वेद्यांत आहेत. कोंकणांत राहणारे कऱ्हाडे व कुडाळदेशकर हे सर्व ऋग्वेदी आश्वलायन शाकलशाखी आहेत. त्यांच्या व चित्पावनांच्या गोत्रांचें कोष्टक 'गोत्र' प्रकरणांत दिलें आहे तें पाहावें.

चित्रपूर सारस्वतांत अत्रि, भारद्वाज, कंश, कौंडिण्य, कौशिक, वत्स हीं गोत्रें असून ते सर्व ऋग्वेदी आश्वलायनी आहेत.[१]

प्रथम ऋग्वेद होता, मागून अन्य वेद रचून झाले, तेव्हा प्रथम सर्व ऋग्वेदीच असण्याचा संभव अधिक. ह्यास्तव आश्वलायनांचे हिरण्यकेशी झाले हें म्हणणें एक वेळ शोभेल; परंतु उलट विधान करण्यास भरपूर पुरावा पाहिजे. कृष्णयजुर्वेद हा द्राविड ब्राह्मणांनी रचलेला आहे. तो दक्षिणहिंदुस्थानांत विशेषतः प्रचलित आहे. कृष्णयजुर्वेद हें नांवहि फार समर्पक व सूचक आहे. तैत्तिरीयसंहिता रचल्यावर पूर्वीच्या यजुर्वेदाला शुक्ल ही संज्ञा प्राप्त झाली असावी. द्राविड ही क्षत्रिय व्रात्यांची संतति आहे असें मनु म्हणतो "झल्लो मल्लश्च राजन्यात् व्रात्यान्निच्छिविरेव च। नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च।"[२]

दुसरा आक्षेप हा आहे की, आश्वलायनस्मृतींत विवाह उदगयनांत व शुद्धपक्षांत करावा असें सांगितलें असून सांप्रत चित्पावन ऋग्वेद्यांत तो दाक्षिणायनांत व कृष्णपक्षांत होत असतो. ह्यावरून सध्याचे ऋग्वेदी चित्पावन ऋग्वेदी नाहीत. आता मार्गशीर्ष महिन्यांत व कृष्णपक्षांतहि चित्पावन ऋग्वेद्यांत लग्नें होतात हें खरें परंतु तीं तशीं देशस्थ ऋग्वेद्यांतहि होतात त्याची वाट काय! ह्याचा अर्थ असा दिसतो की, धर्मशास्त्रापेक्षा रूढीचा अंमल आमच्यावर अधिक चालतो. तुळशीचें लग्न कार्तिकांत लागल्यानंतर विवाह करण्यास प्रत्यवाय नाही ह्या समजुतीने कार्तिकांत व मार्गशीर्ष महिन्यांत लग्नें लावण्याची वहिवाट पडली.

नित्युंदन गोत्र हें निरपवाद हिरण्यकेशी असून भिड्यांचें तें गोत्र आहे. भिड्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. वाडेश्वर गुहागर येथे आहे. चित्पाव-

---

१ चित्रपूर सारस्वत डायरेक्टरी पृ. २४ व २९. २ मनु १०·२२.

नांची प्रथम वसाहत गुहागर येथे झाली असें आमचें मत आहे. भिडे हिरण्यकेशी शाखेचे अद्यापि आहेत. हिरण्यकेशी शाखेच्या पूर्वी तैत्तिरीय-संहिता अस्तित्वांत होती. नित्युंदनगोत्री भिडे हे इतर चित्पावनांहून निराळे आहेत काय हें निश्चित करण्यास आज कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नाही. मात्र हा एक संशोधनाचा विषय आहे ह्यांत शंका नाही.

एका अकराव्या शतकांतील ताम्रपटांत नितुंदि गोत्राच्या आठ ब्राह्मणांचा उल्लेख आहे.[१] हे ब्राह्मण आंध्रदेशीय आहेत. नितुंदि व नित्युंदन एकच मानल्यास भिडे हे पूर्वीचे आंध्र होते अथवा त्यांनी प्रथम तैत्तिरीय-संहिता एखाद्या आंध्रापासून ग्रहण केली असें मानावें लागतें. पुढे ह्या भिड्यांपासून दुसऱ्या चित्पावनांत अन्यशाखेचा प्रसार झाला असावा.

भिड्यांचें आडनांव मूळचें वैशंपायन असावें. वैशंपायनांचें गोत्र नित्युंदनच आहे. परंतु वैशंपायन गुहागरास नसून मुरुडास असल्याचें दिसतें. कदाचित् गुहागरच्या मूळच्या वैशंपायनांनी आपलें नांव बदललें असेल व जें कुटुंब मुरुडला येऊन राहिलें त्यानें मूळ नांव कायम ठेवलें असेल. वैशंपायन व भिडे ह्यांचा जितका प्राचीन इतिहास मिळेल तितका जमविणें अवश्य आहे. आम्हांला वाटतें चित्पावनांत प्रथम कृष्ण-यजुर्वेदाचें ग्रहण वैशंपायन उर्फ भिडे ह्यांनी केलें असावें. वैशंपायन हें आडनांव ह्या कारणानेंच पडलें असावें.

आम्हांला असें वाटतें की, पूर्वी अनेक शाखांचें अध्ययन करण्याची वहिवाट होती. नाही तर द्विवेदी, त्रिवेदी, चतुर्वेदी हीं उपनांवें प्रचलित झालीं नसतीं. चित्पावनसमाजाने दोन शाखांचें अध्ययन केलें इतकेंच. प्रथमपासून चित्पावनांत आश्वलायन व हिरण्यकेशी दोनहि शाखांचे लोक

---

१ एपिग्रॅफिया इंडिया भाग ५ पान ८७.

असावे. हिरण्यकेशी आपट्यांतून निघालेले शेंडे आश्वलायन होतात ह्यापासून काय निष्कर्ष निघतो बरें ? हिरण्यकेशी शाखा जिवंत असतांहि कांही लोक ऋग्वेदी बनले अथवा कौशिकगोत्रांतील कित्येक आश्वलायन आणि कित्येक हिरण्यकेशी पहिल्यापासून होते असेंच अनुमान काढणें उचित होईल.

सर्व चित्पावन आरंभीं हिरण्यकेशी होते असें म्हणण्यास मुळींच आधार नाहीं; निदान पुढे आलेलीं प्रमाणें बलवान् नाहीत असें आम्हांस वाटतें.

चित्पावनांच्या प्रश्नावर व्यापक दृष्टीने विचार व्हावा म्हणून अथर्ववेद्यांची माहिती मीं श्री. डिसकळकर यांच्याकडे मागितली. ती त्यांनी मोठ्या तत्परतेने पाठवून दिली. त्यांतली वेचक माहिती ठिकठिकाणीं देण्यापेक्षा त्यांनी लिहून पाठविलेलें टाचण जसेंच्या तसेंच द्यावें असें वाटल्यावरून परिशिष्टाच्या रूपाने श्री. डिसकळकर ह्यांचा लेख येथे देत आहें. सर्व लेख महत्त्वाचा आहे हें सांगण्याचें कारण नाही.

## परिशिष्ट

# अथर्वणवेदी ब्राह्मण

प्राचीन काळीं राजे लोक ब्राह्मणांना जीं इनामें करून देत तीं ताम्रपटांवर कोरून लिहिलेलीं असत हें प्रसिद्धच आहे. या ताम्रपटांचा अभ्यास केला असतां असें दिसून येतें की ताम्रपट मिळविणाऱ्या ब्राह्मणांची त्यांच्या वेदाप्रमाणे वर्गवारी केल्यास यजुर्वेदी, ऋग्वेदी, सामवेदी व अथर्वणवेदी अशी क्रमाने त्यांची संख्या कमी झालेली दिसून येते[1]. अथर्वणवेदी ब्राह्मणांचा उल्लेख असलेलीं दानपत्रें फारच थोडीं मिळालीं आहेत. मात्र तीं हिंदुस्थानाच्या एका विशिष्ट भागांतच मिळालीं नसून अगदी लांब लांबच्या भागांत मिळालीं आहेत. ताम्रपटांवरून दिसून येणारी स्थिति प्रत्यक्ष व्यवहारांतही पाहायला मिळते. ब्राह्मणांची लोकसंख्या वेदानुसार कोणीं काढलेली नाही तरी समजहि असाच आहे की यजुर्वेदी ब्राह्मणांची संख्या सगळ्यांत जास्त व त्याच्या खालोखाल ऋग्वेदी ब्राह्मण. सामवेदी ब्राह्मणांची संख्या कांही तरी आढळते पण अथर्वणवेदी ब्राह्मण आहेत कीं नाहीत याचीच लोकांना माहिती नाही इतके ते अल्प आहेत.

---

१ उदाहरणार्थ, काठेवाडांतील वलभीच्या राजांच्या आजपर्यंत उपलब्ध झालेल्या १०० ताम्रपटांचा वरील दृष्टीने अभ्यास करतां असें दिसून येतें की १०० पैकी ६० ताम्रपट ब्राह्मणांना दिले आहेत. त्यांपैकी ज्यांवर ब्राह्मणांच्या नांवांचा व वेदाचा उल्लेख स्पष्ट दिसत नाही असे सोडून दिले तर २७ यजुर्वेदी, १० ऋग्वेदी ९ सामवेदी व ५ अथर्ववेदी ब्राह्मणांना दिलेले ताम्रपट आढळतात. या अथर्वणवेदी ब्राह्मणांची द्रोणायन, कौश्रवस, आत्रेय, पाराशर व भरद्वाज अशीं पांच गोत्रें दिलेलीं आहेत. गुजराथेंत मिळालेल्या गुर्जर दद्द राजाच्या इ. स. ५२९ च्या एका ताम्रपटांत अथर्ववेदांतील पिप्पलाद शाखेच्या व चाली गोत्राच्या एका ब्राह्मणाचा उल्लेख आला आहे.

हल्लीच्या काळांत अथर्वणवेदी ब्राह्मण मुख्यतः महाराष्ट्रांतील सातारा जिल्ह्यांतच असलेले दिसून येतात. महाराष्ट्रांतील ही अथर्वणवेदी ब्राह्मणांची वसती बरीच जुनी—इ. स.च्या चौदाव्या शतकाच्याहि पूर्वीची—असावी असें दिसतें. त्या काळीं सातारा जिल्ह्याच्या पूर्वभागांत खटाव परगण्यांतील ८४ गांवांची ज्योतिषकुळकर्ण्यांची वृत्ति त्यांच्याकडेच होती. नुसत्या वडूज गांवांत अथर्वणवेदी ब्राह्मणांचीं २५ घरें होतीं. पुढे सन १३९६ त दुर्गादेवीचा भयंकर दुष्काळ पडला तेव्हा हे लोक बरेचसे नष्ट झाले व कित्येक परागंदा झाले. कांही काळानंतर दादो नरसिंह नांवाचा भालंजन-गोत्री अथर्वणवेदी ब्राह्मण विद्यानगरास (विजयानगरास) गेला होता तो तेथून परत आला. दरम्यान कऱ्हाड प्रांतावर व अर्थात् त्याच्या ताब्यांत असलेल्या खटाव परगण्यांत बहामनी बादशहांची सत्ता नष्ट होऊन विजा-पूरच्या बादशहांची सत्ता प्रस्थापित झाली होती. दादो नरसिंहाने सर्व मुलूख उजाड झालेला पाहून तो विजापुरास गेला व बादशहाकडून सर्व कऱ्हाड प्रांताचा परवाना आणून मुलूख पुनः आबाद करण्याचें काम पतकरलें[1], व त्यांत त्याला बरेंचसें यश आलें असावें असें दिसून येतें. खटाव तालुक्यांत अजूनहि कित्येक गांवांतील जोशी, कुलकर्णी व देशपांडे अथर्वणवेदी ब्राह्मणच आहेत. मलवडी व आणखी तीन चार ठिकाणचे जोशी कुलकर्णी भालंजनगोत्री अथर्वण ब्राह्मण आहेत. ते बहुधा दादो नरसिंहाच्या वंशांतील असावेत.

साताऱ्याच्या आसपासही या ब्राह्मणांची वसती बरीच जुनी असावी असें दिसून येतें. साताऱ्यानजीक कृष्णावेण्णेच्या संगमावर खेड म्हणून एक गांव आहे. यालाच पूर्वी परशुरामक्षेत्र म्हणत असत. येथल्या व क्षेत्र

---

१ पेशवा दप्तर ४५.२ व ३.

माहुलीच्या ब्राह्मणांना परभूंच्या गृह्यसंस्कारांच्या बाबतींत शाहू महाराजांनी लिहिलेलीं कांही आज्ञापत्रें मिळालीं आहेत.[1] याच ठिकाणीं परसोजी भोसल्याचें दहन करण्यांत आलें होतें.[2] पुढे शाहूच्या कारकीर्दीतच पंत प्रतिनिधींच्या खटपटीने याच गांवांतील संगमाजवळच्या थोड्याशा जमिनी-वर हल्लीच्या संगम माहुलीची वसाहत झाली. तरी पण तेवढें गांवठाण खेरीज करून बाकी सर्व भाग अजूनहि खेड या गांवांतच मोडतो. खेडच्या परशुरामभट बिन बापूभट नांवाच्या कौशिकगोत्री अथर्वण ब्राह्मणास व दुसऱ्या कांही ऋग्वेदी ब्राह्मणांस छत्रपति राजारामाने राजशक २० (इ.स. १६९४) त चंदीचे मुक्कामीं सर्व गांवाची सनद करून दिली होती तिची नकल सांपडली आहे.[3] पुढे छत्रपति शाहूने रा. श. ३४ (इ.स. १७०८) मध्ये त्याच ब्राह्मणांस मागील सनद पाहून नवी सनद करून दिली. परंतु कांही वर्षांनंतर शाहूने खेडची पाटिलकी स्वतःकडे घेऊन व तेथे बागबगीचा करण्याचें ठरवून तें गांव या ब्राह्मणांकडून काढून घेतलें व स्वतःच दिलेल्या दानाचा छेद स्वतःच केला. यामुळे वाईट वाटून परशुरामभट काशीस गेला. तेथेच त्याचा देहान्त झाला. त्याचा मुलगा गोपाळभट देशीं आला; पण वतन मिळेना म्हणून तांदूळवाडीस जाऊन अनुष्ठान करूं लागला. पुढे पंडितरावाने ही गोष्ट ताराबाईच्या दृष्टीस आणल्यावर तिने इ. स. १७५५ त गोपाळभटास व दुसऱ्या ब्राह्मणांचे वंशजांस खेडच्या बदल्यांत औंधाजवळील पारगांव इनाम करून दिला व उत्पन्नाची वांटणी पूर्वीच्या प्रमाणे चौथा हिस्सा गोपाळभटास व बाकीचे तीन हिस्से बाकीच्या ब्राह्म-णांस अशी करून दिली. खेडांतील फक्त ३० बिघे जमीन गोपाळभटाकडे चालू ठेवली होती.

---

१ ऐतिहासिक पत्रव्यवहार ले. ४. २ किता ले. २९ व ३०.

३ हा व यापुढील कागद अजून अप्रसिद्धच आहेत.

खेड अथवा संगम माहुली येथे तीस पस्तीस वर्षांपूर्वी आठ दहा अथर्ववेदी ब्राह्मणांचीं घरें होतीं. त्यांत पांच चार ब्राह्मण चांगले पढिक होते. संगम माहुलीची जोशी कुलकर्ण्यांची वृत्ति कौशिकगोत्री अथर्ववेदी ब्राह्मणांकडे अजूनहि आहे. येथून जवळच्याच महागांव चिंचणेर वगैरे गांवीं शावास्य(?)गोत्री अथर्ववेदी ब्राह्मण जोशी कुलकर्ण्यांची वृत्ति सांभाळून आहेत. चिंचणेर तर्फ लिंब येथे स्वयंज्योति महाभागवतांच्या वंशजांचा एक मठ आहे. हें घराणें अथर्वण असून मूळचे खटाव तालुक्यांतील बुधाच्या उपमन्यु गोत्री देशपांड्यांपैकी आहे. याच चिंचणेरच्या जोशी कुलकर्णी घराण्यांतील तीन पुरुष सांगली, ग्वाल्हेर, व बुंदेलखंडांतील चरखारी येथे यज्ञादिकांच्या प्रसंगाने तेथील राजांच्या बोलावण्यावरून विद्वान अथर्ववेदी ब्राह्मण म्हणून गेले होते. त्यांचे वंशज त्या त्या ठिकाणीं आहेत. ते गोरे हें आडनांव लावतात. परंतु ग्वाल्हेरच्या वंशजांखेरीज बाकी कोणींहि वेदाध्ययन चालू ठेवलेलें नाही. ग्वाल्हेर येथे जांबकर आडनांवाचें मोठ्या अधिकाराच्या जागेवर असलेलें एक घराणें व इंदोर येथे खटावकर देशपांडे नांवाच्या अथर्ववेदी ब्राह्मणांचें एक घराणें आहे. इतरत्रहि पुणें, धुळें वगैरेसारख्या ठिकाणीं एखादें घराणें नोकरीच्या निमित्ताने गेलेलें आहे. सर परशुरामभाऊ कॉलेजांतील प्रो. भास्कर बळवंत देशपांडे मूळचे बुधाचे उपमन्युगोत्री अथर्ववेदी आहेत.

अशा रीतीने सातारा जिल्ह्यांतील व इतर ठिकाणीं गेलेल्या महाराष्ट्रीय अथर्वणवेदी ब्राह्मणांचीं एकंदर घरें फार तर ७०।७५ होतील व त्यांची संख्या २००।२२५ होईल. माझ्या पाहण्यांतच या ब्राह्मणांची संख्या गेल्या पंचवीस तीस वर्षांत कांहींशी घटल्याचें दिसून येतें. त्यांतील कांही ब्राह्मण अशिक्षितपणा व दारिद्य यांमुळे लग्नकार्य न झाल्यामुळे नष्ट झालेले दिसून येतात.

महाराष्ट्रीय अथर्ववेदी ब्राह्मणांचीं फक्त पांच गोत्रें प्रचलित आहेत—

कौशिक, शावास्य, उपमन्यु, भारद्वाज व भालंजन. कौशिक— वैश्वामित्र, अघमर्षण, कौशिक; शावास्य—अत्रि, अर्चन, शावास्य; उपमन्यु—वसिष्ठेंद्रप्रमदाभरद्वसु; भालंजन—काश्यपावच्छरनैधृति.

हे सर्व ब्राह्मण संध्या करतांना आपण अथर्ववेदान्तर्गतपैप्पलादशौनकीशाखाध्यायी आहों असें म्हणतात. तथापि श्रावणी, मुंजलग्नादि सर्व संस्कार अथर्ववेदी विद्वान ब्राह्मण दुष्प्राप्य असल्यामुळे ऋग्वेदी उपाध्यायाकडून अर्थात् त्यांच्याप्रमाणेच करतात. हे आपणांस देशस्थ ब्राह्मण म्हणवीत असून यांचे लग्नसंबंध ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणांशीं सररास होतात. यजुर्वेदी किंवा सामवेदी ब्राह्मणांशीं होत नाहीत.

महाराष्ट्राच्या बाहेरील अथर्ववेदी ब्राह्मणांची चांगलीशी माहिती मला मिळाली नाही. तथापि गुजराथेंत कांहीं घराणीं आहेत असें ऐकतों. भावनगरचे पूर्वकालीन प्रसिद्ध दिवाण गौरीशंकर अथवा गगा ओझा नागरजातीचे असून अथर्वणवेदी होते. त्यांचे संबंध भावनगरच्या ऋग्वेदी नागर ब्राह्मणांशीं झालेले आहेत.

---

वरील लेखांतील माहिती अनेक दृष्टींनी विवेचितां येण्यासारखी आहे. तथापि चित्पावनांच्या संबंधाने जे प्रश्न उद्भवतात त्यांच्या निर्णयाला साहाय्यभूत होईल तेवढयापुरताच येथे विचार करण्याचें योजिलें आहे.

प्रथमतः ब्राह्मणांची संख्या कमी होत चालली आहे हें श्री. डिसकळकर ह्यांचें म्हणणें विचार करण्यासारखें आहे. दारिद्र्यामुळे लग्नें होत नाहीत आणि त्या कारणाने वंशक्षय होतो हा अनुभव पुष्कळ पोटजातींसंबंधाने येत आहे. आमच्या इकडील गोवर्धन, जवळ वगैरे जातींची लोकसंख्या घटत आहे. अथर्वण ब्राह्मणांची संख्या उपरोक्त कारणानेच घटली हा श्री. डिसकळकरांचा अनुभव चित्पावनांनाहि आल्याशिवाय राहणार नाहीं असें आम्हांस वाटतें. चित्पावनसमाजाच्या लक्ष्यांत ही गोष्ट अद्यापि आलेली दिसत

नाही. देशांत शुक्लयजुर्वेद्यांचा भरणा सर्वांत मोठा असला पाहिजे. त्याच्या खालोखाल ऋग्वेदी; नंतर कृष्णयजुर्वेदी, सामवेदी व अथर्वणवेदी असा अनुक्रम लागेल. कालान्तराने ऋग्वेद व यजुर्वेद दोनच राहतील असें दिसतें. त्याच्या पुढची पायरी म्हणजे कृष्णयजुर्वेदाचा लोप होऊन ऋग्वेद व शुक्लयजुर्वेद ह्यांचेंच अस्तित्व कांही काल टिकेल. कोणत्या वेदाच्या पोटजाती घटत आहेत ह्याची नोंद वारंवार करण्यांत येईल तर ती कोणत्याहि समाजास मार्गदर्शक झाल्यावांचून राहणार नाही. चित्पावनांनी आपल्या समाजसंख्येवर जागरुक नजर ठेवणें अवश्य आहे.

संगम माहुली (सातारा) ला परशुरामक्षेत्र म्हणत असत ह्यावरून परशुरामाचा लौकिक किती मोठा होता ह्याची कल्पना करतां येते; व त्याचप्रमाणे एकच कोणतें तरी परशुरामक्षेत्र घेऊन बसणें किती फसगतीचें होईल हा विचार मनांत येतो. संगम माहुलीला परशुरामाचें देऊळ असल्याचें माहीत नाही.[1]

गोरे उपनांव अथर्वणवेदी ब्राह्मणांत आहे. जोश्यांचे गोरे झाले.

अथर्ववेदी ऋग्वेदी झाले तरी संध्येंतील आपल्या वेदाचा व शाखासूत्राचा उच्चार त्यांनी कायम ठेवला आहे. ऋग्वेद्यांत तैत्तिरीयसंहितेची आठवण करून देणारें कोणतेंच चिन्ह नाही; निदान संध्येमध्ये तरी नाही.

कौशिक व भारद्वाज हीं दोन चित्पावनांत आढळणारीं गोत्रें अथर्ववेदी ब्राह्मणांतहि आहेत. सर्वांचे प्रवर सारखेच आहेत. प्रत्येक गोत्राचे प्रवर ठरलेले आहेत. आता प्रवर म्हणजे जर कुल नव्हे तर गोत्र म्हणजे कुल होणार नाही. गोत्रप्रवरांचा संबंध कृत्रिम दिसतो.

---

१ म्हैसूर संस्थानांत शिमोगा जिल्ह्यांत तीर्थहाळी किंवा तीर्थकी गांव आहे. तेथे नदीकांठीं मोठा डोह आहे त्यास परशुरामतीर्थ म्हणत असल्याचें समजतें. ह्या ठिकाणीं परशुरामाने संभाषण केलें अशी दंतकथा आहे.

# ५ दक्षिण कानडांतील चित्पावन

दक्षिण कानडा प्रांतांत मुंडजें नांवाचा गांव आहे. तेथे व आसपास चित्पावन ब्राह्मणांची मोठी वसाहत आहे. त्यांची कांही माहिती केसरीचे श्री. रा. गो. भिडे यांच्या मध्यस्थीने मुंडजें येथील श्री. गो. ना. भिडे यांनी पाठविली. तीवरून असें दिसतें की, त्या बाजूला लोंढे, खाडिलकर, वाळणकर, दाते, फडके, जोशी, गोगटे, बेंडे, तुळपुळे, सहस्रबुद्धे, बर्वे, फाटक, ठोसर, डोंगरे, दामले, अभ्यंकर, पाळंदे, खरे, मेहेंदळे, भोगले, छत्रे, पुराणिक, नातू, आगाशे, करमरकर, गोविंड्ये, रानडे, चितळे, केळकर, साठे, भावे, पाटणकर, देवधर, गोडबोले, धोंड्ये, बोडस, मराठे, काकतकर, काळे, गोरे, पटवर्धन, चिपळूणकर, ताम्हनकर, परांजपे, आठवले, गोखले, म्हसकर, भिडे ह्या ४८ उपनांवांचीं घराणीं आहेत. ह्यांत मूळ ६० उपनांवांपैकी १५ उपनांवें आहेत तीं १ लोंढे, २ जोशी, ३ गोगटे, ४ दामले, ५ मेहेंदळे, ६ गोविंडये, ७ रानडे, ८ चितळे, ९ साठे, १० भावे, ११ बोडस, १२ पटवर्धन, १३ परांजपे, १४ आठवले, १५ गोखले. बाकीचीं ३३ दुसरीं नांवें आहेत. हीं दुसरीं नांवें पडल्यानंतरच कोंकणांतून हीं घराणीं त्या बाजूला गेलीं हें स्पष्ट आहे. हीं दुसरीं उपनांवें बनून पुष्कळ वर्षें लोटलीं असावीं. परांजपे, गोरे, भिडे, केळकर हीं उपनांवें फार जुनीं आहेत.

खाडिलकर व फडके हीं नांवें खाडिल्कर व फड्के अशीं तिकडील लोक लिहितात. साहित्यपत्रिकेच्या अंकांत[१] छापलेल्या श्लोकबद्ध यादींत फडके हें नांव फट्के ह्या स्वरूपांत आलें आहे. मुंडजे चित्पावनांत वाळणकर

---

१ वर्ष ३ अंक ४.

हें उपनांव अगदी अपरिचित आहे. पंचांगांत आढळत नाही; ऐकिवांतहि नाही. बेंडे हें केतकरांचें पडनांव आहे.[१] परंतु केतकर गार्ग्यगोत्री असून मुंड्जेकर बेंडे हे विष्णुवृद्ध गोत्र सांगतात ही मोठी अडचण आहे.

आता कोणत्या गोत्राचीं किती आडनांवें आहेत तें पाहूं.

| गार्ग्य | कश्यप | वासिष्ठ |
|---|---|---|
| लोंढे | खाडिलकर | वाळणकर |
| गोरे | ठोसर | दाते |
| म्हसकर | छत्रे | गोगटे |
| | करमरकर | अभ्यंकर |
| | गोखले | पुराणिक |
| | | नातू |
| | | साठे |
| | | बोडस |

| अत्रि | शांडिल्य | विष्णुवृद्ध |
|---|---|---|
| फडके | जोशी | बेंडे |
| चितळे | तुळपुळे | मेहेंदळे |
| चिपळूणकर | सहस्रबुद्धे | पराजपे |
| आठवले | डोंगरे | |
| | दामले | |
| | भोगले | |
| | केळकर | |
| | पाटणकर | |
| | शेंडे | |
| | ताम्हणकर | |

१ विद्यासेवक वर्ष ६ अंक ४ पान ५३ पाहा.

| कौशिक | भारद्वाज | कपि |
|---|---|---|
| बर्वे | रानडे | मराठे |
| फाटक | | |
| पाळंदे | | |
| खरे | | |
| भावे | | |
| देवधर | | |
| गोडबोले | | |

| वत्स | कौंडिण्य | नित्युंदन |
|---|---|---|
| काकतकर | पटवर्धन | भिडे |
| गोरे | | |

आगाशे व गोविंड्ये ह्यांचीं गोत्रें दिलेलीं नाहीत.

ह्यानंतर ऋग्वेदी व हिरण्यकेशी ह्यांचें वर्गीकरण करूं.

| आश्वलायन | हिरण्यकेशी |
|---|---|
| वाळणकर | दाते |
| लोंढे | बेंडे |
| खाडिलकर | डोंगरे |
| जोशी | पाळंदे |
| तुळपुळे | खरे |
| सहस्रबुद्धे | मेहेंदळे |
| बर्वे | रानडे |
| फाटक | साठे |
| ठोसर | भावे |
| दामले | देवघर |

| | |
|---|---|
| छत्रे | गोडबोले |
| करमरकर | बोडस |
| चितळे | भिडे |

ह्यांत १३ आश्वलायन व तितकेच म्हणजे १३ हिरण्यकेशी ह्या शाखांचीं कुटुंबें आहेत. हीं एकंदर २६ कुटुंबें झालीं. बाकीच्या २२ कुटुंबांची शाखा श्री. भिडे यांनी दिली नाही. ह्यांत भावे हिरण्यकेशी म्हणून लिहिलेलें आहे. परंतु आमच्याकडील भावे आश्वलायन आहेत.

आता कुलस्वामींच्या दृष्टीने ह्या घराण्यांचा विचार करूं.

| कुंभेश्वर | जानेश्वर | महाकाली | रामेश्वर | नाटेश्वर |
|---|---|---|---|---|
| ठोसर | काळे | भोगले | अभ्यंकर | लोंढे |
| | गोरे | | | |

| वाघेश्वर (व्याघ्रेश्वर !) (वाडेश्वर !) | गणपति | लक्ष्मीनृसिंह |
|---|---|---|
| खाडिलकर | दाते | जोशी |

सिद्धिविनायक

दामले

शेंडे

| वाडेश्वर | वीरेश्वर | वेळणेश्वर | लक्ष्मीनारायण | केशवराज | काळभैरव |
|---|---|---|---|---|---|
| सहस्रबुद्धे | फडके | गोगटे | खरे | मेहेंदळे | पाळंदे |
| साठे | बर्वे | तुळपुळे | देवधर | बेंडे | करमरकर |
| पटवर्धन | छत्रे | पुराणिक | मराठे | | ताम्हणकर |
| म्हसकर | काकतकर | नातू | परांजपे | | |
| भिडे | चिपळूणकर | केळकर | | | |
| | आठवले | गोखले | | | |

बाकीच्यांचे कुलस्वामी दिलेले नाहीत. ह्यांत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे जोगेश्वरी कुलस्वामी कोणाचीच नाही. त्या लोकांची कुलस्वामी सांगण्याची पद्धतिच मुळी "योगेश्वरीसहित वाडेश्वर" अशी आहे. ह्या पद्धतींतच कोंकणस्थांची जोगेश्वरी कुलस्वामी होण्याचें कारण समजण्यासारखें आहे. पहिला योगेश्वरी हा शब्द पुष्कळांच्या ध्यानांत राहिला आणि पुढला खरा स्वामी स्मरणांतून निसटला. महाकाली ही एक देवी मात्र भोगल्यांची आली आहे.

पटवर्धनांचा कुलस्वामी वाडेश्वर (करंजेश्वरी) आहे ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट वरील माहितींत आपणांस कळते. सध्या बहुतेक पटवर्धन आपला कुलस्वामी गणपति म्हणून सांगतात. हरभटजींनी गणपति हें उपास्यदैवत करण्याच्या पूर्वी पटवर्धनांचें कुलदैवत करंजेश्वरी देवी हें होतें. आता देवी कुलस्वामी दुसऱ्या कोणाची नाही, मग ती एकट्या पटवर्धनांचीच कशी झाली ही शंका होती. शिवाय करंजेश्वरी ही ग्रामदेवता आहे हें तिच्या नांवावरून उघड होतें. महाकाली, महालक्ष्मी, जोगेश्वरी, सरस्वती ह्यांप्रमाणे करंजेश्वरी हें नांव नाहीं. ह्याशिवाय करंजेश्वरी देवी स्वतंत्र नाही. करंजेश्वर देव आहे. करंजेश्वराचें देऊळ करंजेश्वरी देवीजवळच आहे. ह्या करंजेश्वराला टाकून नुसती देवी कुलस्वामी होणें शक्य दिसत नाही. आता करंजेश्वरी देवीनंतर करंजेश्वर देवाची स्थापना कोणीं केली असल्यास मात्र गोष्ट निराळी. ह्यावरून सर्व पटवर्धनांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वरच असला पाहिजे. वाडेश्वर–करंजेश्वरी–गणपति अशा अनुक्रमाने पटवर्धनांचे कुलस्वामी बदललेले आहेत. मूर्तिजापूरच्या पटवर्धनांच्या नैवेद्यांत वाडेश्वर अद्यापि स्थान धरून बसला आहे. हे पोमेडीचे पटवर्धन. दुसऱ्याहि पेमेडीकर पटवर्धनांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. धुळ्याच्या पटवर्धनांनी वाडेश्वर आपल्या नैवेद्यांत लिहून दिला आहे. परंतु ते आपलें मूळ गांव

गुहागर सांगतात. तेव्हां गुहागरचा देव त्यांच्या नेवेद्यांत असणें स्वाभाविक आहे.

शंकर कुलस्वामीच्या पुढे "महारुद्र" हा शब्द जोडण्याची ह्या लोकांची वहिवाट दिसते. उदा. वीरेश्वर महारुद्र योगेश्वरी, वाडेश्वर महारुद्र करंजाई. तथापि एके ठिकाणीं तर "लक्ष्मीनारायण महारुद्र" ह्याच अभिधानाने कुलस्वामी संबोधिला आहे. हा पराजप्यांचा कुलस्वामी होय.

आमच्याकडे आलेल्या तीन खाडिलकरांच्या कुलस्वामींत एकाचा कुलस्वामी वाडेश्वर असून दुसऱ्याने योगेश्वरी कुलस्वामी ठेवून वाडेश्वराला नैवेद्यांत ढकलला आहे. तेव्हा मुंड्जे खाडिलकरांचा वाघेश्वर वाडेश्वर असावा.

ऋद्धिसिद्धिविनायक व गणपति हे कुलस्वामी दामले, शेंडे आणि दांते ह्यांचे कसे झाले हें गूढ आहे. फडके, चिपळूणकर, आठवले हे अत्रिगोत्री असून ह्या सर्वांचा कुलस्वामी वीरेश्वर आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. अत्रिगोत्री चितळेहि चिपळूणचे व तेथेच वीरेश्वर आहे. चितळ्यांचा कुलस्वामी वीरेश्वर आहे. मुंड्जाला सुद्धा दुसऱ्या फडक्यांचा कुलस्वामी सोमेश्वर आहे. येथील एका फडक्यांनी तोच कुलस्वामी सांगितला आहे. बर्वे ह्यांचा कुलस्वामी कोळेश्वर समजतात. परंतु मुंड्जेकर बर्वे यांचा कुलस्वामी वीरेश्वर आहे. कुंभेश्वर कुलस्वामी ह्या बाजूच्या कोणत्याहि चित्पावनाने सांगितला नाही. हा देव कोंकणांत संगमेश्वर व दापोलीजवळील सारंग ह्या दोन गांवीं आहे. मुंड्जाच्या ठोसरांचा कुलस्वामी कुंभेश्वर आहे. इकडील ठोसर लक्ष्मीनारायण कुलस्वामी सांगतात. ज्यांनी काळभैरव कुलस्वामी सांगितला आहे ते तो काशीचा काळभैरव म्हणून म्हणतात. इकडल्या लोकांचीहि समजूत अशीच आहे. हा समज बरोबर असल्यास जोगेश्वरीप्रमाणे काळभैरव हा कोंकणाबाहेरील

मुलखांतला कुलस्वामी आहे असें म्हणावें लागेल.

गोरे दोन प्रकारचे आहेत. गोरे उर्फ काळे. हे वत्सगोत्री आहेत. दुसरे गोरे गार्ग्यगोत्री आहेत. काळे आणि गोरे हीं एकाच घराण्याचीं दोन नांवें आहेत. गोरे आडनांव बनत असतांना हा प्रकार झाला आहे हें उघड आहे. तोंपर्यंत गोरे ह्या आडनांवाला निश्चितता आली नव्हती. जानेश्वर कुलस्वामी येथे फक्त बेडेकरांनी सांगितला होता. मुंड्जे कागदांत काळे गोरे व गोरे ह्या दोघांचा जानेश्वर कुलस्वामी असल्याचें आढळून येतें. आमच्या इकडील कोणत्याहि काळ्या-गोऱ्यांनी जानेश्वर कुलस्वामी सांगितला नाही.

कोंकणस्थांत बोडण असतेंच अशी सर्वसाधारण समजूत आहे. मुंडजेकर ४८ कोकणस्थ घराण्यांपैकी २६ कुटुंबांत बोडण घालण्याची रूढि असून १२ कुटुंबांत ही रूढि मुळीच नाही. बाकीच्या १० घराण्यांत काय वहिवाट आहे हें समजलें नाही. १ खाडीलकर, २ वेंडे, ३ सहस्र-बुद्धे, ४ बर्वे, ५ डोंगरे, ६ मेहेंदळे, ७ भोगले, ८ छत्रे, ९ शेंड्ये, १० काकतकर, ११ काळे, १२ पटवर्धन ह्या आडनांवांच्या कुटुंबांत बोडण घालण्याची रीत नाही.

# ६ आडनांवें

आडनांव म्हणजे कुलनांव. कोंकणस्थांत इतरांपेक्षा आडनांवें प्रामुख्याने दिसतात. शिवाय तीं धंद्यावरून किंवा हुद्यावरून पडललेलीं नसून कशावरून पडलीं हें अद्यापि निश्चित झालेलें नाही. ह्या कारणास्तव कोंकणस्थांचीं आडनांवें हा एक संशोधनाचा विषय झाला आहे. आडनांव ह्याला प्रतिशब्द उपनांव आहे. एका कुलांतील सर्वांचा निर्देश ज्याने करतां येतो तें आडनांव. अर्धनाम या संस्कृत शब्दाचें अपभ्रष्ट रूप अड किंवा आड नांव असें कित्येक प्रतिपादितात. परंतु अर्थाला ही व्युत्पत्ति अनुकूल नाही. आडनांव हें अर्धनांव कसें ! कानडींत अड्ड म्हणजे श्रेष्ठ असा अर्थ होतो. आड्डनाम=आडनांव=श्रेष्ठ नांव. शब्दकोशांत ही व्युत्पत्ति दिलेली आहे.

एका अर्थाने आडनांव म्हणजे श्रेष्ठ नांव असें म्हणतां आलें तरी वाईट नांव असाहि अर्थ आडनांव या शब्दांतून काढतां येईल. काळे, आगलावे, गोडबोले, तिरडे, घुले, खंगले, आचारी, स्वयंपाकी, कामाठी, बडे, भस्मे, शिधोरे, साने वगैरे उपनांवें कमीपणा आणणारींच आहेत. आडमार्गाप्रमाणेच असल्या तऱ्हेचें आडनांव होय. गौण अथवा दुय्यम प्रतीचें नांव सुचविणारा उपनाम शब्द अगोदरचा असला पाहिजे. आडनांव हा शब्द पाठीमागचा आहे.

आडनांवाचें संस्कृत स्वरूप समुपाभिधान हें होय.

सन १५६५ त महालिंगदास नांवाच्या कवीने आडनांवें कशीं प्राप्त झालीं याबद्दल लिहितांना म्हटलें आहेः— जैसे स्थानीं बसले । तेंचि आडनांव पावले । अथवा करणीस्तव झाले । नाना कुळांचे ॥ ह्यावरून ठिकाणावरून

---

१ दे. ब्रा. खानेसुमारीचा अहवाल स. १९३१ पृ.११.

व कृतीवरून आडनांवें पडल्याची समजूत होती हें उघड दिसतें.

शके ५३४ च्या एका ताम्रपटावरून वरील अनुमानास आणखी प्रमाण मिळतें. ताम्रपटांतील मजकूर असा—वासिष्ठगोत्राय तैत्तिरीयाय तगराधिवासिने चतुर्वेदार्योंबरखेडकुलनामधेयाय ज्येष्ठशर्मणे०. ज्याला दान दिलें त्याचें नांव ज्येष्ठ. तो वासिष्ठगोत्री तैत्तिरीयशाखेचा, चारी वेद जाणणारा, तगरगांवीं राहणारा व उंबरखेड हें कुलनाम धारण करणारा असा होता. उंबरखेड व तगर (तर) हीं गांवें निजामच्या मुलखांत आहेत.[1]

कोंकणस्थांत मूळ ६० आडनांवें होतीं असें म्हणतात. पूर्वीच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ६० कुळी होत्या. कुळीला आडनांव म्हणतात. शूद्रांत कुळी शब्द प्रचारांत आहे. मूळ आडनांवें ६० होतीं ह्याचा अर्थ इतकाच की, ह्या आडनांवांची ज्याने नोंद केली त्यास त्या वेळीं ६० आडनांवांचे कोंकणस्थ आढळले. तथापि आपण हीं ६० आडनांवें मूळचीं असें धरून चालूं. कारण त्यांच्या पाठीमागे आपणांस जातां येत नाही. जुन्या शिलालेखांत पटवर्धन व घैसास हींच कोंकणस्थांत सांप्रत असलेलीं आडनांवें आलेलीं आहेत. १००० वर्षांपूर्वीच्या शिलालेखांत पटवर्धन नांव आढळतें. चिंतामणराव वैद्य म्हणतात हें नांव मराठ्यांत किंबहुना तेलंगणांतील सुद्धा आहे.[2] तें अधिकारवाचक आहे व प्राचीन लेखांत येतें. घैसास हें नांव मूळ ६० नांवांपैकी नाही.

गोत्रमालिकेंत ६० आडनांवें दिलीं आहेत तीं त्यांच्या गोत्रांसह येथे देतों.

१ काश्यप—१ लेले, २ गानू, ३ जोग, ४ लवाटे, ५ गोखले;

२ शांडिल्य—६ सोमण, ७ गांगल, ८ भाटे, ९ गणपुले, १० दामले, ११ जोशी, १२ परचुरे;

---

१ Indian Antiquary मार्च स. १९१२ पृ. ७२.

२ गोखले घराण्याचा इतिहास—प्रस्तावना पृ.६.

३ वासिष्ठ—१३ साठे, १४ बोडस, १५ वोक, १६ बापट, १७ बागूल, १८ घारू, १९ गोगटे, २० भाभे, २१ पोंगशे, २२ विंझे, २३ साठे, २४ गोवंड्ये;

४ विष्णुवर्धन—२५ किडमिडे, २६ नेने, २७ परांजप्ये, २८ मेहेंदळे.

५ कौंडिण्य—२९ पटवर्धन, ३० फणशे;

६ नित्युंदन—३१ वैशंपायन, ३२ भाडभोके;

७ भारद्वाज—३३ आचवल, ३४ टेणे, ३५ दर्वे, ३६ गांधारे, ३७ घांघुरडे, ३८ रानड्ये;

८ गार्ग्य—३९ कर्वे, ४० गाडगीळ, ४१ लोंढे, ४२ माटे, ४३ दाबके;

९ कपि—४४ लिमये, ४५ खांबेटे, ४६ जाईल, ४७ माईल;

१० जामदग्न्य—४८ पेंडसे, ४९ कुंटे;

११ वत्स—५० मालशे;

१२ बाभ्रव्य—५१ बाळ, ५२ बेहरे;

१३ कौशिक—५३ गद्रे, ५४ बाम, ५५ भावे, ५६ वाड, ५७ आपटे;

१४ अत्रि—५८ चितळे, ५९ आठवले, ६० भाडभोळे.

केशवभट केळकर यांनी शक १८२७ मध्ये स्कंदपुराणांतील ६० उपनामांचे श्लोक प्रसिद्ध केले व जे श्लोक भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत[१] छापले आहेत ते श्लोक व गोत्र मालिकेंत दिलेले श्लोक जवळ जवळ सारखेच आहेत. गद्रे व अमरापूरकर यांची गोत्रमालिका श. १७७७ मध्ये शिलायंत्रावर ज्ञानदर्पण छापखान्यांत मुंबई येथे छापली. ह्या गोत्रमालिकेंतील श्लोकांत मैटाः (माट्यांचे कुलांतील) आहे तर केळकर भटजींच्या श्लोकांत मैंढाः (मांढे ?) असें आहे. रा. विश्वनाथशास्त्री जोशी यांच्या यादींत गांगल, पोंगशे, किडमिडे, गांधारे व दाबके हीं आडनांवें

१ वर्ष १२ अंक २ पा. ६२.

नाहीत. ही अर्थात् नजरचूक असावी. ही यादी भा. इ. सं. मंडळाच्या वर निर्दिष्ट केलेल्या त्रैमासिकांत का. ना. साने यांनी प्रसिद्ध केली आहे.

महाराष्ट्र साहित्यपत्रिकेंत श्री. प्र. धों. कानिटकर यांनी जी श्लोकबद्ध यादी छापली आहे ती ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडांतून घेतलेली दिसते. दोनहि ठिकाणचे श्लोक ताडून पाहिले असतां किरकोळ फरक वगळल्यास तंतोतंत जुळतात. शेवटला श्लोक

"नेत्रां अधिक सकलही शत दोनशांचे
यातें अधीक असती तरि भेद यांचे."

दोहोंमध्ये एकच आहे. "दोनशांचे" ह्याच्या ठिकाणीं कानिटकरांच्या श्लोकांत "दोन साचे" असें आहे. शुद्धतेच्या दृष्टीने मार्तंडामधील श्लोक चुकीचा दिसतो. ब्राह्मणोत्पत्तिमार्तंड व्यंकटेश छापखान्यांत शक १८३६ सालीं छापला आहे. "अथ चित्तपावनब्राह्मणोत्पत्तिमाह ।। स्कांदे सह्याद्रिखंडे महादेव उवाच" असा आरंभ करून शूर्पारकक्षेत्र परशुरामाने निर्माण केलें, तेथे ब्राह्मण आणून बसविले, ह्या ब्राह्मणांनी परशुरामाकडे श्राद्धास जाण्याचें नाकारल्यावरून त्याने कोळ्यांचे ब्राह्मण केले, हेच चित्तपावन ब्राह्मण होत वगैरे सह्याद्रिखंडांतील हकीकत देऊन मध्येच अतःपरं प्रवक्ष्यामि गोत्रप्रवरनिर्णयम् । उपनामादिभेदं च महाराष्ट्राख्यभाषया ।। असें म्हणून मराठी श्लोक आडनांवांचे दिले आहेत. ह्यानंतर "विशेषेण द्विजा ह्येते सर्वे वै तैत्तिरीयकाः । आपस्तंबादि सूत्रानुयायिनो गुणवत्तराः ।। व्यापारनिष्ठा बहवः शास्त्रनिष्ठाश्च केचन । स्वधर्मकर्मनिरतास्ताभ्यां स्वल्पाधुना भुवि ।। एषां भोजनसंसर्गो महाराष्ट्रैर्विशेषतः ।। कन्यादानं स्ववर्गे च भवत्येव न संशयः ।। इत्येवं कोंकणस्थानां विप्राणां च विनिर्णयः । संक्षेपेण प्रकथितः शास्त्ररूढिप्रमाणतः ।।

१ वर्ष ३ अंक ४.

असे श्लोक आहेत.

मार्तंडांतील श्लोकांत मूळचीं ६० उपनामें म्हणून दिलेलीं नाहीत. परंतु पान ३२३ वर 'अथ षष्ठ्युपनामचक्रम्' असें म्हणून मराठींतच ६० आडनांवें दिलीं आहेत तीं:—

१ अभ्यंकर २ आठवले ३ आचवल ४ ५ कर्वे ६ करंदीकर ७ काळे ८ कारलेकर ९ किडमिडे १० कुंटे ११ केळकर १२ कोझेकर १३ खाडिलकर १४ खोत १५ गणपुले १६ गाडगीळ १७ गोडबोले १८ गोखले १९ गांगल २० घेघाळ २१ घांगुरडे २२ चितळे २३ चापेकर २४ छत्रे २५ जोशी २६ जोग २७ जोगळेकर २८ टेणे २९ टकले ३० डोंगरे ३१ ताम्हणकर ३२ तुळपुळे ३३ थत्ते ३४ दर्वे ३५ दाबके ३६ धामणकर ३७ नेने ३८ नातू ३९ परांजपे ४० पटवर्धन ४१ फडके ४२ फणशे ४३ बर्वे ४४ बाळ ४५ बेहरे ४६ भागवत ४७ भाडभोक ४८ मराठे ४९ माईल ५० रानडे ५१ लिमये ५२ लोंढे ५३ वेलणकर ५४ वैशंपायन ५५ शिंत्रे ५६ साठे ५७ सोमण ५८ सोवनी ५९ सोहोनी ६० सहस्रबुद्धे.

ही यादी चुकीची आहे व शोधपूर्वक केलेली नाही हें वरवर पाहणारालाहि दिसून येईल. खोत, सहस्रबुद्धे, चापेकर, केळकर, खाडिलकर, गोडबोले वगैरेसारखीं उघड उघड पाठीमागून बनलेलीं नांवें मूळ साठांत म्हणून समाविष्ट केलीं आहेत. अशीं एकंदर २९ नांवें जास्त आहेत; अर्थात् तितकींच जुनीं नांवें गळलीं आहेत. बर्वे नांव असून वाड आडनांव नाही; तसेंच सोवनी व सोहोनी हीं दोन आडनांवें दिलीं आहेत. ह्यावरून ही यादी तयार करणाराची पात्रता स्पष्ट दिसून येते. चार आंकड्याचें नांव चुकून राहिलें आहे तें आपटे असावें.

गोत्रनाममालिकेंतील व भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांतील ६०

आडनांवांचे संस्कृत श्लोक एकच आहेत आणि ते "स्कांदे शौनकः" असा प्रारंभ करून दिले आहेत. नारो अप्पाजी गोडबोले यानी इ. स. १८८८ मध्ये छापलेल्या गोत्रमालिकेंत (५ वी आवृत्ति) हेच श्लोक आहेत. एकंदरींत गोत्रनामावलीच्या पहिल्या आवृत्तींत दिलेलीं उपनामें जुन्यांत जुनीं असें मानण्यास हरकत नाही. कित्येकांच्या मतें परशुरामाने प्रेतांपासून निर्माण केलेले ब्राह्मण १४ होते. हीच संख्या पुढे ६० झाली. त्रेतायां कुणपोत्पन्ना भूताः परशुरामतः । विप्रा भुवनसंख्याश्च तद्व्याख्या सह्यखंडके[1] ॥ भुवनसंख्या म्हणजे १४.

असो. ह्या ६० आडनावांचीं आज ४०० वर आडनांवें झालीं आहेत. मराठेशाहींत ही संख्या फुगली असली पाहिजे. ह्या आडनांवें तयार होण्याच्या कारखान्यावरून चित्पावनांचें कर्तृत्व सिद्ध होण्यासारखें आहे. कारण पुष्कळ नांवें धंदे, हुद्दे, पराक्रम वगैरेवरून पडलीं आहेत. गोत्रमालिकेंत ३०३ आडनांवें दिलीं आहेत. पूर्वी उल्लेखिलेल्या आमच्या-जवळ असलेल्या छापील पानांत ही संख्या ३५२ आहे. (३५३ ही बेरीज चुकलेली आहे.) साहित्यपत्रिकेंतील यादी २०१ नांवांची आहे. राजवाड्यांच्या यादींत २०३ नांवें आहेत. हीच संख्या विश्वनाथशास्त्री जोशी यांच्या यादींत आहे. चालू पंचांगांतून सुमारें ३०४ आडनांवें कोंकणस्थांचीं म्हणून दिलेलीं असतात. तात्पर्य निश्चित आंकडा सांगणें कठीण आहे. पंचांगांत सर्व आडनांवें येत नाहीत व येणें शक्य नाहा. ज्यांचें आडनांव पंचांगांत नाही त्यांनीं ते पंचांगकर्त्यांस कळविल्यास विवाहसंबंध जुळविण्याच्या कामीं त्यांनाहि उपयोग होईल व सर्व आडनांवांची जंत्री सहज तयार होऊं शकेल. परंतु सर्वांत उत्तम गोष्ट म्हणजे हीं पाठीमागून धारण केलेलीं

१ ब्राह्मणोत्पत्तिमार्तंड पान ३२४.

नांवें सोडून देऊन पहिलीं नांवें पूर्ववत् चालूं करावीं.

गोत्रमालिकाकार जोशी ऊर्फ गद्रे आणि अमरापूरकर ह्यांनी स्वतः चौकशी करून कागदपत्र पाहून कोणत्या मूळ आडनांवांचे कसे फाटे फुटले हें लिहिलें आहे त्यांच्या मताप्रमाणे—

लेले = पागे

गोखले = कातरणे, शिवणेकर, रास्ते, जामदार, पणदेव, बढिये, मारवलकर, पालकर, वेहलेकर.

सोमण = नरवणे

जोशी (शांडिल्य) = पावशे, तुळपुळे, काणे, टकले, घनवटकर, शेरकर, देशमूख, शेंडये, घुले.

जागूल = कोपरकर

ओक = ओंकार

पटवर्धन = आचारी, कटके

वैशंपायन = सहस्रबुद्धे, पिंपळखरे, साडमानी

भाडभोके = भिडे

आचवल = राहाळकर

रानडये = आखवे

गाडगीळ = सुतार, म्हसकर, केतकर, वैद्य, टोळे, खंजणे, आधिटकर, मरुगकर

खांबेटे = साने, काळे

लिमये = करंदीकर, खासगीवाले.

बाम = गोरे

वाड = बापये, बर्वे, कोल्हटकर

आपटे = शेवडे, फणसुकर, शेंडे, हुंबे

चितळे = जोगळेकर, मोने, चोळकर

भाडभोळे = चाफेकर, वाडदेकर, चिपळूणकर

बापट = घारे, घारपुरे, सांवरकर

पहिल्या ६० आडनांवांतून आणखी ५९ आडनांवें निघालीं. एकूण ११९ आडनांवें झालीं.

ह्या शिवाय पाठीमागून बनलेल्या आडनांवांतून दुसरीं आडनांवें निघालीं तीं—

भट = फाळके, दामोदर, दारसेतकर;

दांतीर=शित्रे,सुकाडकर (सुकोंडीकर)

गणपुले = आंबडेकर, सहस्रबुद्धे, शिधये

पाटणकर = भाटे
केळकर = कोंजरेकर, ताम्हणकर, निदसुरे, तिवेकर, पचे
पत्ते = कुटुंबळे
डोंगरे = पावगी, पळनिटकर
दातार = दांडेकर, वर्तक, आचरकर
अभ्यंकर = नातू, कारलेकर, तिरडे
मोडक = विनोद
भट = पोतदार
मराठे = राणे, चक्रदेव, विद्वांस,
सोहोनी = नेवरे, भैरव, शेवडे, होळ
फाटक = रास्ते
सटकर = कानिटकर
आगाशे = खुळे, वर्तक, शेवडे
खरे = शारंगपाणी, तिरुके
देवधर = ढमढेरे
फडके = हशमनीस

ह्या १९ नांवांतून ४१ नांवें निघालीं हीं ४१ व पूर्वीचीं ५९ मिळून १०० नांवांचें मूळ गोत्रमालिकाकारांनी शोधून काढलें आहे.

आपटे घराण्याच्या इतिहासांत ह्यासंबंधाने जी माहिती दिली आहे ती बरोबर नाही म्हणून ती येथे विचारांत घेतली नाही.

आता आम्हांला मिळलेली माहिती येणेंप्रमाणे :—

अभ्यंकर = काशीकर, नगरकर, कालेंकर, महाबळ, पेठे
आपटे = शेवडे, निवेदरे
आगाशे = फाटक
लिमये = करंदीकर
शिधये = देशमूख
खोत = करमरकर
काळे = जोशी (वत्सगोत्री), उकीडवे
किडमिडे = मेहेंदळे
चिपळूणकर = कुर्लेकर
केतकर = सुतार
जोशी = भाटे
गाडगीळ = बेडेकर, केतकर, वैद्य, पलुसकर
बाम = कोल्हटकर
खरे = वेलदुरे, खानदेशे
साठये = गोंधळेकर, गोवंडे

मालशे = गोरे
बरवे = घाटवेडकर, जोगदंड, जोगदेव (कौशिक), जोशी, लेलगे
जोगळेकर = चोळकर
केतकर = जोशी
धारे = भागवत
भट = दारशेतकर, सुंकले
दांडेकर = कोंकणे, बाटवे, पर्वते, औंजाळे
परांजपे = देव
खरे = घोपा(व?)डकर
भाभे = नातू, कवडीकर, अभ्यंकर
केळकर = निदसुरे, कोजरेकर
डोंगरे = पळनिटकर
भट = फाळके
आपटे = फणसूकर
जोशी = वाडेकर (वाडें पडेल वरून), मेडतकर, राशिनकर, साखरे, गोवित्रीकर, बावडेकर, वाळके, घांघरेकर (वत्स), धनवटकर, काळे, सखदेव, राजवाडे
डोंगरे = खरवळे
पाटणकर = गैलाड
जोगळेकर = वाडदेकर
मराठे = रटाटे
संगमेश्वरकर जोशी = दुगल
भागवत = लाटे
ओक = शिद्रस, पांगारकर, दीक्षित (साकुर्डीकर)
मायदेव = शुक्ल
भट = पंडित (काश्यप), सुभेदार, ढब्बू
चितळे = भाजेकर, आवळसकर
दातार = चौककर
भोगले = देसाई
ठोसर = वाकनीस
काणे = हवलदार
दांते = बुदबळे
बेडेकर = गोळे (गार्ग्यगोत्री)
परचुरे = काळे
नित्सुरे = उपाध्ये (शांडिल्य)
पोंक्षे = दांडेकर, भातखंडे
भट (गार्ग्यगोत्री) = घामणकर
पेंडसे = चांगबोले
गोवांडे = दांडेकर[१], वेलणकर
सोमण = मायले, नरवणे

---

१ हा आमचा तर्क आहे. कारण दांडेकरांचा मुलगा गोवांड्याकडे दत्तक जातो.

| | |
|---|---|
| आगाशे = शेंडे | जोशी (शांडिल्य) = पाटणकर, भाटे |
| गोखले = बडे, पालकर, कातरणे | रानडे = मनोहर |
| जोशी = मटंगे, वेहरे | बापट = सावरकर |
| पराजपे = देव | वैद्य = लागू, पैसास |
| चापेकर = दावक | थत्ते = विद्वांस, फडणीस, कुटुंबळे |
| बाम = कोल्हटकर | मराठे = विद्वांस, खांबेटे |
| खाडिलकर = वर्तक | पिंपळखरे = सहस्रबुद्धे |
| कुंटे = वर्तक, भागवत | बाळ = सामल |
| दातार = सबनीस, आघारकर | ओक = मोडक, देशमूख |
| सहस्रबुद्धे = सरंजामे, गणपुले | मालशे = गोरे ( वत्स गोत्री ) |
| ठोसर = बेंद्रे | वझे = वैद्य ( गार्ग्य ) |

ह्यांमध्ये देसाई, सराफ, पोतदार, नाईक हीं नांवें घेतलीं नाहीत.

दीक्षितांत पटवर्धन, देवधर, वैशंपायन, काणे हीं नांवें आहेत; तसेंच महाजन नांव पेंडसे, बाम, सहस्रबुद्धे, भट, मराठे यांस व्यापून आहे. खासगीवाले, पुराणिक, चौगुले, फडणीस हीं वाटेल त्याचीं आडनांवें होऊं शकतात. उदा. गोडबोले = फडणवीस, पटवर्धन = खासगीवाले, गोखले = चौगुले, बापट व भट = पुराणिक, ओक = देशमूख. जोशांमध्ये वरवडेकर, पावसकर, आवर्डीकर, वेळासकर, केंपवाडकर, पंचनदीकर, राहाळकर, आरावकर इत्यादि भेद आहेत.

वर्तक हेंहि हुद्याचें नांव आहे. कोशांत हुकूम बजावणारा गांवकामगार असा अर्थ ह्या शब्दाचा दिला आहे. सुतार, गलबतें करणारा असाहि दुसरा अर्थ कित्येक देतात. वर्तक हें नांव ब्राह्मणेतरांतहि आहे. कामावरून नांव पडल्यामुळे मूळच्या अनेक आडनांवांना तें लावण्यांत येऊं लागलें. वर्तकांत कुंटे, खाडिलकर, आगाशे, दातार हीं आडनांवें

आढळतात. विद्वांस हें नांव थत्ते व मराठे यांना पडलें. मराठे कपिगोत्री असून थत्ते शांडिल्यगोत्री आहेत. तेव्हा विद्वांस हें गुणवाचक नांव आहे हें स्पष्ट दिसतें. विद्वांसाप्रमाणेच सहस्रबुद्धे हें नांव पिंपळखरे, गणपुले, वैशंपायन यांनी संपादन केलें. सहस्रबुद्धे हें नांव २५० वर्षांचें जुनें आहे.[1] गणपुले शांडिल्यगोत्री आणि पिंपळखरे व वैशंपायन नित्युंदनगोत्री आहेत. पंचनदी येथे पिंपळखरे हें शेताचें नांव असल्याचें आढळतें. झाडावरून हें नांव पडलें असावें. शांडिल्यगोत्री सहस्रबुद्ध्यांतून सरंजामे उत्पन्न झाले. मूळ ओकांतून मोडक उत्पन्न झाले आणि मोडकांनी विनोदांना जन्म दिला. तिघांचें गोत्र वासिष्ठच होय. ओकांप्रमाणे मोडक कोळथरचे मूळ राहणारे असून दोघांचा कुलस्वामी कोळेश्वर आहे. शेवडे हें आडनांव कित्येक आपट्यांना, आगाशांना व सोहन्यांना चिकटलें. आपटे व आगाशे यांचें गोत्र एकच आहे आणि तें कौशिक. सोहन्यांचें गोत्र वत्स आहे. दुसरे भारद्वाजगोत्री सोहनी आहेत असें पंचांगावरून दिसतें. अनेक घराण्यांना पडलेलें नांव अर्थसूचक असावें, परंतु सोहनी ह्याचा अर्थ नीटसा लक्ष्यांत येत नाही. सोहनी, सोवनी, सोनी अशा तीन तऱ्हांनी हा शब्द लिहिण्याची वहिवाट आहे. दाबक आडनांवाचे एक गृहस्थ कळवितात की आमच्या पूर्वजांपैकी एकाने परक्याची मिळकत दाबली तेव्हापासून आम्हांस दाबक म्हणूं लागले. आम्ही मूळचे चापेकर आहों, नांवें लोकच आपणांस ठेवतात. आणि तीं फार करून व्यंगसूचक असतात; म्हणूनच नांव ठेवणें म्हणजे दोष देणें असा अर्थ रूढ झाला आहे. श्री. ग. बा. नित्सुरे लिहितात 'आमचें मूळचें आडनांव केळकर असून आमच्या पूर्वजांत कोणी तरी फारच झोपाळू निघाल्यामुळे झोपाळू या अर्थाने हल्लीचें आडनांव आम्हांस प्राप्त झालें असें कांही लोक

१ बा. ना. सहस्रबुद्धे यांचें पत्र.

सांगतात. ही व्युत्पत्ति खरी मानून आमचे कुटुंबांतील लोक नित्सुरे असें आडनांव लावतात. दासबोधांत झोपाळू अशा अर्थाने स्वामींनी निदसुरा असा शब्द वापरलेला आहे. "भानूदयीं निदसुरा भट होय जागा" हा एका कवितेचा चरण त्यांनी लहानपणीं ऐकलेला होता. हा सबंध श्लोक येणेंप्रमाणे = भानूदयीं निदसुरा भट होय जागा। तो बावळा असुनि न्याय करी बजागा। पीतांबरासमहि त्या फडक्यास मान। मी राजहंस फुटक्या कवडीसमान ॥'

करप्रत्ययान्त नांवें बहुधा गांवांवरून पडलीं आहेत. उदा.

| नांव | गांव | तालुका |
|---|---|---|
| आघारकर | आघारी | दापोली |
| करंदीकर | करंदें | ,, |
| कानिटकर | कानिट | चिपळूण |

(श्री. गणेश पांडुरंग कानिटकर शिक्षक सांगली राहणार मिरज हे कानिट गांव गुहागरच्या दक्षिणेस होता असें लिहितात, परंतु सरकारी पोष्ट खात्याच्या ग्रामावलींत कानिट गांव दिलेला नाही.)

| | | |
|---|---|---|
| केतकर | केतकी | चिपळूण |
| कोल्हटकर | कोळथरें | दापोली |
| केळकर | केळें | रत्नागिरी |
| गोंधळेकर | गोंधळें | चिपळूण |
| चापेकर | चापें | रत्नागिरी |
| चिपळूणकर | चिपळूण | चिपळूण |
| चोळकर | चोळी | दापोली |
| जोगळेकर | जोगळें | दापोली |
| दांडेकर | दांडे | |

| | | |
|---|---|---|
| धामणगांव | धामणदेवी | खेड |
| पाटणकर | पाटण | |
| बिवलकर | बिवली | चिपळूण |
| घांगरेकर | गांगरई=गांगरें=घांगरें | |
| वेलणकर | वेळणेश्वर | चिपळूण |

अभ्यंकर हा संस्कृत शब्द असावा अभयंकरः=अभ्यंकर=अभय-निर्भय करणारा तो अभ्यंकर. अभ्यंगकर=अभ्यंकर ही व्युत्पत्तिहि संभवनीय आहे. देवाला अभ्यंगस्नान घालणारे ते अभ्यंगकर. घनवटकर हें नांव धंद्यावरून पडलें असण्याचा संभव आहे. गहाणवट = घनवट—गहाणाचा व्यापार करणारा तो घनवटकर. तथापि घनवट हें गांवाचेंहि नांव आहे (सातारा जिल्हा). करमरकर नांव करमर गांवावरून पडलें असल्यास करमरें गांव महाड तालुक्यांत म्हणजे कुलाबा जिल्ह्यांत असल्यामुळे तें बरेंच पाठीमागून तिवेकर, वगैरे नांवांप्रमाणेच संपादन केलेलें दिसतें. आसूदजवळ कोंडखाड-विल नांवाचें गांवठण आहे त्यावरून खाडविलकर = खाडिलकर हें नांव आलें असावें.

आगलावे, गोडबोले, गोरे, काळे, मोडक, लागू, मनोहर वगैरे नांवें गुणावगुणदर्शक आहेत. आमच्याकडे पूर्वी अन्नसत्र असे म्हणून आम्हांस छत्रे म्हणूं लागले असें श्री. प. गं. छत्रे कळवितात. ही व्युत्पत्ति संभवनीय आहे. परंतु छत्रे आडनांव कोंकणांत असतांनाच पडलें आहे, असें दिसतें. कारण कोळथऱ्यास छत्र्यांचा पिंपळ अशा नांवाने एक पिंपळ ओळखिला जातो. माध्यंदिनांत चामरे हें आडनांव आहे. त्यावरून देवावर छत्र धर-णारा तो छत्रे होण्याचा संभव अधिक दिसतो. ह्याला अनुसरूनच विंझे उपनांव पडलें. विंझा म्हणजे पंखा.

पुराण सांगण्याच्या धंद्यावरून वैशंपायन आडनांव पडणें शक्य आहे.

ऋषींवरून पडलेलीं उपनांवें थोडीं आहेत असें आम्हांस वाटतें. गोखले हें नांव गोखुल ऋषीवरून पडलें असावें "मुद्गलो गोखुलो वात्स्यः शरीरः शशिरस्तथा। पञ्चैते शाकलाः शिष्याः शाखाभेदप्रवर्तकाः"[1] दुसरा असाच एक श्लोक आहे तो असा—"मुद्गलो गोखलुश्चैव वात्स्यः शालीय एव च। शैशिरः पञ्चमश्चासीन्मैत्रेयः सुमहामतिः॥"[2] एका श्लोकांत गोखुल आहे तर दुसऱ्यांत गोखलु आहे. गोकुलशब्दावरून गोकला = गोखला होण्याचा संभव आहे. पुष्कळ गाई बाळगणारे असा त्याचा अर्थ होऊं शकेल.

आश्वल ह्या शब्दाने आचवल नांव बनविणें अशक्य नाही. अश्वल, आश्वल हीं प्राचीन नांवें असल्याचें प्राचीन चरित्रकोशावरून दिसतें. ऋषींचीं नांवें असंख्य असणार. त्यांत कोणतेंहि नांव सापडणें अशक्य नाही. सोमनिः हें एका ऋषीचें नांव श्री. चेन्त्सलरावांनी आपल्या गोत्र-प्रवर निबंधकदम्बामध्ये दिलें आहे.[3] ह्या सोमनिवरून सोमण आडनांव पडलें असें म्हणतां येईल. तथापि सोमनिः याचा अपभ्रंश सोवनी होणार नाही असें तरी कसें म्हणतां येईल? परंतु साठ आडनांवांत सोवनी आडनांव नाही हेंहि विसरून चालणार नाही. इ. स. १६१५ च्या लेखांत सोमण आडनांव आढळतें. सुमनायनाः म्हणून एक ऋषिगण होता त्याच्याशीं सोमणांचा संबंध कदाचित् लावतां येईल. पारायणजपे हें नांव शक १६२७ च्या एका लेखांत आलें आहे. परांजप्यांचें हें पूर्वीचें विशेषण. पारायणजपे याचाच अपभ्रंश परांजपे असा तर्क आहे आणि तो सयुक्तिक नाही असें नाही.[4] गार्गीय=गाडगीळ अशा व्युत्पत्तीने गाड-

१ वर्गद्वयवृत्ति.

२ जर्नल ऑफ वेदिक स्टडिज व्हॉ. २ नं. २ पान १९९ टीप ३.

३ पान १६१.

४ परांजपे घराण्याचा इतिहास पान १४.

गिळांची प्राचीन परंपरा सिद्ध करतां येईल. जोशी ह्या उपनांवाबद्दल लिहिण्याचें कारणच नाही. गांबारायण ह्या नांवाच्या गोत्रऋषीवरून गांबारे उपनांव व्युत्पादितां येतें.

बाकीचीं वरीलचशीं आडनांवें गांवावरून अथवा कोंकणांतील वतनवाडीच्या ठिकाणावरून पडलीं असावीं असा आमचा तर्क आहे. गांवाचें नांव तेंच आडनांव ही कानडी मुलखांतली परंपरा कोंकणांतहि असल्याचें अनुभवास येतें. उदा. चक्रदेव ह्या नांवाचा गांव रत्नागिरी तालुक्यांत आहे. तेंच एका घराण्याचें आडनांव झालें. एकारान्त आडनांवें बहुधा वाडा, ठिकाण, गांव ह्यांवरून पडलीं असें आम्हांस वाटतें; उदा. घारपुरी (कोतवड्यानजीक) = घारपुरे, परचुरी = परचुरे, राजवाडी = राजवाडे, धामल= दामले. परचुरी गांव असून धामल व राजवाडी हे वाडे आहेत. वाडा म्हणजे मुख्य गांवाचा पोटभाग. आपटी नांवाचा गांव ठाणें, कुलाबा, पुणें, सातारा, अहमदनगर इत्यादि जिल्ह्यांत आहे त्याप्रमाणें तो रत्नागिरी जिल्ह्यांत दापोली तालुक्यांत सुद्धा आहे. त्यावरून आपटे नांव पडणें स्वाभाविक आहे. कित्येक ठिकाणीं आपुटा असेंहि लिहिलेलें आढळतें. देवगड तालुक्यांत फणसगांव आहे. फणसे ह्या आडनांवाचा उगम त्यांतूनच झाला असावा. किंवा फणशीचे ते फणसे; अथवा फणसाचा धंदा करणारे किंवा फणसाचे मालक ते फणसे. उखीर जमीन किंवा नदीकिनाऱ्याजवळची सुपीक जमीन हिला भाटी म्हणतात. भाटीचे मालक ते भाटे. "कोंकणामध्ये समुद्रकांठीं ओहोटी येऊन किंवा समुद्र हटल्यामुळे जी जमीन तयार होते तिला भाटजमीन म्हणतात. त्याची मालकी आमचेकडे असल्यामुळे आमचें उपनांव भाटे असें पडलें" असें ग्वाल्हेरचे भा. दि. भाटे लिहितात. ठिकाण डोंगर हें शेताचें नांव. डोंगर ठिकाण ज्याच्या मालकीचें ते डोंगरे. तसेंच गोवंडे हें आडनांव गोवंडपासून बनविलें असावें. गोवंड

म्हणजे गोठण = गुरांची बसण्याची जागा. अशा जागेचे धनी ते गोवंडे. अशा रीतीने बनलेल्या शब्दांचें एकवचन होत नसावें. फणसा, भाटा असा एकवचनी प्रयोग आढळण्यांत नाही. परंतु लिमया, दाबका, कुंटा, पेंडसा, खांबेटा अशा एकवचनी रूपांत कांही आडनांवें आढळतात. ह्यावरून गोगटे, लेले, नेने, दाबके, कुंटे, चितळे, आठवेले, गद्रे, भावे, बेहरे हे एकारान्ती अनेकवचनी शब्द साधित नाहीत असें दिसतें. गांवांवरून नांवें बनतात त्याप्रमाणें आडनांवावरून गांवाला अगर ठिकाणाला नांवें दिलेलीं आहेत; उ. साठेवाडी, भावे अडोम वगैरे. बाकी भावे हें जंजिरा संस्थानांत एक गांव आहेच. पुष्कळ जुन्या शब्दांचे अर्थ आता समजत नाहीसे झाले आहेत त्यामुळे कोंकणस्थांचीं आडनांवें अर्थहीन वाटतात. परंतु पूर्वी त्यांना अर्थ असला पाहिजे हें उघड आहे. ७०० वर्षांच्या पूर्वीच्या लेखांत आडनांवें आलेलीं आहेत. आज शिवकालीन भाषाहि अगम्य होऊन बसली आहे. बेहरखेडें, बेहेरगांव ह्या नांवांचीं खेडीं खानदेशांत व निजामसंस्थानांत आहेत. ह्यावरून बेहेर ह्या शब्दाला कांहीतरी अर्थ असला पाहिजे. कदाचित् ह्या नांवाचें झाड असावें. बेहर ह्या शब्दाशीं बेहऱ्यांचा संबंध कदाचित् असूं शकेल. चिपळूण व देवगड तालुक्यांत बहिरवगड नांवाचे दोन किल्ले आहेत. श.१५७२ च्या एका कागदांत महादेव भट भेरा असें नांव आढळलें. रानडे, घांगुरडे व किडमिडे हीं तीन नांवें डेकारान्त आहेत. वडारी लोकांच्या भाषेंत नांवा-पुढे ड असतो; उ. तिम्मा = तिम्याड, तसें रान + ड = रानाड = रानडा असें होईल काय ! अथवा वाटाड्या ह्यासारखाच रानड्या शब्द बनला नसेल कशावरून ! घांगुर + डे = घांगुरडे असें म्हणतां येईल; परंतु किड-मिडे हा सिद्ध शब्द असावा. किडमिड म्हणजे अस्पष्ट (ध्वनि) असा अर्थ कोशकार देतात. अस्पष्ट बोलणारा तो किडमिडा असें म्हणतां आल्यास

म्हणावें. कुंटे उपनांवाचें मूळ संस्कृत कुंठ ह्या शब्दांत असल्यास आळशी, मूर्ख अशा अर्थानें कुंठे = कुंटे नांव सिद्ध झालें असावें. श्राद्धाला वर्ज ब्राह्मण सांगितले आहेत ते येणेप्रमाणेः—

काणाः कुण्ठाश्च मण्ठाश्च मूकान्धबधिरा जडाः । कुनखा कुष्ठिनश्चैव दुर्नम्रा विद्धमेहनाः ॥ अतिदीर्घा अतिऱ्हस्वा अतिस्थूला भृशं कृशाः । निर्लोमा नातिलोमानो गौराः कृष्णा अतीव ये ॥[1]

ह्यांत काणे, कुंठे, गोरे, काळे हे पितृकर्माला अयोग्य समजल्याकारणाने त्यांचीं नांवें रूढ झालीं. जमिनीचा म्हणजे काळीचा वसूल करणारा अधिकारी तो काळे अशी व्युत्पत्ति कित्येकांकडून दिली जाते; पण मग गोरे या आडनांवाचा खुलासा कसा करावयाचा ?

चितळे हे चित्तल ह्या आडनांवांत इ. स. १५५० च्या सुमारास आढळतात. ह्या नांवाचा इसम काशी येथे त्या शतकांत होता[2] ! चितळी नांवाचें गांव पूर्वी चिपळूण तालुक्यांत असावें. ह्या नांवाचीं गांवें नगर व सातारा जिल्ह्यांत आहेत. सुरत जिल्ह्यांत चिखली तालुक्यांत चिताळी गांव आहे. रत्नागिरी जिल्ह्यांत चितळी गांव पूर्वी कधी नसल्यास सुरतेच्या बाजूनें हें घराणें आलें कीं काय ह्याची अधिक चौकशी झाली पाहिजे. चितळ्यांतून चिपळूणकर, चोळकर, जोगळेकर, चापेकर इतकीं आडनांवें निघालीं असें ह्या कुटुंबांतील जुन्या माणसांच्या सांगण्यांत येतें. समान गोत्रावरून हा तर्क करण्यांत येत असावा.

चितळदुर्ग नांवाचा प्रांत म्हैसूर संस्थानांत आहे. तेव्हा चितळ ह्या शब्दाला कांहींतरी अर्थ असला पाहिजे.[3]

---

१ श्राद्धमयूख. २ काणे पां. वा. तोंडी माहिती.

३ चितळी = चित्रमृगासारखा प्राणी. (शब्दकोश)

बापट ह्या नांवाचा बप्पट ह्या रूपांत ताम्रपटांत उल्लेख येतो. हा शब्द व्युत्पादिणें सध्या तरी अशक्य दिसतें.[1]

"आमचें मूळ आडनांव जोशी होतें; पण आमच्यापैकी एक तिमाजी-पंत म्हणून शाहूमहाराजांच्या पदरीं राजेरजवाड्यांच्या सनदा वगैरे देण्याच्या कामावर होते. तिमाजीपंतांचा वृद्धापकाळ झाल्यावर ते सेवा-निवृत्त झाले ( बदली मुलगा होता ). म्हणून तिमाजीपंतांची आदर्शभूत कामगिरी लक्ष्यांत घेऊन त्यांना राजवाडे म्हणून किताब वंशपरंपरेने चाल-णारा दिला. म्हणून पुढील सर्व वंशज आम्ही राजवाडे झालों असा उल्लेख कै. सर दिनकरराव राजवाडे यांच्या चरित्रांत मला आढळण्यांत आला आहे." ( नरहर बगाराम राजवाडे– रत्नागिरी ) ह्याला आधार कांही दिसत नाही.

भाताचा खंड घेणारे ते भातखंडे झाले. शरिरावर देव धारण करणारे देवधर म्हणवून घेऊं लागले असावे. गणपति किंवा देवी आपल्या बाहूवर सतत देव धारण करणारे लोक पुष्कळांच्या पाहण्यांत असतील. माध्यं-दिनांतहि देवधर हें आडनांव आहे.

माटे = माटा हा शब्द मण्ठ शब्दावरून निघाला असेल. मण्ठ म्हणजे वक्रजंघ = ज्याची मांडी वाकडी आहे तो. घण्टा = घांट त्याप्रमाणे मण्ठ = मांठ = माठ = माट = माटा. असा मनुष्य श्राद्धाला वर्ज अस-ल्याचें मागें सांगितलेंच आहे. माटकुला म्हणजे लहान असा अर्थ मोल्स-वर्थ देतो. भातकुली शब्द भातावरून बनला तसा माटकुला शब्द माट-वरून बनला आहे. माट म्हणजे लहानपण. माटा म्हणजे लहानगा असाहि अर्थ करतां येईल.

---

१ बापट=बापभट=बाभट=बापट असें असेल काय ?

तसेंच, हुंबा म्हणजे उद्धट यावरून हुंबे आडनांव पडलें. हुंबे हे मूळचे आपेट.

रा. राजवाडे ह्यांच्या मतें साष्टिक ह्या शब्दापासून साठिआ = साठिए= साठिये=साठये अशा मार्गानें साठये उपनांव बनलें; आणि म्हणून साष्टीचे ते साठये असें म्हणणें भाग आहे. म्हणजे साष्टींत चित्पावनांची वस्ती होती व तो प्रदेश चित्पावनांच्या मूळ वसाहतींत मोडत असावा. हें व्युत्पत्तिदृष्ट्या कदाचित् बरोबर असेल; परंतु त्याला इतिहासाचें भरपूर पाठबळ मिळणें अवश्य आहे. साठे आणि साठये किंवा साठये ह्यांचें गोत्र एकच आहे. दोनहि आडनांवांत फरक नसावा असें वाटतें. पूर्वी यकारान्त नांवें लिहिण्याची पद्धति होती. उदा. रानड्ये, भाव्ये, पर्वत्ये इ.

वसईचे केतकर म्हणतात 'आमचें आडनांव सुतार होतें. तें आमच्या पणजोबांच्या कर्तबगारीवर मिळालें. शिल्पशास्त्रांत अत्यंत निपुण असल्यानें सरकारी जहाज बुडत असतां आपल्या हुशारीनें तें बुडूं दिलें नाही. त्याबद्दल पूर्वी जमीन इनाम होती, पण आता फक्त ६ रु. दरसाल मिळतात.' ह्या दंतकथेंत शिल्पशास्त्रनैपुण्याचा आणि जहाज बुडूं न देण्याचा कार्यकारणभाव समजण्यासारखा नाही; तथापि गलबतें बांधण्याच्या कौशल्यावरून सुतार नांव पडण्याचा संभव आहे एवढी गोष्ट खरी. व्यवसायावरून हीं आडनांवें पडलेलीं आहेत.

"पूर्वी यज्ञ होत असत त्या वेळीं उकिडवें बसून कांही मंत्र म्हणावयाचे असत. तें काम आमच्या पूर्वजांकडे असे तेव्हापासून उकिडवे नांव पडलें अशी दंतकथा आहे."[1] (माधव रामचंद्र उकिडवे—मुंबई)

---

१ न्यायरत्न लक्ष्मणशास्त्री जोशी कळवितात :— आग्नीध्र हा ऋत्विज 'अस्तु श्रौषट्' हा मन्त्र उकीडवा बसून म्हणतो, तसेंच इष्टींत पत्नीसंयाज करतांना उकीडवें बसून म्हणजे ऊर्ध्वज्ञु होऊन मन्त्र म्हणतात.

"तासगांवनजीकचे पलुस गांवीं अजगांवचे गाडगीळ पूर्वी आले; तेथून पुढे ते कुरुंदवाडास आले तेव्हापासून त्यांना पलुसकर म्हणूं लागले." (गणेश महादेव गाडगीळ— मिरज)

डॉ. केतकर यांच्या मताप्रमाणे खंगले, जोशी, पाऊलबुद्धे, पिटकर, भट, भुसकुटे, राजमाचीकर, वझे हीं नांवें गाडगीळ व केतकर यांतून निघालीं आहेत. ह्या सर्व आडनांवांचे लोक गार्ग्यगोत्री आश्वलायन आहेत. गाडगिळांतून एकंदर उपनांवें निघालीं तीं :– भुस्कुटे, वैद्य, केतकर, भट, पेशवे, वझे व सुतार. वझ्यांचें आडनांव पूर्वी गाडगीळ होतें असें एका वझ्यांनी डॉ. केतकर यांस कळविलें आहे. वझे, भट व जोशी हीं ब्राह्मणांच्या कर्माचीं निदर्शक नांवें होत; वैद्य व सुतार हीं व्यवसायद्योतक आहेत. पेशवे आडनांव हुद्दा दाखवितें. केतकर हें गांवावरून पडलें आहे. "कोणातरी एका गाडगीळ सरदाराने शत्रूचें भुस्कूट केलें म्हणून त्याला शाहूमहाराजांनी भुस्कुटे म्हणण्यास प्रारंभ केला. त्यावरून हें नांव पडलें असें एक मध्यप्रांतीय भुस्कुटे पदवीधर सांगतात."[1]

वाडाबुर्वे हें एका ठिकाणाचें किंवा जागेचें नांव आहे.[2] तेथील बर्वे· ह्या वाडाबुर्वे शब्दांतूनच वाड आणि बर्वे हीं आडनांवें निर्माण झालीं असल्याचा संभव आहे.

कुध्र्यांला वाडा फडके म्हणून ठिकाणाचें नांव लागलेलें जुन्या कागदांत आढळतें. भाटलें गोखले, भाटलें पटवर्धन, भाटलें लिमये, भाटलें गाडगीळ ह्या नांवाच्या जमिनी गोवा प्रांतांतील मांद्रेगांवीं कागदोपत्रीं दाखल असलेल्या आढळतात. त्या त्या लोकांच्या मालकीच्या ह्या जमिनी

---

१ विद्यासेवक वर्ष ६ अंक ४ पान ५०.

२ बर्वे घराण्याचा इतिहास.

(भाटलें) असल्या पाहिजेत. ह्यावरून जमिनीला मालकाचें नांव लागलें असें दिसतें.

धुळ्याचे दत्तात्रेय त्रिंबक देव कळवितात की, आमचे एक पूर्वज कोंकणांतून टोकें ( नगर जिल्हा ) येथे आले. तेथे त्यांनी तपश्चर्या करून देव उपनाम संपादिलें.

भागवत हें उपनांव कोंकणस्थांत आहे. त्याची उपपत्ति अकोल्याचे माधव दत्तात्रेय भागवत येणेंप्रमाणे देतात—पूर्वी आमचें आडनांव कुंटे होतें असा उल्लेख आहे. पेशव्यांच्या वेळेस आमचे पणजे वैजनाथ भट यांना ( पेशव्यांनी ! ) मामा मानलें होतें आणि आमच्या घराण्यांतील भागवतपठणामुळें ते आम्हांस भागवत म्हणूं लागले असा उल्लेख आहे.

आगाशे उपनांव आकाशे ह्या रूपांत कित्येक जुन्या कागदपत्रांत लिहिलेलें आम्हीं पाहिलें आहे. आगासीया असेंहि नांव आढळतें. आकाशी हें एका ग्रामदेवतेचें नांव आहे. ग्रामदेवता प्रकरणांत हें नांव आढळेल. तेव्हा आकाशी देवीवरून आकाशे–आगाशे नांव पडलें असावें. आगाशांतून फाटक फुटून बाहेर पडलेले दिसतात. आगाशे व फाटक कौशिकगोत्री आहेत.

पळध्ये, चांगुले व भारद्वाजगोत्री ठोसर हीं उपनांवें पंचांगांत दिलेलीं नाहीत.

बागूलबोवा ह्या शब्दांतील बागूल शब्दाशींच चित्पावनांतील बागूल आडनांवाचा संबंध जोडल्यावांचून गत्यंतर दिसत नाही. अथवा बागलणला बागूल नांवाचे राजे होते त्यांचे आश्रित असल्यास बागूल नांव पडण्याचा संभव आहे.

सहामल्ल शब्दापासून सामल उपनांव बनलें. वाळ आडनांवाच्या एका

कुटुंबांत सहा मल्ल होते आणि तेव्हापासून त्या कुटुंबाला सामल असें लोक म्हणूं लागले अशी दंतकथा आहे.

"आमचें उपनांव मनोहर केव्हां झालें हें माहीत नाहीं. परंतु पूर्वी रानडे होतें अशी दंतकथा आहे. परंतु रत्नागिरी जिल्ह्यांत एक मनोहर टेकडी म्हणून स्थळ आहे[1] त्याच्याशीं कांहीं संबंध आहे किं काय नकळे."

(कृष्णाजी हरि मनोहर, बडोदें)

"पूर्वीचें उपनांव खाडिलकर. आजोबांच्या वेळीं ( सन १८८० ) दस्तऐवजासारख्या महत्त्वाच्या कागदांतून खाडिलकर वर्तक असें उपनांव लावीत असत. अंजर्ले गांवीं महाजन आणि वर्तक असे दोन मानकरी असून त्यांचेकडे खोती असे; त्यावरून वर्तक हें उपनांव चालू झालें."

(पु. ना. वर्तक, धुळें)

बाल्याः, गोलेयः, दिविः, रण्डकथः ह्या ऋषींच्या नांवावरून बाळ, गोळे, देव, रानडे आडनांवें निघालीं असें म्हणावें तर शाखाभेद आड येतात; उदा. गोळे भारद्वाजगोत्री आहेत आणि गोलेय ऋषि अत्रिगणापैकी आहे.[2] तेव्हा बाळ, गोळे वगैरे टोपणनांवें असावीं.

योग पासून जोग होणें अगदी शक्य. किंबहुना दोनहि शब्द एकच, पण नुसत्या जोग शब्दाला कांही अर्थ नाही (आडनांवांत). जोगी असते तर योगीचा जोगी झाला असें म्हणतां आलें असतें. जुग गांवापासून जोग बनण्यास हरकत नाही. जुग गांवचे ते जोग. परंतु जुग गांव रत्नागिरी जिल्ह्यांत असलेला आढळत नाही. कारवार जिल्ह्यांत जुग गांव आहे. अथवा धंद्यावरून शहाजोग शब्दांतला शहा जाऊन जोग शिल्लक राहिला

१ मनोहर किल्ला सांवतवाडीच्या ईशान्येस १४ मैलांवर आहे. ( रत्नागिरी गॅझेटिअर )

२ चेन्तसलराव १६७.

असावा. जोग आडनांव पहिल्या साठांपैकी आहे.

रच्या ऐवजीं ल म्हणणारांना लेले म्हणून नांवें लोकांनी ठेविलीं असावीत. त्याचप्रमाणे नेने—नाही नाही—म्हणणारे नेने झाले असावेत. लेले व नेने ह्यांचें मूळ रूप लल्ल व नन्न असें होतें. लकार व नकार ज्यांच्या उच्चारांत फार होतात ते लल्ल व नन्न ही व्युत्पत्ति कित्येकदा सुचविली जाते.

"आमचें अभ्यंकर आडनांव हें मुख्य. पण आमचे पूर्वज हे दोघे बंधु उगें गांवीं गोमान्तकांत फार शक्तिवान होते. त्यांची महाराष्ट्र, कर्णाटक, उ. हिंदुस्थान यांकडे ख्याति होती. त्यामुळे अजिंक्यपत्र घेत एक मथुरेचा चोबा सर्व प्रांत काबीज करीत उग्यास गेला. येथे बलाढ्य अभ्यंकर कोण आहेत असें विचारिलें. तेव्हा त्या बंधूंनी आम्हीच असें सांगितलें. तेव्हा एक-मेकांचे प्रयोग सुरू झाले. तेव्हा अभ्यंकर यांनी पहार घेऊन चोब्याचे गळ्यांत ८ असा वेढा घालून गळ्यांत पहार अडकविली. व ही गांठ सोडून आमचे गळ्यांत घाल असें म्हटलें. तेव्हा चोबा थकून शरण आला व त्याने मी सर्व देश हिंडलों पण तुम्हांसारखा बलाढ्य, शक्तिवान कोणी मिळाला नाही सबब तुम्हांस मी अजिंक्यपत्र देतों व आजपासोन तुमचें आडनांव महाबळ असें जाहीर करतों व तुम्हीहि करा. अशी दंतकथा आहे व आमचे घराण्यांत ३०।३२ वर्षांखालीपर्यंत असे उत्तम शक्तीचे, कुस्त्यांत उत्तम, पोहण्यांत पटाईत, शेतकींत त्यांचे भारे उचलून नेणारा क्वचितच असे होते."

माणसाच्या नांवांवरून आडनांवें पडल्याचीं उदाहरणें हल्लीच्या काळांत आढळतात. जगन्नाथ शंकर शेट, वासुदेव हीं आडनांवें सुप्रसिद्ध आहेत. पूर्वीहि हा प्रकार झालेला पाहावयास मिळतो. जोगदेव हें सध्याचें आड-नांव जुन्या कागदांत व्यक्तीचें नांव आढळतें. पुरुषांचीं कांही नांवें जुन्या लेखांतून आढळतात तीं अभ्यसनीय आहेत. उदा. कानभट बीन संभाभट,

कुषेपंत, तानमाजनी गोगटे, नारमाजनी गोगटे, म्हावा बाजी बरवे, बाबदेव भट, सोमभट रानडे, पोमदेव भट काळे, नरसो मामदेव, मादो भास्कर, त्रिंबक रावजी गोगटे, मुळ्ये खोत (मूळचे खोत), मादे जोशी, बाळंभट परांजपे शेवड्ये वगैरे. ह्या यादींत पोमदेव भट, बाबदेव भट, हीं नांवें आहेत. ह्यांतूनच देव आडनांव निघण्याचा संभव आहे. जुगादेव हें एका देवाचें नांव. जुगादेवाचा तो जोगदेव. देवाच्या नांवावरून मनुष्याचें नांव प्रथम पडून नंतर तेंच कुलनांव बनलें असें दिसतें. जुगादेव गांवखडींत आहे. साडमानी हेंहि व्यक्तिनाम असावें. बायकांच्या नांवांचे उल्लेखहि गमतीदार आढळतात. उ. हरिपंत आपट्याची बायको ती हरिपंतीण आपटी.

भानू म्हणजे सूर्य. हें मूळ व्यक्तीचें नांव असून नंतर कुलनाम झालें असावें. यजुर्वेदी माध्यंदिन शाखेच्या लोकांत भानू व भास्कर हीं उपनांवें आढळतात.

प्रो. सदाशिव वामन जोशी ह्यांच्या माहितीप्रमाणे त्यांचे पूर्वज सखंभट नांवाचे होते. त्यांच्यावरून सखदेव हें उपनांव त्यांस प्राप्त झालें. सखदेव—काळे—जोशी अशीं तीन उपनांवें निरनिराळ्या काळांत ह्या कुटुंबास मिळालीं.

काल्र्यांच्या लढाईत आमचा पणजा लढून मेला तेव्हापासून आम्हांस कालेकर म्हणूं लागले असें कल्याणचे लक्ष्मण मोरेश्वर कालेकर कळवितात. त्यांच्या पणजीला पेनशन होतें असें ते म्हणतात.

चिपळूणकर ह्यांचें पहिलें आडनांव चितळे असें होतें असें बाळकृष्ण महिपत चिपळूणकर दीक्षित शास्त्री, राहणार सातारा, हे कळवितात. छत्रपति शाहू महाराज ह्यांची त्यांच्या पूर्वजांना दिलेली एक सनद आहे तींत मजकूर आहे तो असाः—

वीरेश्वर यादव दीक्षित चितळे राहणार नेवरें रत्नागिरी हल्ली ४० वर्षे वसती चिपळूण म्हणून चिपळूणकर ह्यांस अग्निहोत्राकरतां व कुटुंबाचे संरक्षणाकरतां इनाम......वगैरे.

दुसरी एक सनद नानासाहेब पेशव्यांकडून ह्या घराण्याला आहे ती जगन्नाथ यादव दीक्षित चितळे चिपळूणकर ह्या नांवाने आहे.

ह्यावरून चिपळूणकर व चितळे एकच असें म्हणावयास हरकत नाही.

आडनांवांच्या संबंधाने एक विचारांत घेण्यासारखी गोष्ट अशी आहे की, गांवांचीं नांवें व आडनांवें ह्यांत पुष्कळ वेळां तादात्म्य आढळून येतें. गांवावरून मनुष्याला म्हणजे कुलाला नांव प्राप्त होतें हें जितकें खरें तितकेंच कुलनामावरून गांवाला नांव पडतें हेंहि खरें आहे. त्याचप्रमाणे शेताच्या नांवानेच त्या शेताचा मालक ओळखूं लागला तर मालकाचें नांव शेताला लावण्यांत येऊं लागतें. उ. ठिकाण फाटक; ठिकाण सोमण; भावे आडोम, दांडे आडोम (रत्नागिरी तालुका).

तसेंच ठिकाण डोंगर ह्यावरून डोंगरे आडनांव. गोळप येथील गोखले पालीहून जाऊन आल्यावर त्यांस पालकर म्हणूं लागले[१]. त्याप्रमाणे कानडी मुलुखांत कांही काल राहून आलेल्यांना कानडे म्हणून संबोधण्यास लोकांनी सुरवात केली असावी.

आडनांवावरूनें जमिनीला नांव मिळतें त्याप्रमाणे गांवालाहि मिळणार नाही कशावरून ! नातू, कर्वे, गोळे ह्या नांवाचीं गांवें खेड दापोली व चिपळूण ह्या तालुक्यांत आहेत. चक्रदेव हें गांवाचें नांवहि एखाद्या माणसाच्या नांवावरून पडलें असण्याचा संभव आहे. एका गांवांत एका आडनांवाचे लोक बहुधा असतात. पाठीमागून दुसरीं घराणीं येतात. ज्याने गांव वसविला त्याचें नांव त्या गांवाला लागणें साहजिक आहे.

१ गो. घ. इतिहास पान ९२

चित्पावनांचीं नांवें टिळक पंचांगांत (श. १८६०) दिलीं आहेत तीं :—

१ अत्रि :— १ आठवले, २ चापेकर, ३ चितळे, ४ चिपळूणकर, ५ चोळकर, ६ जोगळेकर, ७ जोशी, ८ फडके, ९ भाटमोळे, १० भाडभोके, ११ मोने, १२ मोनदे, १३ वाडदेकर, १४ विंझे, १५ हसबनीस, १६ दाबक.

२ कपि :— १ करंदीकर, २ कापरेकर, ३ कामाठी, ४ काळे, ५ खांबेटे, ६ खाजगीवाले, ७ चक्रदेव, ८ जाईल, ९ जोगदेव, १० जोशी, ११ दलाल, १२ धारप, १३ नाईक, १४ बांठे, १५ भट, १६ भागवत, १७ भाटे, १८ मराठे, १९ माईल, २० मायदेव, २१ रटाटे, २२ राणे, २३ लिमये, २४ विध्वंस, २५ शेवडे, २६ साने.

३ काश्यप :— १ आचार्य, २ ओगले, ३ करमरकर, ४ कातरणे, ५ कान्हेरे, ६ कापशे, ७ किणकिणे, ८ खानविलकर, ९ खाडिलकर, १० गानू, ११ गोगटे, १२ गोखले, १३ छत्रे, १४ जामदार, १५ जोग, १६ जोशी, १७ ठोसर, १८ दातार, १९ दातीर, २० दामोदर, २१ दारशेतकर, २२ पणदेव, २३ पागे, २४ पालकर, २५ फाळके, २६ बडे, २७ बर्वे, २८ बिवलकर, २९ भट, ३० भानू, ३१ भेंडे, ३२ मारवलकर, ३३ मेढेकर, ३४ राणे, ३५ रास्ते, ३६ लवाटे, ३७ लेणे, ३८ लेले, ३९ वेलणकर, ४० वेहळेकर, ४१ व्यास, ४२ शिंत्रे, ४३ शिवणेकर, ४४ सुकाडकर, ४५ सुकुले, ४६ सुनाके.

४ कौंडिण्य :— १ आचार्य, २ आचारी, ३ कटके, ४ काकेतकर, ५ थत्ते, ६ पटवर्धन, ७ फणसे.

५ कौशिक :—१ अग्निहोत्री, २ आगाशे, ३ आचार्य, ४ आपटे, ५ कानिटकर, ६ कोल्हटकर, ७ खरे, ८ खुळे, ९ गद्रे, १० गोडबोले,

११ गोरे, १२ जोगदंड, १३ जोशी, १४ ढमढेरे, १५ तिरुके, १६ देवल, १७ देवधर, १८ पाळंदे, १९ पेठकर, २० फणसूकर, २१ फफे, २२ फाटक, २३ बर्वे, २४ बापये, २५ बाम, २६ बोरकर, २७ भागवत, २८ भासे, २९ लेलगे, ३० लोणकर, ३१ वर्तक, ३२ वाड, ३३ वेलणकर, ३४ शारंगपाणी, ३५ शिवडे, ३६ शेवडे, ३७ शेंडे, ३८ शौचे, ३९ सटकर, ४० सासते, ४१ स्वयंपाकी, ४२ हुंबे.

६ गार्ग्य :—१ आगिटकर, २ आघेटकर, ३ करवे, ४ केतकर, ५ खंगले, ६ खंजणे, ७ गाडगीळ, ८ गोरे, ९ घाणेकर, १० घेघोळ, ११ जोशी, १२ टोळे, १३ थोरात, १४ दाबके, १५ पाऊलबुद्धे, १६ पिटकर, १७ पोतदार, १८ बेडेकर, १९ भट, २० भागवत, २१ भुस्कुटे, २२ मरुकर, २३ माटे, २४ मायदेव, २५ म्हसकर, २६ राजमाचीकर, २७ लोंढे, २८ वझे, २९ वाकळकर, ३० वाळसे, ३१ वैद्य, ३२ सुतारे.

७ जामदग्न्य :—१ अग्निहोत्री, २ कुंटे, ३ पेंडसे, ४ भागवत.

८ नित्युंदन :—१ आगलावे, २ पिंपळखरे, ३ भिडे, ४ रसाळ, ५ वैशंपायन, ६ सहस्रबुद्धे, ७ साडमानी.

९ बाभ्रव्य :—१ बाळ, २ बेहरे.

१० भारद्वाज :— १ आखवे, २ आचवल, ३ कण्याचे, ४ गागल, ५ गांधारे, ६ गोळे, ७ घांगुर्डे, ८ घैसास, ९ चोळकर, १० जोशी, ११ टेणे, १२ दर्वे, १३ नेकणे, १४ बेलेकर, १५ मनोहर, १६ रहाळकर, १७ रानडे, १८ लागू, १९ वैद्य, २० सोहनी.

११ वत्स:—१ उकीडवे, २ काकतकर, ३ काळे, ४ गांगल, ५ गागलेकर, ६ गारगेकर, ७ गोरे, ८ गोवित्रीकर, ९ घांगरेकर, १० घाटे, ११ जोशी, १२ दाभोळकर, १३ नेवरे, १४ भैरव, १५ मायले,

१६ मालसे, १७ शिवडे, १८ सुगवेकर, १९ सोहनी, २० हिरे, २१ हेर, २२ होळे.

१२ वासिष्ठः— १ अभ्यंकर, २ आगरकर, ३ ओक, ४ ओंकार, ५ करंजे, ६ कार्लेकर, ७ काशीकर, ८ काळे, ९ कुटुंबे, १० कोन्हे, ११ कोकणे, १२ कोपरकर, १३ गांगल, १४ गानू, १५ गोकटे, १६ गोगटे, १७ गोडसे, १८ गोंधळेकर, १९ गोवंडे, २० घारपुरे, २१ घारे, २२ तिरडे, २३ दांडेकर, २४ दातार, २५ दाते, २६ दिवेकर, २७ दोणेकर, २८ धारू, २९ नगरकर, ३० नातू, ३१ पर्वते, ३२ पाथेकर, ३३ पेठे, ३४ पोंक्षे, ३५ बागुल, ३६ बापट, ३७ बोडस, ३८ भट, ३९ भवाने, ४० भस्मे, ४१ भातखंडे, ४२ भाभे, ४३ मधुमते, ४४ महाबळ, ४५ मोडक, ४६ राणे, ४७ रेशमेकर, ४८ लंगोटे, ४९ वर्तक, ५० वाटवे, ५१ विंझे, ५२ विनोद, ५३ वेलवडकर, ५४ वैद्य, ५५ शारंगपाणी, ५६ शेवडे, ५७ श्रीखंडे, ५८ साठे, ५९ साठये, ६० सावरकर, ६१ हरबुडे.

१३ विष्णुवृद्धः— १ ओळकर, २ किडमिडे, ३ किणकिणे, ४ देव, ५ नेने, ६ परांजपे, ७ बाकळकर, ८ मंडलिक, ९ मेहेंदळे.

१४ शांडिल्यः— १ आंबेकर, २ आमडेकर, ३ उपाध्ये, ४ करवीर, ५ करवे, ६ काणे, ७ कानडे, ८ काळे, ९ कुटुंबळे, १० केळकर, ११ कोंझरेकर, १२ गणपुले, १३ गांगल, १४ गानू, १५ गोडसे, १६ गोरे, १७ घनवटकर, १८ चुळे, १९ जोशी, २० टकले, २१ टिळक, २२ डोंगरे, २३ ताम्हनकर, २४ तिवेकर, २५ तुळपुळे, २६ थत्ते, २७ दातार, २८ दामले, २९ दुगुल, ३० देशमूख, ३१ धामणकर, ३२ नरवणे, ३३ नामजोशी, ३४ नित्सुरे, ३५ पद्ये, ३६ परचुरे, ३७ पळणिटकर, ३८ पांगुळ, ३९, पाटणकर, ४० पावगी, ४१ पावशे,

४२ बेहरे, ४३ बेंद्रे, ४४ भागणे, ४५ भाटे, ४६ भोगले, ४७ मटंगे, ४८ मध्ये, ४९ मन्ये, ५० माईल, ५१ माटे, ५२ राजवाडे, ५३ रिस-बुड, ५४ लचई, ५५ लावेकर, ५६ विध्वंस, ५७ व्यास, ५८ शिंगटे, ५९ शिंत्रे, ६० शिधये, ६१ शिधोरे, ६२ शेंडे, ६३ शेरकर, ६४ शेलगे, ६५ सहस्रबुद्धे, ६६ सोमण.

वरील आडनांवें एकंदर ३६० आहेत. ह्यांत शांडिल्य, वासिष्ठ, काश्यप आणि कौशिक मिळून २१५ आडनांवें भरतात. बाकी राहिलेल्या १० गोत्रांचीं आडनांवें १४५ भरतात. गोत्रवार नांवें दिलीं असल्याकारणाने कांहीं नांवें पुनः पुनः आलेलीं आहेत. अशीं नांवें वगळलीं तर ३०४ नांवें भरतील.

सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे बाभ्रव्य गोत्राचीं दोनच आडनांवें आहेत. हें बाभ्रव्य गोत्र कोठून आलें तें समजत नाही. ह्या गोत्राचा नामनिर्देश आम्हांला अन्यत्र आढळला नाही. बाभ्रव्याप्रमाणे जामदग्न्य गोत्राचींहि अग्निहोत्री व भागवत हीं आगंतुक नांवें वगळलीं तर कुंटे आणि पेंडसे ह्या दोन कुटुंबांखेरीज दुसऱ्या आडनांवांचीं कुटुंबें नाहीत. मात्र जामदग्न्य गोत्र इतर पुष्कळ ब्राह्मणांत आहे.

ह्यांत एकाहून अधिक गोत्रें असलेलीं आडनांवें येणेंप्रमाणे—

१ अग्निहोत्री, २ आचार्य, ३ करवे, ४ काळे, ५ किणकिणे, ६ गांगल, ७ गानू, ८ गोगटे, ९ गोडसे, १० गोरे, ११ चोळकर, १२ जोशी, १३ थत्ते, १४ दातार, १५ बेहरे, १६ भट, १७ भागवत, १८ भाटे, १९ माईल, २० माटे, २१ मायदेव, २२ राणे, २३ वर्तक, २४ विंझे, २५ विध्वंस, २६ वेलणकर, २७ वैद्य, २८ व्यास, २९ शारंगपाणी, ३० शिंत्रे, ३१ शिवडे, ३२ शेवडे, ३३ शेंडे, ३४ सहस्रबुद्धे, ३५ सोहनी.

इतक्या आडनांवांच्या लोकांना तरी एकवंशी म्हणणें अशक्य आहे; अर्थात् हीं आडनांवें ऋषिमूलक नाहीत.

ह्या ३५ नांवांत अग्निहोत्री, आचार्य, काळे, गोरे, चोळकर, जोशी, दातार, भट, भागवत, विध्वंस (विद्वांस), वेलणकर, वैद्य, व्यास हीं आचार, धंदा, गुण, गांव ह्यांवरून पडलेलीं नांवें आहेत. तेव्हा त्यांच्याच वर्गांत गांगल, किणकिणे, करवे, गोगटे, गोडसे, गानू, सोहनी, माटे, माईल, बेहरे, थत्ते, विंझे हीं नांवें पडलीं पाहिजेत हें उघड आहे. मग त्यांचा अर्थ समजो वा न समजो. तीं ऋषिनामज नाहीत हें निश्चित.

२०४ आडनांवांपैकीं, करप्रत्ययान्त आडनांवें ७४ आहेत. कर हा प्राकृत षष्ठीचा प्रत्यय. गांवाच्या पुढे कर लागला म्हणजे त्या गांवाचा असा अर्थ होतो. पहिल्या ६० आडनांवांत करप्रत्ययान्त एकहि आडनांव नाही. पूर्वी गांवांवरून पडलेलीं नांवें एकारान्त आहेत; उ. परचुरे, आपटे, घारपुरे, राजवाडे, दामले, नरवणे, पांवशे. आठवले आडनांव गांवावरून (आठवली ?) पडलें असेल काय ? असो. हीं एकारान्त नांवें करप्रत्ययान्त नांवाच्या पूर्वींचीं असावीं. चक्रदेव, नातू हीं नांवें तर जशींच्या तशीं गांवांचीं आहेत. ह्याच वर्गांत कोकणे, मराठे, कानडे हीं प्रांतावरून पडलेलीं नांवें मोडलीं जाणार. ओंकार, अग्निहोत्री, आचार्य, भट, वझे, भागवत, परांजपे, उपाध्ये, वैशंपायन, व्यास, उकिडवे हीं धार्मिक आचारांवरून पडलेलीं नांवें होत. काळे, गोरे, साने, मोने, घारे, काणे, पांगूळ, गोळे हीं शारीरिक वैगुण्यावरून पडलेलीं नांवें असावींत. गुणावगुणांवरून निपजलेलीं नांवें बरींच आहेत; उ. गोडबोले, विद्वांस, दातार, दाते, रसाळ, सहस्रबुद्धे, आगलावे, रास्ते, मनोहर, दाबक, खरे, खुळे, पाउलबुद्धे, नित्सुरे वगैरे. ह्यावरून पडलेल्या नांवांची संख्या देण्याचें कारण नाही.

देव शब्दाने कित्येक आडनांवांना जन्म दिला आहे; उ. देव, देवघर, देवल, मायदेव, जोगदेव, पणदेव [पण+आजा=पणजा ह्याप्रमाणे; पण म्हणजे पर (शब्दकोश)]. देवल हा संस्कृत शब्द असून त्याचा अर्थ पुजारी असा आहे. पदार्थांची मालकी अथवा सांनिध्यसूचक कांही आडनांवें बनलीं आहेत तीं:—भाटे, पाळंदे, डोंगरे, पर्वते, आगाशे (आकाशे), शेंडे, शेवडे, गोवंडे, घाटे, भस्मे, भेंडे, कटके, पेठे, गोगटे (गाईचा गट=समूह बाळगणारे!).

शुद्ध पंचांगांत जीं नांवें दिलीं आहेत त्यांखेरीज इतर ठिकाणीं आणखी नांवें आढळलीं तीं येथे देत आहों.

| नांव | गोत्र | नांव | गोत्र |
|---|---|---|---|
| मेठकर | का. | तैत्र | का. |
| बळिये | का. | धापड | क. |
| लावणेकर | शां. | देवलेकर | कौ. |
| मर्ये | शां. | कोळथेकर | शां. |
| सांपळे | बा. | खडके | शां. |
| दाभोळकर | अ. | गुडगेकर | का. शां. |
| वोलणकर | वि. | तिरुस्ते | कौ. |
| मटकर | का. | दाहिभाते | वि. |
| तरणे | का. | धोडपकर | शां. वा. |
| भेलाड | का. | धोपावकर | कौ. |
| कुडवे | का. | नवांके | शां. |
| पेंडये | वा. | पंड्ये | का. |
| वाटवेकर | शां. | पराडकर | शां. |

| | | | |
|---|---|---|---|
| गावडु | वा. | पाळशेतकर | शां. |
| अमरे | भा. | पुराणिक | कौ. |
| गंघाळ | भा. | पोतनीस | शां. |
| पावटये | शां. | फडतरे | का. |
| कोसरकर | शां. | बोहरे | शां. |
| घनकर | शां. | मुजूमदार | कौ. नि. |
| बह्यरे | शां. | लकडे | वा. |
| कावणकर | कौ. शां. | वाकलकर | वि. |
| केमनाककर | गा. | हरबुडे | वा. |
| बहडकर | गा. | क्षीरसागर | भा. |
| खेडेकर | का. | | |

ह्यांपैकी पहिलीं ५ नांवें ह्याच पुस्तकांत छापलेल्या श्लोकांतील आहेत. पुढचीं ८ नांवें ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडांतून घेतलीं आहेत. त्यानंतरचीं १४ नांवें आमच्या घरच्या जुन्या वहींतलि आहेत. शेवटलीं २० नांवें एका छापील पुस्तकांतून घेतलीं आहेत. "कोंकणस्थ लोकांच्या उपनांवांवरून अकारादि वर्णानुक्रमानें गोत्रें व शाखा" ह्या शीर्षकाखाली वरील नांवें दिलीं आहेत.

ह्याशिवाय सन १९३८ च्या महाराष्ट्र रोजनिशींत गैलाड व ढब्बु हीं अधिक नांवें आहेत. भावे नांव शुद्ध पंचांगांत चुकीने राहून गेलेलें दिसतें. ह्याशिवाय ह्याच पुस्तकांत आणखी नांवें आलीं आहेत; उदा० कवडीकर, कुलेंकर, ओंजाळे, लाटे, सखदेव, साखरे, शिद्रस, कंद्रप, चांगबोले, खरबळे, बाठे, कडालकर वगैरे. ह्या सर्वांची बेरीज केल्यास ४०० वर आडनांवांची संख्या भरेल ह्याविषयी शंका नको.

अज्ञान, अशुद्ध छापणी व उच्चारभेद ह्यांमुळे अनवश्यक नांवांचा संग्रह

झाला असावा. कांही नांवांचा लोप झाला आहे हें निःसंशय दिसतें.

मटकर, मेटकर, मेठकर हीं सर्व मुळांत एकच असणें शक्य आहे. सर्वांचें गोत्र काश्यप आहे. मेढेकरांचेंहि गोत्र काश्यप आहे. मेठकरांचे मेढेकर झाले कीं काय ह्याची चौकशी ह्या आडनांवाच्या लोकांनी करण्यासारखी आहे. मेढें गांव खेड तालुक्यांत आहे. मेढें इतरत्र आहे. बाळिये हें बाडिये–बडे ह्यांचें पूर्वस्वरूप आहे. कोसरकर आणि कोंझरकर ह्यांचें तादात्म्य आहे. शांडिल्यगोत्री बेहरे आहेत. वरील नांवांत बह्मरे असें नांव लिहिलेलें आहे. ह्यावरून बेहरे हे मूळ बहिरे असूं शकतील काय अशी शंका येते. वाटवेकर हें एक नांव लक्ष वेधण्यासारखें आहे. वाटव्यांचें गोत्र शांडिल्य असतें तर वाटवे आणि वाटवेकर एकच असें म्हणतां आलें असतें व वाटवे हा गांव असला पाहिजे असाहि तर्क करतां आला असता. वाटवे वासिष्ठगोत्री असून वाटवेकर शांडिल्यगोत्री आहेत. दुसऱ्या कित्येक नांवांचा– उदा० तैत्र, गावदु, मेलाड वगैरे–उलगडा करणें दुर्घट आहे. फाटकांचें दुसरें नांव रास्ते आहे. ह्याचेंच चुकीने सास्ते नांव पंचांगांत छापलें असावें.

आता पोष्टखात्याच्या ग्रामनामावलीवरून कांही गांवांचीं नांवें व तीं गांवें कोठे आहेत तें येथे दिलें असतां संशोधनकुतूहल उत्पन्न होण्यासारखें आहे.

| | |
|---|---|
| दामली— बडोदें संस्थान | रनाड— भडोच जिल्हा |
| दबक— रेवाकांठा | गोखली— पुणें ,, |
| दांडेगांव— निजामाचें राज्य | फलटण संस्थान |
| भावे— जंजिरा संस्थान | गोली— ध्रांगद्रा ,, |
| कोलट— अहमदाबाद जिल्हा | गोध्रा जिल्हा |
| बापोटिया— पंचमहाल ,, | गोळेगांव— पुणें ,, |

सातारा जिल्हा
खानदेश ,,
सोमण— खानदेश ,,
सोमणगांव— भुसावळ
निजामचें राज्य
सोमणहल्ली— कारवार
सोमणकट्टी— कारवार
लिंबें— अहमदनगर जिल्हा
मेहेनजाल— खानदेश जिल्हा
कुंटा (Cunta)— पोर्तुगीज प्रांत
साठ—फलटण
लोंढा—स्टेशन
कानेर—कच्छ संस्थान
कानेरी—राजापूर
Ponxem ( पोंक्षे )—पोर्तुगीज गोवा

ह्यांमध्ये सोमणगांव, सोमणकट्टी हीं नांवें उद्बोधक आहेत. कारवार, खानदेश, निजामचें राज्य अशा निरनिराळ्या ठिकाणीं सोमण शब्दान्वित ग्रामनामें आहेत. ह्यावरून सोमण शब्दाला कांही तरी अर्थ असावा असें दिसतें. कोंकणांतील चित्पावन सोमण कारवाराहून किंवा खानदेशांतून आले किंवा इकडून ते तिकडे गेले असें अनुमान करणें सध्या तरी बेहोषपणाचें होईल. तथापि दामलींचे ते दामले, लिंब्याचे लिमये, मेहेनजालचे मेहेंदळे, गोखलीचे गोखले, बापोटियाचे बापट, कोलटचे कोलटकर, रनाडचे रानडे इत्यादि आडनांवांचा संबंध लावण्याचा मोह आवरणें कठीण पडणार हें स्वाभाविक आहे. ह्याच्यावरून इतकें मात्र सिद्ध होतें की, गांवांचीं नावें हा एक अभ्यासाचा विषय असून त्याची उपेक्षा करतां कामा नये.[1] एक चापेकरांचेंच उदाहरण घेऊं. चापेगांवावरून चापेकर हें नांव पडलेलें दिसतें. जयगड खाडींत चापेगांव आहे. परंतु ह्या नांवांचीं गांवें किती आहेत तें पाहा:—

१ इंग्रजींत लिहिलेल्या नांवाचे मराठींत उच्चार दिले आहेत. असें करण्यांत चुकीचा संभव आहे, परंतु फारच थोडा.

| गांव | प्रांत | गांव | प्रांत |
|---|---|---|---|
| चापेवाडी | नगर | चापावाडी | बडोदें सं. |
| चापगांव | बेळगांव | चापखंड | कारवार |
| चाफ | विशाळगड | चाफेखोल | मालवण |
| चाफेवाडी | सातारा | चाफेली | सांवतवाडी |
| चापानेर | खानदेश | चाफेर | कानडा |
| चापेगांव | अहमदनगर | चाफेड | देवगड |

चित्पावनांच्या आडनांवासंबंधाने आणखी एक लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांमध्ये ऋर्षीवरून एकहि आडनांव पडलेलें नाही. देशस्थ व इतर ब्राह्मण ह्यांच्यांत अशीं आडनांवें आहेत; उदा. अत्रे, पराशरे, कौंडिण्य, शांडिल्य, वासिष्ठ, मुद्गल, चन्द्रात्रेय, कौशिक, भारद्वाज.

मद्रासकडील कांहीं उपनांवें इकडील चित्पावनांच्या आडनांवांसारखीं भासतात; उदा. सी. रघुनाथस्वामी रावसाहेब कोलथर; डी. रंगराव दांते; बी. सेतु माधवराव बडे; जी. के, व्यंकटराव जंजिरा.

## प्राचीन व नवीन उपनामांचे प्राकृत श्लोक व आर्या

श्रीमद्विघ्नेशातें प्रथमारंभीं नमूनियां भावें ॥
रचितों यथामतीनें चित्पावनगोत्रमालिका नांवें ॥१॥

### गोत्र काश्यप (आर्या)

करमरकर भट शिंत्रे जोशी दातार ठोंसरा लिहिणें ॥
खाडिलकर पालीकर बिवलकर भेठकरादि कातरणें ॥१॥
छत्रे वेलणकरही भानू पणदेव गानु कान्हेरे ॥
रास्ते गोखले ओग्ले दामोदर फाळके लवाटे रे ॥२॥

लेले सुकुले भेंडे बळिये जे किणकिणे तथा जोग ॥
आर्या त्रितयी संख्या काश्यपगोत्रांत तीसही सांग ॥३॥

### गोत्र शांडिल्य (श्लोक)

थत्ते ताम्हनकार आणि टकले आम्डेकरादीक जे ॥
तैसे घामणकारही तुळपुळे तिम्रेकरा जाणिजे ॥
माटे पावगि डोंगरे तदुपरी भाटे कुटुंब्ळे तथा ॥
शेंड्ये गांगल पांवशे नरवणे पळणिट्करा जाणिजे ॥१॥
जोशी सोमण दामले परचुरे पांगूळ विध्वंसही ॥
काळे माइल भोगले सह तथा साहस्रबुध्येसही ॥
काळे टीळक कानडे निदसुरे दातारही गोडसे ॥
तैसे पाटणकार केळकरही कर्वे दुगुल् गानुही ॥२॥
जाणा ते व्यास शित्रे घणवटकरही लावणेकार पद्ये ॥
मर्ये बाम् बेहरे जे रिसबुड सिधये आणि जे कां उपाध्ये ॥
तैसे ते राजवाडे गणपुल शिधुरे कोंझरेकार साचे ॥
त्रिश्लोकांत द्विपंचाशत मणि गणि जे भेद हे शांडिलाचे ॥३॥

### गोत्र वासिष्ठ (श्लोक)

साठे बोडस कारलेकर तथा दातार दांडेकर ॥
पेठ्ये घारपुरे तसे परवत्ये बागूल अभ्यंकर ॥
दात्ये मोडक सावरेकर तथा जे भातखंडे तसे ॥
जाणा दोणकरांसि कोपरकरां वर्तक घारे तसे ॥१॥
भाभे वैद्य विनोद बापट तथा जे गोंवड्ये ओकही ॥
धारू आणि दिवेकरासहि तथा विंझे व नानूसही ॥
तैसे पोंगशिये महाबळ तथा जे गोगटे साठ्ये ॥
वासिष्ठांतिल भेद बत्तिस पहा श्लोकद्वयीं निश्चयें ॥२॥

गोत्र कौंडिण्य (श्लोक)

आचारी पटवर्धनादि फणशे हे वन्हि संख्या पुरे ॥
जाणा निश्चय चित्तपावन असे कौंडिण्यगोत्रीं बरे ॥

गोत्र विष्णुवर्धन (आर्या)

वाकळकर ओळकरहि नेने मंडलिक परांजपे देव ॥
किडमिड किंकिण तैसे मेहदळे विष्णुवृद्धि जाण नव ॥१॥

गोत्र नित्युंदन (श्लोक)

वैशंपायन भाडभोकहि भिडे साहस्रबुद्धे तथा ॥
जाणा पंचसयुक्त पिंपळखरे नित्युंदनी सर्वथा ॥१॥

गोत्र भारद्वाज (श्लोक)

गोळे वैद्य मनोहरादिक तथा गंगाळ घैसासही ॥
दर्वे सोवनि रानड्ये तदुपरी टेणे कण्याचेसही ॥
जोशी घांगुरडे व आचवलही जे आकवे हो तथा ॥
भारद्वाजकुळीं रहाळकर ही संख्यातिथी सर्वथा ॥१॥

गोत्र गार्ग्य (श्लोक)

जोशी थोरात घाणेकर पिटकरही खंग्ले केतकार गोरे ॥
लोंढे वझेही सहीत भुसकुटे आणि माटे सुतार ॥
ऐसे जे वैद्य बेडेकर भट करवे दाबके भागवत ॥
तैसे गाङ्गीळ टोळे म्हसकर खजणे गार्ग्यगोत्रीद्विविंशत् ॥१॥

कपि गोत्र (श्लोक)

काळे विध्वंस कर्दीकर सह लिमये आणि जे का मराठे ॥
खांबेटे मायदेवासहित परिशिजे आणि सान्ये रटाटे ॥
भाटे जाईल जे कां तदुपरि परिसा भागवत्ताभिधानें ॥
संख्या जाणा दलालासह दिनकरही युक्त गोत्रीं कपीने ॥१॥

## गोत्र जामदग्नी (श्लोक)

कुंटे आणि पेंडसे भागवत । गोत्रहि जाणा जामदग्नी तिघांस ॥१॥

## गोत्र वत्स (श्लोक)

गोरे काळे मालसे घांगरेकर जोशी सोहनी उकिड्वे आणि गांगल ॥
होळे भैरव शेवडे मायलेही द्वादश ऐसे वत्स गोत्राशि पाहीं ॥१॥

## गोत्र बाभ्रव्य

बेंद्रे बेहरे सांपळे बाळ जाणा या चौघांतें गोत्र बाभ्रव्य माना ॥१॥

## गोत्र कौशिक (आर्या)

शेंडे रास्ते देवल आगाशे शेवडे फफे भावे ॥
सटकर कानिटकरही कोलटकर बापये खरे बरवे ॥१॥
गडबोले पाळंदे शारङ्पाणी खुळेहि ढमढेरे ॥
वर्तक फाटक शौचे स्वैपाकी देवघर तिरुक गोरे ॥२॥
आपटे बामही गद्रे वाढे हुंबे तसेच पेटकर ॥
कौशिकगोत्रामाजी संख्या द्वात्रिंशताख्य पूर्ण कर ॥३॥

## गोत्र अत्रि (आर्या)

मोने चिपळुनकरही चांकेकर अटवले हसमूनीस ॥
चितळे भाड्मोळेहि फडके वसुसंख्य अत्रिगोत्रास ॥१॥

## आर्या

चौदा गोत्रांमाजी साठ कुळें पूर्वी होतीं जीं पूर्ण ॥
त्यांचेंचि भेद गणित झाले नव वन्हि युग्मद्दे जाण ॥१॥

नाशीक व त्र्यंबकेश्वर येथील तीर्थोपाध्यायांच्या वह्यांत ज्या आडनांवाचें कुटुंबाच्या दृष्टीने तादात्म्य आहे त्या आडनांवांच्या संबंधाने जी माहिती मिळाली ती येणेंप्रमाणे :—

श्रीखंडे=दिवेकर
आखवे=रानडे
आगलावे=सहस्रबुद्धे
आघारकर=दातार
आचार्य=माद्रेकर
आचार्य=पालकर
आचार्य=पटवर्धन
उकिडवे=काळे
कटके=पटवर्धन
कडालकर=वझे
करंदीकर=लिमये
कवडीकर=भाभे
कंद्रप=रानडे
काकतकर=काळे (वत्सगोत्री)
कातरणे=गोखले
कान्हेरे=नवलाखे
कापशे=वैशंपायन
कापशे=जोशी
कापरेकर=भागवत (कपि)
कापरेकर=भागवत
कार्लेकर=अभ्यंकर
कुटुंबळे=थोरात
कुटुंबळे=थत्ते
कुर्लेकर=चिपळूणकर
कोकणे=दांडेकर
कोंझरेकर=केळकर
खखलेकर=डोंगरे
खासगीवाले=गानू
खांबेटे=मराठे
खेडकर=दाते
गांगरेकर=मालसे
गैलाट=वर्तक
गोडबोले=जोगळेकर
गोंधळेकर=साठये
घाटे=काळे
घांघरेकर=मालशे
घारे=बापट
घुले=जोशी
घैसास=बर्वे
घोटवडेकर=जोशी
चक्रदेव=मराठे
चांगोले=पेंडसे
चितळे=मोने
जाईल=मराठे
जोगदेव=बर्वे
जोगदंड=बर्वे
जोगदेव=भट
टकले=जोशी

डोणकर=दांडेकर
ढबू=भट
ढमढेरे=देवधर
तीरडेकर=अभ्यंकर
तुळपुळे=जोशी
दारसेतकर=भट
देव=परांजपे
देवळे=आपटे
नरवणे=सोमण
नगरकर=अभ्यंकर
नरवणकर=जोशी
पर्वते=दांडेकर
पानवाले=भिडे
पालकर=गोखले
प्रवगी=डोंगरे
फणसे=पटवर्धन
फफे=मनोहर
फाटक=आगाशे
बडे=गोखले
बाठे=लिमये
बिनीवाले=भट
बुद्धिबळे=दाते
बेंडे=मेहेंदळे
भातखंडे=दांडेकर
भेंडे=रहाळकर
मधुमते=अभ्यंकर
मनोहर=अरमरे
महाबळ=धारपुरे
मायदेव=शुक्ल
मुरुगकर=गाडगीळ
रटाटे=मराठे
रसाळ=भिडे
राजवाडे=जोशी
रास्ते=फाटक
लाटे=भागवत
वर्तक=करमरकर
वर्तक=वाळ
वर्तक=वागूल
वर्तक=पराजपे
वाडदेकर=जोगळेकर
विनोद=भांडक
वेळदूरकर=तुळपुळे
वैद्य=मनोहर
व्याम=गाडगीळ
शिवरेकर=वैद्य
शृंगारपुळे=सहस्रबुद्धे
सरकर=कानिटकर
सरंजाम=सहस्रबुद्धे

| | |
|---|---|
| साखरे=जोशी | हरिश्चंद्रकर=जोशी |
| सामल=बाळ | हसबनीस=फडके |
| सारंगकर=विद्वांस (शांडिल्य) | होडे=पराजपे |
| सुतार=केतकर | होळे=जोशी |
| सोहनी=काळे (वत्स) | |

ह्याशिवाय जोशांमध्ये अनेक प्रकार आहेत ते :—

ब्रह्मे, एकबोटे, मटंगे, काशीकर, रोडे, गोसावी, योगी, वऱ्हाडे, पहडते, रहाळकर, घोरपडे, गुडघेकर, मार्गासने, धुणसीवाले, केतकर, सरवटे, मनोळकर.

कोणतीं आडनांवें कोणत्या गांवीं आढळतात ह्याविषयी उपरोक्त वह्यांत मिळालेली माहिती येथे देत आहों.

| | | | |
|---|---|---|---|
| बागूल वर्तक, बाळ वर्तक, सामल | मुरूड | श्रीखंडे | आवास |
| | | कंद्रप | आडिवरें |
| | | शृंगारपुतळे | कोतवडें |
| ढबू | रेवदंडा | किंजाळे | केळशी |
| रटाटे | दाभोळ व जालगांव | नरवणकर | कल्याण |
| | | घारू | टाळसूर |
| व्यास | पालशेत, काशी, पेडणें, सासवणें | सुतार | चौक |
| मार्गासने | नांदगांव | आंबडेकर | गुहागर, जुन्नर, देवरूख |
| घुले | नेवरें | | |
| अरमरे | गुहागर | लेलगे | आगाशी |
| रानवाडकर | गोवळकोट (चिपळूण) | राणे | बिरवाडी, तळें, घोसाळें |
| रिसबूड | पालशेत, आसूद | वाडदेकर | गोळप |

मायले अंजर्ल्यास होते. आता तेथे ह्या आडनांवाचें कुटुंब नाही.

# ७ कुलस्वामी

## १

कुलस्वामी ह्या शब्दांत कुल आणि स्वामी असे दोन शब्द आहेत. कुल शब्द कुल् ह्या संस्कृत धातूपासून निघालेला आहे. ह्या धातूचा अर्थ गोळा करणें[१] असा आहे. आप्तत्वाने एकत्र झालेले, संबंधी, एकाच रक्ताचे असे जेवढे असतील त्या सर्वांचें मिळून कुल होतें. मराठींत कुल शब्दाला घराणें हाच प्रतिशब्द योग्य आहे. कुल म्हणजे कुटुंब नव्हे, किंवा जात नव्हे. गोत्र आणि कुल ह्यांतील संभवनीय भेद 'गोत्र' प्रकरणांत दाखविलाच आहे. इक्ष्वाकु राजाच्या वंशजांना कालिदासाने इक्ष्वाकूंचें कुल असें म्हटलें आहे. इक्ष्वाकु राजा गोत्रऋषि असल्याचें प्रसिद्ध नाही. एका कुलांतले म्हणजे एका आडनांवाचे असें सध्या थोडेसें म्हणतां येईल. शूद्रांत कुल ह्या अर्थाने कुळी शब्द प्रचारांत आहे. ब्राह्मणांत जातकुळी ह्या शब्दांत कुळी हें रूप आढळतें. कुलीन, कुलस्त्री, कुलवधू इत्यादि शब्दांवरून कुल ह्या शब्दाचा मूळ अर्थ शुद्ध वंश असा असावा. अर्थात् विवाहसंस्था दृढमूल झाल्यानंतर कुल शब्द अस्तित्वांत आला असावा. जातकुळी ह्यांत जात व कुळी हे दोन शब्द आहेत. लग्नाच्या वेळेस एकमेकांच्या जातीची व कुळीची बारकाइने चौकशी करतात. कुळीची चौकशी म्हणजे वंशशुद्धतेची चौकशी होय. कोकणस्थ अथवा चित्पावन, देशस्थ, कऱ्हाडे ह्या निरनिराळ्या जाती होत. ह्यांपैकी एका जातींतील माणसाने दुसऱ्या जातींतील वधू पत्नी केल्यास कुळी शुद्ध राहणार नाही. तथापि ह्या कृत्याने जात्यंतर होत नसतें. जात्यंतराचीं उदाहरणें क्वचित् घडतात.

१ तुलनार्थ इंग्रजी कल् (cull) शब्द पाहा.

मुरूडला पंडित नांवाचें कऱ्हाडे जातीचें कुटुंब कोकणस्थांत सामील झालें व कोळिसरें येथील मराठे नांवाचें कोकणस्थ कुटुंब देवरुखे जातींत गेलें अशा दंतकथा प्रचलित आहेत; परंतु त्यांचा इतिहास पाहतां जात्यंतराचीं हीं उदाहरणें देतां येणार नाहीत. पंडित घराण्यासंबंधाने असें सांगतात की, एक कोंकणस्थ मुलगा पंडित आडनांवाच्या कऱ्हाडे बाईने दत्तक घेतला. दत्तविधान झालें कीं नुसतें नांव बदललें ह्याविषयी संशय आहे. दत्तविधान झालें होतें असें मानलें तरी पररक्तमिश्रणाचा दोष घडत नाही. मुलगा चित्पावन असल्याकारणाने चित्पावनाने आपली मुलगी मिळकतीच्या लोभाने त्याला देणें विशेषसें अस्वाभाविक नाही. पुढील सर्व संबंध चित्पावनाशींच झाले म्हणजे आडनांव तेवढें चित्पावन आडनांवांत सामील झालें इतकेंच. एका चित्पावनाने कऱ्हाडे नांव व गोत्र स्वीकारून जिनगी मिळविली एवढाच अर्थ. दुसरें उदाहरण मराठ्यांचें देतात. मराठे हें आडनांव देवरुख्यांत नाही. तें कोकणस्थांत विशेषतः आढळतें. हें एकच कारण ह्या प्रवादाच्या मुळाशीं असावें. तथापि त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे की, मराठे हें आडनांव मूळ साठ आडनांवांपैकी नाही. ह्याशिवाय देवरुखे मराठे ह्यांचें गोत्र पाराशर आहे. हें गोत्र कोकणस्थांत नाही. तें देशस्थांत आढळतें. देवरुख्यांत सुद्धा मराठ्यांखेरीज दुसऱ्या कोणाचेंहि पाराशर गोत्र नाही. कदाचित् हें देशस्थ कुटुंब असेल. परंतु देशस्थांत मराठे हें आडनांव असल्याचें ऐकिवांत नाही. तें कांहीहि असो. गोत्रावरून देवरुखे मराठे हे मूळचे कोकणस्थ नसावे असेंच अनुमान करणें भाग आहे. असो. जातींच्या मिसळीने ज्यांचीं कुलें दूषित झालीं आहेत त्यांची जातकुळी चांगली नाही असें समजून उच्च अथवा शुद्ध जातकुळीचीं कुटुंबें त्यांशीं विवाहसंबंध घडवून न आणण्याची दक्षता आजपर्यंत बाळगीत असत. ठाणें-कुलाबा जिल्ह्यांत हा प्रकार विशेषतः दृष्टीस पडे. रत्नागिरी जिल्ह्यांत

जातकुळी बिघडण्याचें कारण उद्भूत होण्याचा संभव कमी. वऱ्हाडांत व इतरत्र कोकणस्थांच्या पंक्तीला बसलें असतां पुनः मुंज करावी लागे असें म्हणतात. असे हे हीन ब्राह्मण आपल्या जातीच्या शुद्धीविषयीं पराकाष्ठेची खबरदारी घेत हें पाहून आश्चर्य वाटतें. विवाहाच्या पूर्वी जातकुळी बघण्याचा प्रघात चित्पावनांतच विशेषतः आढळतो. जातकुळी शब्दहि ह्या निमित्ताने चित्पावनांतच प्रामुख्याने प्रचलित आहे. तात्पर्य, जात्यंतराचीं उदाहरणें क्वचित् आढळतात. परदेशांत एखादें कुटुंब जाऊन राहिलें तर तें तद्देशस्थांत जाऊन मिसळतें हें खरें. मद्रास इलाख्यांत गेलेलीं दक्षिणी कुटुंबें तिकडील समानधर्मीय जातींत मिसळलीं आहेत. कोकणस्थ देशस्थ बनले आहेत. कोकणस्थ देशस्थांत सामील झाल्यास देशस्थांच्या जातकुळीला उणेपणा येतो असें म्हणण्यास आधार नाही. ह्या दृष्टीने कोकणस्थांत अन्य जातींची भेसळ झाली आहे काय आणि असल्यास किती हा एक संशोधन करण्यासारखा विषय आहे. असो. एकंदरींत कुल म्हणजे घराणें अथवा वेल असा अर्थ कुलस्वामी ह्या शब्दांतील कुल शब्दाचा केला पाहिजे.

कुल शब्दाचा विचार केल्यानंतर स्वामी शब्दाच्या अर्थाचा विचार करूं. स्वामी हा शब्द कानडी मुलुखांत महाराष्ट्रापेक्षा अधिक प्रचारांत आहे. आपण संन्याशाला स्वामी म्हणतों. मालक ह्या अर्थी स्वामी शब्द आपण वापरीत नसलों तरी मालकी–सत्ता–हक्क ह्या अर्थाचा स्वामित्व शब्द आपल्या परिचयाचा आहे. तथापि भाडेपट्टे आणि कोर्टांतील फिर्यादी–कैफियती–ह्यांच्या बाहेर त्याचें अस्तित्व फारसें दृग्गोचर होत नाही. स्वामी म्हणजे प्रभु ह्या अर्थी मराठी राजांना उद्देशून बोलण्याचा प्रघात पूर्वी असल्याचें जुन्या कागदपत्रांवरून दिसतें. कुलस्वामी ह्या शब्दांत स्वामी म्हणजे अधिष्ठाता देव असा अर्थ उघड दिसतो. परंतु मराठींत स्वामी

शब्दाचा देव असा अर्थ होत नाही. संस्कृतांत सुद्धा स्वामी म्हणजे मालक, राजा, पति, यति असेच अर्थ आहेत. केवळ देव हा अर्थ स्वामी शब्दाला संस्कृतांत किंवा मराठींत नाही. कानडी प्रांतांत दुसऱ्याला स्वामी म्हणून हांक मारतात. तसेंच कानडी लोकांच्या व देवांच्या नांवांमध्येहि स्वामी शब्द आढळतो. उ. रामस्वामी मुदलिआर. हा स्वामी शब्द आदरार्थी उपयोजिलेला असतो असें दिसतें.

कुलस्वामी, कुलदैवत, कुलदेवता हे तीन लिंगी शब्द एका अर्थाचे आहेत. कुळाची अधिष्ठात्री देवता हा त्यांचा अर्थ. तथापि कुलदेव हा शब्द रूढ नाही ह्याच्या कारणाचा विचार होणें जरूर आहे. कुलस्वामी शब्द एकदा रूढ झाल्याकारणाने कुलदेव शब्द प्रचारांत येऊं शकला नाही असें दिसतें. संस्कृतांत स्वामी शब्द शंकर, विष्णु व कार्तिकेय=कार्तिकस्वामी ह्यांचा वाचक आहे. ह्याप्रमाणे कुलस्वामी ह्यांतील स्वामी शब्दाचा अर्थ आपण केला तर शंकर किंवा विष्णु ह्याव्यतिरिक्त दुसरें कुलदैवत असूं शकणार नाही असें म्हणावें लागेल. कार्तिकस्वामी हा शंकराचा मुलगा असल्यामुळे म्हणजे मूळ देव तो नसल्यामुळे कुलस्वामी होण्यास फारसा पात्र नाही हें सांगावयास नको. ह्यावरून कुलस्वामीमध्ये शंकर व विष्णु यांच्या व्यतिरिक्त इतर देवांचा जरी समावेश होत नसला तरी कुलदैवत ह्या शब्दांत देवी, गणपति व सूर्य यांचा अन्तर्भाव होण्यासारखा आहे. ह्या दृष्टीने विचार करतां कुलस्वामीच्या जागीं नुसती देवी असणें संभवनीय नाही. ज्यांचें कुलदैवत देवी आहे त्यांच्यांत कुलस्वामी हा शब्द प्रचलित नसावा.

जोगेश्वरी ही कोकणस्थांची कुलस्वामिनी आणि तीहि पुनः अंब्याची असा सर्वत्र पसरलेला लौकिक समज आहे. आमच्या मतें हा समज अत्यंत निर्मूल आहे. एकंदर सुमारे ११०० इसमांची माहिती जी आम्ही

गोळा केली त्यांत फक्त ५९ इसमांनीच नुसती जोगेश्वरी ही कुलदेवता असल्याचें लिहून दिलें आहे. ह्यांमध्ये नागपूर, मिरज, धुळें वगैरे बाहेर गेलेल्या लोकांचा भरणा फार आहे. तसेंच ह्यांनी दिलेली माहिती अपुरी आहे. कित्येकांना तर जोगेश्वरीशिवाय दुसरें कांही ठाऊक नाही. ही जोगेश्वरी बायकांनी रक्षण करून ठेविली आहे ह्यांत संशय नाही. पुष्कळांच्या कुलस्वामीबरोबर कुलदेवता असते हें मात्र खरें. उ. वाडेश्वर-जोगेश्वरी; सोमेश्वर-महालक्ष्मी; कालभैरव-सरस्वती; गिरिजाशंकर-यमाई; वीरेश्वर-विंध्यवासिनी; लक्ष्मीनारायण-दुर्गादेवी; व्यंकोबा-जोगेश्वरी; रवळनाथ-जोगेश्वरी; विमलेश्वर-महालक्ष्मी; व्याघ्रेश्वर-जोगेश्वरी; आदित्यनाथ-महालक्ष्मी; केशवराज-जोगेश्वरी; महादेव-जगदंबा; भोमेश्वर-कोटेश्वरी; लक्ष्मीकेशव-मुसळादेवी; कुसुमेश्वर-महालक्ष्मी इत्यादि. पुष्कळ वेळां मुख्य देव विसरला जाऊन देवी तेवढी कायम राहते. दुसरें असें की, वाडेश्वर-जोगेश्वरी ज्यांचें कुलदैवत आहे ते एका पानावर दोन मुदा घालून नैवेद्य दाखवतात. जोगेश्वरी कुलस्वामिनी पूर्वीची आणि वाडेश्वर वगैरे देव कोंकणांत आल्यावर तिला जोडले असें मानलें तर जोगेश्वरीचा नैवेद्य निराळ्या पानावर पाहिजे होता. एका पानावर दोन मुदा घालण्याचा हेतु दोनहि देव एकाच गांवाचे आहेत अथवा देवी ही देवाच्या अंगभूत आहे असाच असला पाहिजे. चित्पावन हे देवीभक्त नाहीत; कऱ्हाडे आहेत. चित्पावन शिव आणि विष्णु यांचे उपासक विशेषतः दिसतात. शिवाय जोगेश्वरी ही अंब्याची देवी असें मानण्याला यत्किंचितहि कारण नाही. जुगाईचीं देवळें कोंकणांत अनेक ठिकाणीं आहेत. आडिवऱ्याला शक १२०० पावेतों योगेश्वरीचें देऊळ होतें.[1] अंब्याची जोगाई आमची कुलस्वामिनी हा नुसता भ्रम आहे. जी गोष्ट जोगेश्वरीची तीच अंबाबाईची. कोल्हापूरची अंबाबाई प्रसिद्ध आहे म्हणून

१ परांजपे घराण्याचा इतिहास पान ३१.

तिच्याशीं नातें लावावेंसें वाटतें. नुसती अंबाबाई कुलदैवत सांगणारे फारच थोडे आहेत. शंकर हा कुलस्वामी असल्यावर त्याची अर्धांगी उपास्य झालीच पाहिजे. शंकराला योगेश्वर-योगी असें म्हणतात. योगेश्वराची स्त्री योगेश्वरी. देव आणि देवपत्नी हीं एकत्र असावयाचीं. उ. पार्वतीपरमेश्वर; लक्ष्मीकेशव; लक्ष्मीनारायण. पतिवती स्त्रियांचीं देवळें स्वतंत्र नसतात. देवांबरोबर त्यांची मूर्ति ठेवण्याचा जुना प्रघात आहे; उ. लक्ष्मी व नारायण; विठ्ठल व रखमाई; राम व सीता; शंकर व पार्वती. स्वतंत्र देवीचें देऊळ असल्यास ती अवतार घेतलेली देवी समजली पाहिजे. देवीभागवतांत अशा देवींचें वर्णन आहे. ह्या देवी अविवाहित असतात. राक्षसाला मारण्यापुरता त्या अवतार घेतात. त्यांचीं नांवें सप्तशतींत आलीं आहेत. ह्या देवींचें स्वरूप उग्र असतें.

सारंगपूरच्या थत्त्यांची कुलदेवता जोगेश्वरी आहे[1], पण ही कोंकणची असें ते समजतात. हे हर्णै मुरुडाहून सारंगपूरला गेले. ह्यांची समजूत जोगेश्वरी देवी कोंकणची आहे; अंब्याची नाही ही गोष्ट फार महत्त्वाची आहे.

लक्ष्मीनारायण–जोगेश्वरी, विष्णु–जोगेश्वरी ह्या दांपत्याच्या जोड्या कशा लावतां येतील ह्याचा विचार कुलस्वामीच्या ठिकाणीं वरील दांपत्याचा स्वीकार करणारांनी केलेला दिसत नाही. नारायणाची पत्नी जोगेश्वरी होणार नाही. आता लक्ष्मीनारायण आणि जोगेश्वरी ह्या दोन कुलदेवता स्वतंत्र मानावयाच्या कीं काय ! परंतु तसें मानतां येणार नाही. कुलदैवत कोणतेंहि असो पण तें एकच असलें पाहिजे ह्यांत शंका नाही. पंचायतनांत पांच देव असले तरी प्रमुख देव एकच असतो. लक्ष्मीनारायण कोणत्या गांवचा तें निश्चयपूर्वक सांगतां येतें; परंतु जोगेश्वरी अमुक गांवची हें कोणास सांगतां येत नाही. ह्यावरून असें म्हणतां येतें की

१ थत्ते कुलवृत्तान्त पृ. १००.

जोगेश्वरी निराकार नसली तरी निराधार किंवा ग्रामनिरपेक्ष आहे.

आम्हांला असें वाटतें की जोगेश्वरी देवीवरून चित्पावन शैव होते हें सिद्ध होतें. लक्ष्मीनारायण, केशवराज, लक्ष्मीनृसिंह, लक्ष्मीकेशव इत्यादि वैष्णवपंथसूचक कुलस्वामी पाठीमागून आलेले आगंतुक आहेत. चित्पावन कोंकण किनाऱ्यावर आले त्या वेळीं सर्वत्र शैवपंथ प्रचलित होता. दक्षिणेंत वैष्णवपंथ मध्वानुजांनंतर सुरू झाला. ह्यामुळे सर्व चित्पावन मूळचे शैवच होते ह्याविषयी शंका घेण्याचें कारण नाही.

कुलस्वामी व ग्रामदेवता ह्यांत भेद केलेला दिसतो. कुलस्वामी हा शंकर असून ग्रामदेवतांत क्षुद्र देवतांचा समावेश केलेला दिसतो. सुमेरियांत प्रत्येक गांवचा एक कोणी तरी प्रमुख देव असे त्याचप्रमाणे प्रत्येक माणसाचें एक कुलदैवत अथवा आराध्यदैवत असे.[1] असाच प्रकार चित्पावनांसंबंधाने असलेला दिसतो. वेळणेश्वरास वेळणेश्वराचें प्रमुख देवालय; गुहागरास वाडेश्वराचें माहात्म्य; कोळथऱ्यास कोळेश्वर मुख्य देव ही गोष्ट प्रामुख्याने मनावर ठसते. पुष्कळ चित्पावनांचे हेच कुलस्वामी आहेत. ह्या देवांहून ग्रामदेवता भिन्न आहेत.

२

आता कोणत्या कोकणस्थांचा कोणता कुलस्वामी अगर कोणतें कुलदैवत आहे किंवा असावें हें पाहूं. ह्याकरता मूळ साठ आडनांवांचाच उपयोग विशेषतः केला आहे. साठांत पुढे बनलेलीं आडनांवें आलीं पाहिजेत असें गृहीत धरून चालूं. प्रथमतः बाळ आणि बेहरे घेऊं. हे एकाच गोत्राचे म्हणजे बाभ्रव्यगोत्री आहेत (शांडिल्यगोत्री बेहरे निराळे). ह्यांचा कुलस्वामी भोमेश्वर आहे. सर्व जोगांचा कुलस्वामी करहाटेश्वर. जोगांप्रमाणे दर्वे यांनीहि आपला कुलस्वामी करहाटेश्वर सांगितला आहे.

---

१ Wooley १२०.

दर्वे हें मूळ साठांपैकी आडनांव आहे. परंतु ह्या आडनांवाचीं कुटुंबें फार कमी आहेत म्हणून आम्हांस एकाच कुटुंबाकडून माहिती मिळाली. गाडगीळ आणि गोखले ह्यांचा वेळणेश्वरावांचून दुसरा कुलस्वामी नाही. रानडे व वैशंपायन आणि पटवर्धन व फणशे हे अनुक्रमें व्याघ्रेश्वर व करंजेश्वरी[1] असें कुलदैवत सांगतात. वेळेश्वर हा कुलस्वामी दाबक्यांचा आहे. भावे, वाड हे बहुतेक कोळेश्वर कुलदैवत मानतात. आचवल व कर्वे हे हरिहरेश्वराला कुलस्वामी मानणारे. कित्येक लेल्यांनी वाडेश्वर, वेळणेश्वर, स्थानेश्वर हे कुलस्वामी असल्याचें सांगितलें आहे. परंतु वाडेश्वर सांगणारांच्या नैवेद्यांत हरिहरेश्वर आहेच. हें कुटुंब पूर्वी वेळणेश्वरचें राहणारें होतें व वेळणेश्वर मूळ गांव सांगणारे मिरजेचे लेले वेळणेश्वर कुलस्वामी सांगतात तो ह्यावरून चुकीचा दिसतो. त्यांचाहि कुलस्वामी हरिहरेश्वर असला पाहिजे. मुटाटचे एक लेले स्थानेश्वर सांगतात. ह्यांच्या नैवेद्यांतील देव आम्हांस समजले नाहींत. ह्या देवांत हरिहरेश्वर असेल तर सर्व लेल्यांचा कुलस्वामी तोच आहे असें म्हणण्यास हरकत नाही. आमच्या मतें हरिहरेश्वर हाच लेल्यांचा कुलस्वामी होय.

चितळ्यांचा कुलस्वामी वीरेश्वर ह्याविषयीं संशय नाही. वाडेश्वर कुलस्वामी सांगणारे आपटे, ओक, किडमिडे, गणपुले, गद्रे, घांगुरडे, गांगल, दामले, परचुरे, बापट, बागूल, पोंक्षे, मालशे, विंझे व साठे हे होत. सोळा आपट्यांपैकी सात आपट्यांनी वाडेश्वर कुलस्वामी म्हणून लिहून दिला आहे. बाकीच्या नवांत जोगेश्वरी, अंबाबाई, वेताळ, भार्गवराम वगैरे कुलदैवत सांगणारे आहेत. आजगांवकर आपट्यांनी लिहून दिलेल्या कुलस्वामींत धरसोड दिसते. परंतु मूळ गांव सोडून फार काळ लोटल्यावर व दरम्यान ग्रामान्तरेंहि बरींच झालीं तर कुलस्वामी बदलतो

१ परंतु पटवर्धनांचा कुलस्वामी आम्हीं वाडेश्वर ठरविला आहे.

असा अनुभव आहे. शिवाय मालवणकडून (आजगांव सांवतवाडी संस्थानांत आहे) गोठण्यास आपट्यांचें घराणें गेलें असावें असें कित्येकांच्या हकीकतीवरून दिसतें आणि गोठण्याच्या आपट्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ह्यावरून सर्व आपट्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे असें आम्हांस वाटतें. आपटे घराण्याच्या इतिहासाचे लेखक श्री. आपटे यांनी ग्रंथारंभीं "श्रीकुलस्वामी वाडेश्वर प्रसन्न" असें लिहिलें आहे त्यावरून तर मुळीच संशय राहत नाहीं. ओकांचाहि कुलस्वामी वाडेश्वर. कोळथरें मूळ गांव सांगणारे ओक हल्ली कोळेश्वराला कुलस्वामीच्या ठिकाणीं मानतात. तथापि त्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर असल्यामुळे त्यांचाहि मूळ कुलस्वामी वाडेश्वरच असला पाहिजे. दोनहि किडमिड्यांनी वाडेश्वर कुलस्वामी सांगितला आहे. पंधरा गद्यांतून नवांनी आपला कुलस्वामी वाडेश्वर लिहून दिला आहे व चौघे टाळकेश्वर सांगतात. परंतु ह्याहि चार गद्यांचा मूळचा कुलस्वामी वाडेश्वर असावा. पंचवीस बापटांपैकी एकोणीसजण वाडेश्वर सांगत आहेत. एकजण अन्नपूर्णा सांगतो पण त्याच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. बहुतेक साठे वाडेश्वर सांगतात. विंझे, परचुरे, पोंक्षे, गणपुले, घांगुरडे, एकजात वाडेश्वर सांगतात. बोडसांपैकी एका कुटुंबाचा वाडेश्वर कुलस्वामी आहे तर दुसऱ्या दोघांचा शंकरेश्वर आहे. शंकरेश्वराचें देवालय पडेल येथे आहे. दोन बोडस मूळ गांव वाडें पडेल म्हणून सांगतात. त्यांपैकी एक मिरजेचे असून दुसरे पालगडचे आहेत. मिरजकर बोडसांच्या नैवेद्यांत दुर्गादेवी आहे. ही देवी गुहागरला आहे आणि वाडें पडेल गांवीं नाही ह्यावरून ह्या मिरजकर कुटुंबाचाहि संबंध गुहागराशीं होता असें दिसतें म्हणून बोडसांचा कुलस्वामी वाडेश्वर आम्ही निश्चित करतों. ११ दामल्यांपैकी ६ नी वाडेश्वर लिहून दिला आहे. दोन इसमांना कुलस्वामी माहीत नाही. दुसऱ्या दोघानी वेताळ व एकानें जोगे-

श्वरी अशीं कुलदैवतें सांगितलीं. मालवणकडील दामले वेताळ सांगतात. वेताळ ही आजगांवची ग्रामदेवता आहे. आपट्यांप्रमाणे ह्यांचाहि मूळ कुलस्वामी वाडेश्वर आहे असें आम्हांस वाटतें. एका मालशांचा कुलस्वामी वाडेश्वर असल्याचें त्यांनी कळविलें आहेच.

दोन मालशांची माहिती मिळाली. पैकी एकानें वाडेश्वर कुलस्वामी लिहून दिला आहे. दुसऱ्या गृहस्थानी आम्नायेश्वर सांगितला. हे गृहस्थ गांगराईचे राहणारे असून दुसरे चिपळूणचे राहणारे आहेत. तथापि ह्या दुसऱ्या गृहस्थांचा पूर्वीचा गांव बुरबाड आहे. आम्नायेश्वर देव बुरबाडचा आहे असें आम्नायेश्वर कुलस्वामी सांगणारे म्हणतात. ह्यावरून ह्यांचाहि मूळ कुलस्वामी वाडेश्वरच असावा असा तर्क करतां येतो. आम्नायेश्वर हा स्थानिक देव होय आणि म्हणून तो नंतरचा आहे. म्हणून आम्ही मालशांचा कुलस्वामी वाडेश्वर ठरविला आहे.

दाबक्यांचा कुलस्वामी वेळेश्वर दिसतो. एकाने नुसतीच महालक्ष्मी सांगितली आहे. मेहेंदळे यांचीं कुलदैवतें लक्ष्मी केशव, केशवराज आणि मुसळा देवी हीं होत. ही विष्णूची उपासना दिसते. लिमये ह्यांचाहि तोच कुलस्वामी आहे. सर्व नेन्यांचाहि तोच असावा. लक्ष्मीनारायण हा परांजप्यांचा कुलस्वामी असावा असें आडिवऱ्याच्या इतिहासावरून दिसतें. तथापि त्यांच्यापैकी कांहीचा वाडेश्वर कुलस्वामी आहेच.[1] एकाच गोवंड्यांनी आम्हांस माहिती कळविली. ते जोगेश्वरी कुलस्वामिनी सांगतात. कुलस्वामी सुटला असें दिसतें. भाभे ह्यांचा वाडेश्वर कुलस्वामी आहे असे एकाने लिहून दिलें आहे आणि दुसऱ्याने नांदिवड्याचा कऱ्हाटेश्वर लिहिला आहे. भाभ्यांचें मूळ गांव नांदिवडें पण वाडेश्वर एकाचा कुलस्वामी असल्याने गुहागर हेंच मूळ गांव असलें पाहिजे.

---

१ प. घ. इ. विवेचन ३०८.

मुरूड व पालगड येथील बागुलांनी अनुक्रमें महादेश्वर व वाडेश्वर असे कुलस्वामी सांगितले आहेत. महादेश्वर हा मुरूडचा स्थानिक देव आहे. पालगडच्या बागुलांचा पूर्वीचा गांव मुरूडच. त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ह्यावरून बागुलांचा कुलस्वामी वाडेश्वरच असला पाहिजे हें उघड दिसतें.

एकंदर मूळ आडनांवें साठ. मूळ म्हणण्यापेक्षा जुन्यांत जुनीं आडनांवें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. ह्यांपैकी भाडभोके, टेणे, गांधारे, माईल, भाडभोळे व धारू हीं सहा आडनांवें आम्हांस मिळालीं नाहीत. म्हणजे ५४ उपनांवांचीं कुटुंबें उपलब्ध आहेत. त्यांपैकी ३९ आडनांवांच्या घराण्यांच्या कुलस्वामींचा विचार वर केला. आता १५ घराण्यांचा कुलस्वामी निश्चित करणें आहे. पुष्कळांना कुलस्वामी माहीत नाही. दुसऱ्या कित्येकांनी देशावर येऊन तेथील देवतांचें ग्रहण केलें आहे. खंडोबा, भवानी हीं देशस्थ दैवतें घाटावर येऊन कोंकणस्थांनी उचललेलीं दिसतात. कोकणस्थ कुलस्वामीचा त्यांना पत्ताहि नाही. कित्येकांनी विष्णुपंचायतन हाच कुलस्वामी लिहून दिला आहे. कित्येक-कुटुंबांत ग्रामदेवतांनी मुख्य कुलस्वामीची जागा पटकाविली आहे. उदा. एका मेहेंदळ्यांचें केशवराज व मुसलादेवी असें जोड कुलदैवत आहे तर दुसऱ्या एका मेहेंदळयांच्या कुटुंबांत केशवराज अदृश्य होऊन मुसलादेवीच शिल्लक राहिली आहे. कोंकण सोडून नागपूरसारख्या दूर देशीं गेलेल्या कोकणस्थांपैकी फारच थोड्यांना आपल्या देवतांची आठवण राहिली आहे. कोकणांतहि एतद्विषयक अज्ञान पसरूं लागलें आहे. ह्याचें मुख्य कारण आमच्यामध्ये ऐतिहासिक दृष्टीचा पूर्ण अभाव हें होय. सारांश, वरील कारणांमुळे राहिलेल्या घराण्यांचा कुळस्वामी निश्चित करणें कठीण झालें आहे. त्यांतहि पुष्कळ लोकांनी माहिती पाठवून दिली असती तर कांही तरी ठाम निर्णय देण्यास मदत झाली असती. असो.

जाईल यांनी अंबाबाई कुलदेवता सांगितली आहे. आमच्या मतें नुसती देवी हें कोणत्याहि कोंकणस्थाचें कुलदैवत नसावें. कोंकणस्थ शैव

आहेत. कांही कोंकणस्थ विष्णुभक्त असतील; परंतु बहुसंख्या शिवोपासकांची आहे. आम्हांस तीन जाईल कुटुंबें मिळालीं. त्यांनी अंबाबाई सांगितली असली तरी दोघांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे, दुर्गादेवीहि आहे. ह्यावरून वाडेश्वर त्यांचा कुलस्वामी असावा असें वाटतें. हे दुमदेवचे राहणारे. दुमदेव गांव दापोली तालुक्यांत दाभोळजवळ आहे. वाडेश्वर व दुर्गादेवी ह्या ग्रामदेवता मानल्यास त्यांचें पूर्वीचें ठिकाण गुहागरच असलें पाहिजे. ह्या कारणास्तव जाइलांचा वाडेश्वर कुलस्वामी असला पाहिजे असें मानण्यास हरकत नाही.

एकाच माट्यांनी माहिती दिली. ते विमलेश्वर कुलस्वामी असल्याचें सांगतात. ह्याच्याबद्दल आम्हांस शंका आहे. परंतु तोच घेऊन आपण पुढे चालूं.

साठ्ये यांच्यामध्ये काळभैरव (जोगेश्वरी) सांगणारे पुष्कळ. दोघांनी वीरेश्वर (जोगेश्वरी) सांगितला आहे. हबसाण व रत्नागिरी मिळून काळभैरवाचीं देवळें निदान तीन तरी आहेत. बहिरींचीं देवळें तर गांवोगांवीं आहेत. गोंधळेकर आणि साठ्ये एकच. गोंधळेकरांनीहि आपला कुलस्वामी कालभैरव सांगितला आहे. वीरेश्वर सांगणारांच्या नैवेद्यांत बहिरी आहेच. बहिरी=भैरव=काळभैरव हे एकच देव होत. काळभैरव हाच साठ्यांचा कुलस्वामी मानणें भाग आहे.

खांबेटे हे शिवोपासक दिसत नाहीत. केशवराज, लक्ष्मीकेशव व आदित्यनाथ असे ह्यांचे कुलस्वामी आहेत. आदित्यनाथाचें सूर्याचें देऊळ आहे असें म्हणतात. मेहेंदळे, नेने, लिमये ह्या विष्णुभक्तांच्या पंक्तींत खांबेटे बसतात. खांबेट्यांचा मूळ कुलस्वामी सुटला आहे असें दिसतें.

आदित्यनाथ कुलस्वामी सांगणारे सोमण आहेत. नवांपैकी सहा जणांनी हें कुलदैवत लिहून दिलें आहे. बाकी तिघांचे कुलस्वामी रवळनाथ, वाडेश्वर व बेलेश्वर असे आहेत. सावरड्याचे सोमण रवळनाथ सांगतात.

ह्यांत आश्चर्य नाही. नाखऱ्याचे सोमण वाडेश्वर व वडदचे बेलेश्वर सांगतात. सध्या आदित्यनाथ हाच ह्यांचा कुलस्वामी समजूं. तथापि मूळ नांवाच्या ह्या सोमणांत एक तरी वाडेश्वर कुलस्वामी सांगतो हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कारण साठ घराण्यांपैकी बऱ्याच जणांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे हें पुढे दिसून येईल. आदित्यनाथ व महालिंगवर्धिनी ह्यांचीं देवळें धामणगांवीं आहेत. हा गांव खेड तालुक्यांत आहे.

दहा पेंडश्यांपैकी, ४ आदित्यनाथ, २ केशवराज, १ काळभैरव, १ वाडेश्वर आणि १ जोगेश्वरी अशीं कुलदेवतें सांगतात. एकाला कुलस्वामी माहीत नाही. कालभैरव सांगणाराच्या नैवेद्यांत आदित्यनाथ आहेच. आमच्या मतें आदित्यनाथाच्या सेवकांत पेंडसे पडतात. कुंट्यांचाहि कुलस्वामी आदित्यनाथ असावा. एकाने कोळेश्वर सांगितला आहे. दुसरा हरिहरेश्वर सांगतो.

शांडिल्यगोत्री जोशांमध्ये २७ कुटुंबांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव, लक्ष्मी नृसिंह, हा आहे. बाकीच्यांत कोणी वाडेश्वर, कोणी हरेश्वर, कोणी काळभैरव, कोणी वेळणेश्वर सांगतो. एकंदर चाळीस जोशांची माहिती आली आहे. एकाला कुलस्वामी कोण तें माहीतच नाही. वाडेश्वर सांगणारे चार जोशी असून वेळणेश्वर कुलस्वामीवाल्या जोशांच्या नैवेद्यांत वाडेश्वर येतो. वेळणेश्वरच्या जोशांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. तथापि शांडिल्यगोत्री जोशी हे शैव नाहीत असें तूर्त म्हणण्यास हरकत नाही.

पांच लवाट्यांपैकी दोघांना कुलस्वामी माहीत नाही. एक अंबाबाई व दुसरा परशुराम सांगतो. ह्यांचा समावेश अज्ञान्यांत होणार. बाकीचा एक वाडेश्वर सांगतो. तेव्हां लवाट्यांचा कुलस्वामी वाडेश्वर ठरविल्यावांचून गत्यंतर नाही.

आठवल्यांचा कुल स्वामी सोमेश्वर असावा. ह्यासंबंधाने भरपूर माहिती मिळाली नाहीं. १५ आठवल्यांपैकी चौघांना आपला कुलस्वामी

माहीत नाही. पावणाई व जोगेश्वरी सांगणाऱ्यांच्या स्मृतींतून कुलस्वामी निसटला आहे. १ वीरेश्वर, १ आम्नायेश्वर आणि २ सोमेश्वर सांगतात. सध्या सोमेश्वर आपण समजूं.

गानू–काश्यपगोत्री मूळ साठ आडनांवांच्या कुटुंबांत मोडतात. त्यांचा कुलस्वामी लक्ष्मीनृसिंह आहे

गोगटयांत कांही मेळ बसूं शकत नाही. वाडेश्वर, वेळणेश्वर, रामेश्वर असे निरनिराळे कुलस्वामी ते सांगतात. मुंडजेकर गोगट्यांचा कुलस्वामी वेळणेश्वर आहे. तथापि वेळणेश्वरवाल्यांच्या नैवेद्यांत कान्होकृष्ण आहे. कान्होकृष्ण गोगटयांचा पूर्वज. तेव्हा हें सर्व एक कुटुंब यांत शंका नाही. म्हणून वाडेश्वर हाच ह्यांचा कुलस्वामी होय.

लोंढ्यांचा कुळस्वामी वाडेश्वर. एक बाम कोळेश्वर व एक हरेश्वर व एक वाडेश्वर कुलस्वामी सांगतो. सर्व बाम कोळथऱ्याचे. ज्या अर्थी कोळथऱ्याचा एक बाम वाडेश्वर सांगतो त्याअर्थी सर्वांचा कुलस्वामी वाडेश्वर समजणें युक्त होईल. कोळेश्वर हा कोळथऱ्याचा देव.

भाटे व गांगल ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असला पाहिजे. ज्या गांगलांना आपला कुलस्वामी सांगतां येतो ते वाडेश्वर सांगतात. केडजाई व जानाई सांगणारे भाटे आपला कुलस्वामी विसरले आहेत. एक जण वाडेश्वर सांगतो तेंच खरें.

सहा अनुपलब्ध आडनांवें सोडलीं तर साठांपैकी चोपन आडनांवांच्या घराण्यांचे कुलस्वामी येणेंप्रमाणे :—

वाडेश्वर— १ आपटे, २ ओक, ३ किडमिडे, ४ गणपुले, ५ गद्रे, ६ घांगुरडे, ७ जाईल, ८ दामले, ९ परचुरे, १० पोंक्षे, ११ बागूल, १२ बापट, १३ बोडस, १४ मालशे, १५ लवाटे, १६ विंझे, १७ साठे, १८ लोंढे, १९ भाटे, २० गांगल, २१ गोगटे, २२ भाभे, २३ बाम.

काळभैरव— २४ साठ्ये.

हरिहरेश्वर—२५ आचवल, २६ करवे, २७ लेले.

कोळेश्वर—२८ भावे, २९ वाड.

व्याघ्रेश्वर— ३० रानडे, ३१ वैशंपायन.

भोमेश्वर— ३२ बाळ, ३३ बेहरे.

कऱ्हाटेश्वर— ३४ जोग, ३५ दर्वे.

वेळणेश्वर— ३६ गाडगीळ, ३७ गोखले.

करंजेश्वरी— ३८ पटवर्धन, ३९ फणशे.

वेळेश्वर— ४० दाबके. वीरेश्वर— ४१ चितळे.

सोमेश्वर— ४२ आठवेले. विमलेश्वर—४३ माटे.

लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनृसिंह, केशवराज } ४४ खांबेटे, ४५ जोशी (शांडिल्य), ४६ मेहेंदळे, ४७ नेने, ४८ लिमये, ४९ परांजपे, ५० गानू.

आदित्यनाथ— ५१ कुंटे, ५२ सोमण, ५३ पेंडसे.

जोगेश्वरी—५४ गोवंडे.

३

एकंदर १११३ इसमांकडून माहिती आली

त्यांची एकंदर आडनांवें १९८; त्यांनी सांगितलेले एकंदर कुलस्वामी १४९; त्यांचा अनुक्रम येणेंप्रमाणे:—

| कुलस्वामी | किती जणांनी सांगितला | किती आडनांवांच्या लोकांनी सांगितला | कुलस्वामी | किती जणांनी सांगितला | किती आडनांवांच्या लोकांनी सांगितला |
|---|---|---|---|---|---|
| १ वाडेश्वर | १९३ | ६१ | २ लक्ष्मीकेशव | ६५ | २२ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | जोगेश्वरी | ६३ | ४६ | २७ | वेताळ | ६ | ६ |
| ४ | हरिहरेश्वर | ६० | २६ | २८ | वेळेश्वर | ६ | २ |
| ५ | कालभैरव | ४३ | २५ | २९ | देवी | ५ | ५ |
| ६ | वेळणेश्वर | ४१ | १९ | ३० | महाकाली | ५ | ५ |
| ७ | महालक्ष्मी | ३६ | २५ | ३१ | वीरभद्रेश्वर | ५ | ३ |
| ८ | केशवराज | ३४ | १६ | ३२ | कुसुमेश्वर | ४ | १ |
| ९ | गणपति | ३२ | १८ | ३३ | टाकळेश्वर | ४ | १ |
| १० | कोळेश्वर | ३२ | ८ | ३४ | दुर्गा | ४ | ४ |
| ११ | सोमेश्वर | ३१ | ११ | ३५ | भगवती | ४ | ३ |
| १२ | व्याघ्रेश्वर | २८ | ९ | ३६ | भोमेश्वर | ४ | २ |
| १३ | अंबाबाई | २५ | १९ | ३७ | विमलेश्वर | ४ | ४ |
| १४ | वीरेश्वर | २५ | १२ | ३८ | सप्तेश्वर | ४ | २ |
| १५ | लक्ष्मीनारायण | २२ | १३ | ३९ | आमणेश्वर | ३ | २ |
| १६ | लक्ष्मी-नृसिंह | १७ | ५ | ४० | काशीविश्वेश्वर | ३ | ३ |
| १७ | आदित्यनाथ | १६ | ४ | ४१ | खंडोबा | ३ | ३ |
| १८ | कनकेश्वर | १४ | १ | ४२ | जानेश्वर | ३ | २ |
| १९ | रवळनाथ | १४ | ११ | ४३ | नगरेश्वर | ३ | १ |
| २० | करंजेश्वरी | १२ | ३ | ४४ | बांदेश्वरी | ३ | १ |
| २१ | रामेश्वर | ११ | १० | ४५ | ब्रह्मदेव | ३ | २ |
| २२ | कऱ्हाटेश्वर | ९ | ३ | ४६ | भवानी-भूतेश्वर | ३ | १ |
| २३ | अंजनेश्वर | ७ | ७ | ४७ | विश्वेश्वर | ३ | २ |
| २४ | परशुराम | ७ | ७ | ४८ | त्र्यंकोबा | ३ | ३ |
| २५ | महाविष्णु | ७ | ३ | ४९ | सिद्धेश्वर | ३ | ३ |
| २६ | गंगेश्वर | ६ | ४ | ५० | शंकरेश्वर | ३ | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| ५१ | अन्नपूर्णा | २ | २ |
| ५२ | एकवीरा | २ | १ |
| ५३ | खारेश्वर | २ | १ |
| ५४ | अंजनेश्वर-निगडेश्वर | २ | १ |
| ५५ | गौतमेश्वर | २ | २ |
| ५६ | नवलाई | २ | १ |
| ५७ | नाटेश्वर | २ | १ |
| ५८ | भरतेश्वर | २ | १ |
| ५९ | भवानी-शंकर | २ | २ |
| ६० | भार्गवराम | २ | १ |
| ६१ | महालक्ष्मी-महासरस्वती-महाकाली | २ | २ |
| ६२ | मुसलादेवी | २ | २ |
| ६३ | लक्ष्मीकेशव-वाडेश्वर | २ | २ |
| ६४ | विष्णु | २ | २ |
| ६५ | स्थानेश्वर | २ | २ |
| ६६ | हरिहरेश्वर-आदित्येश्वर | १ | १ |
| ६७ | आदित्येश्वर | १ | १ |
| ६८ | आदिष्टादेवी | १ | १ |
| ६९ | उमामहेश्वर | १ | १ |
| ७० | एकनाथ | १ | १ |
| ७१ | करंजाणीची देवी | १ | १ |
| ७२ | कान्होकृष्ण | १ | १ |
| ७३ | कालश्री | १ | १ |
| ७४ | कुंभार-कुसुमेश्वरी | १ | १ |
| ७५ | कुंभेश्वर | १ | १ |
| ७६ | केडजाई | १ | १ |
| ७७ | केळाई | १ | १ |
| ७८ | कोटेश्वर | १ | १ |
| ७९ | खंडोबा-वाडेश्वर | १ | १ |
| ८० | गणपति-वाडेश्वर | १ | १ |
| ८१ | गणपति-भावका-देवी रवळनाथ | १ | १ |
| ८२ | गारमाता | १ | १ |
| ८३ | गिरमाई | १ | १ |
| ८४ | गिरिजाशंकर | १ | १ |
| ८५ | गिरोबा | १ | १ |
| ८६ | गोलांबिका | १ | १ |
| ८७ | गोवर्धनेश्वर | १ | १ |
| ८८ | त्र्यंबकेश्वर | १ | १ |
| ८९ | त्रिमुखी | १ | १ |
| ९० | तृणबिंदुकेश्वर | १ | १ |
| ९१ | दुर्गा-माटला | १ | १ |
| ९२ | धोपेश्वर | १ | १ |
| ९३ | नवदुर्गा | १ | १ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९४ | नागलेश्वर | १ | १ | ११५ | यवतेश्वर | १ | १ |
| ९५ | नारायण | १ | १ | ११६ | रघुपति | १ | १ |
| ९६ | निरंकारी | १ | १ | ११७ | रत्नेश्वर | १ | १ |
| ९७ | नृसिंह-सरस्वती | १ | १ | ११८ | रवळनाथ-सोमेश्वर | १ | १ |
| ९८ | परशुराम-रवळनाथ | १ | १ | ११९ | रामेश्वर-रवळनाथ | १ | १ |
| ९९ | पंढरीनाथ-मल्हारीमार्तंड | १ | १ | १२० | रेवणसिद्ध | १ | १ |
| | | | | १२१ | रेवणसिद्ध-हरेश्वर | १ | २ |
| १०० | पावणाई | १ | १ | १२२ | रहाटेश्वर | १ | १ |
| १०१ | बल्लाळेश्वर | १ | १ | १२३ | लक्ष्मीकांत | १ | १ |
| १०२ | बावदेव | १ | १ | १२४ | लक्ष्मीकेशव-अंजनीवटेश्वर | १ | १ |
| १०३ | बिल्वेश्वर | १ | १ | | | | |
| १०४ | बेलेश्वर | १ | १ | १२५ | लक्ष्मीनारायण-हरिहरेश्वर | १ | १ |
| १०५ | बोबडेश्वर | १ | १ | | | | |
| १०६ | भवानी | १ | १ | १२६ | लिंगेश्वर | १ | १ |
| १०७ | भावई | १ | १ | १२७ | वाडेश्वर-आमणेश्वर | १ | १ |
| १०८ | भार्गवराम-लक्ष्मीनारायण | १ | १ | १२८ | वाडेश्वर-उमामहेश्वर | १ | १ |
| १०९ | महाविष्णु-गणपति | १ | १ | | | | |
| ११० | महाविष्णु-लक्ष्मीनारायण | १ | १ | १२९ | वाडेश्वर-कुसुमेश्वर | १ | १ |
| १११ | महादेव | १ | १ | १३० | वाडेश्वर-गणपति | १ | १ |
| ११२ | महादेश्वर | १ | १ | १३१ | वाटेश्वर | १ | १ |
| ११३ | महादेश्वर-वाडेश्वर | १ | १ | १३२ | विठोबा-खंडोबा | १ | १ |
| ११४ | माहेश्वरी | १ | १ | १३३ | विरोबा-वेताळ | १ | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| १३४ | विंध्यवासिनी | १ | १ |
| १३५ | विष्णुपंचायतन | १ | १ |
| १३६ | विष्णु-शंकर | १ | १ |
| १३७ | वेतेश्वर | १ | १ |
| १३८ | वैजनाथ | १ | १ |
| १३९ | व्याघ्रांबरी | १ | १ |
| १४० | शांतादुर्गा | १ | १ |
| १४१ | समजबाई | १ | १ |
| १४२ | सिद्धिविनायक | १ | १ |
| १४३ | संकेश्वर | १ | १ |
| १४४ | सोमेश्वर-कालभैरव | १ | १ |
| १४५ | सोमेश्वर-कोळेश्वर-रवळनाथ | १ | १ |
| १४६ | सोमेश्वर-रवळनाथ | १ | १ |
| १४७ | सोमेश्वर-वाडेश्वर | १ | १ |
| १४८ | हरिहरेश्वर-कालभैरव | १ | १ |
| १४९ | हरिहरेश्वर-वेळणेश्वर | १ | १ |
| | कुलस्वामी माहीत नाही असे | ५७ | ४३ |

हे आंकडे वरवर पाहिले तरी इतकें स्पष्ट दिसतें की, वाडेश्वर हा पुष्कळांचा कुलस्वामी आहे. १११३ पैकी ५७ जणांना आपला कुलस्वामी माहीत नाही. अर्थात् १०५६ त १९३ कुटुंबांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ज्या इसमांनी वाडेश्वर कुलस्वामी सांगितला नाही परंतु ज्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे असे १९ इसम आहेत. ह्यावरून ह्यांचाहि कुलस्वामी पूर्वी एकदा वाडेश्वर होता असें अनुमान करणें अनुचित होणार नाही. नाही तर ह्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर कां यावा ह्याला योग्य कारण नाही. हे इसम आपला राहण्याचा गांव गुहागर सांगत नाहीत. उकिडवे, केळकर, करमरकर, गोडबोले, जाईल, देवल, नातू, पटवर्धन, फाटक, बापट, भिडे, वझे, सहस्रबुद्धे ह्या आडनांवांचीं कांही कुटुंबें ह्या सदरांत पडतात. हा आंकडा १९३ मध्ये मिळविल्यास २१२ कुटुंबांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. त्याचप्रमाणे व्याघ्रांबरी

देवी ज्यांच्या नैवेद्यांत आहे अशीं पांच कुटुंबें आहेत. ही देवी गुहागरा-शिवाय इतरत्र क्वचित् आहे. तेव्हा जोशी, पटवर्धन, मटंगे, मोडक व सहस्रबुद्धे (शांडिल्य) ह्या आणखी पांच कुटुंबांचा संबंध गुहागराशीं येतो.

जोगेश्वरी सांगणारे फक्त ६३ निघाले व परशुराम तर साताहून अधिकांचा कुलस्वामी नाही. ह्यावरून परशुराम अथवा जोगेश्वरी चित्पावनांचें कुलदैवत आहे ह्या भ्रमाचें निरसन आपोआप होतें. कुलस्वामींची संख्या १४९ आहे. त्यांत एकाच अद्वितीय कुलस्वामीचा उच्चार ज्यांनी केला आहे अशांची संख्या ८३ भरते. ह्या लोकांनाहि आपला कुलस्वामी अज्ञात आहे असें म्हणण्यास हरकत नाही. दहाहून अधिक संख्या ज्यांची भरते असे कुलस्वामी २१ आहेत. हे २१ कुलस्वामी ८१२ कुटुंबांत आहेत. ह्यांत वाडेश्वरवाल्यांची संख्या १९३ आहे. ह्याशिवाय संयुक्त कुलस्वामींत ९ वाडेश्वर आहेत. सारांश १९३+९+१९ ( नैवेद्यांतील )=२२१ वाडेश्वर कुलस्वामी असलेल्यांची संख्या भरते. जोगेश्वरीपेक्षा वाडेश्वर पुष्कळ अधिक आहेत हें निर्विवाद सिद्ध होतें.

आता दुसऱ्या रीतीने विचार करूं. आमच्याकडे आलेल्या आडनांवांची संख्या १९८ आहे. त्यांपैकी ६१ आडनांवांच्या लोकांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ह्याच्या खालोखाल जोगेश्वरीवाल्या आडनावांची संख्या ४६ आहे. ह्यावरूनहि चित्पावनांच्या बाबतींत वाडेश्वराचें महत्त्व सिद्ध होतें.

कुलस्वामींचा विचार करतांना खंडोबा, भवानी, त्र्यंबकेश्वर, गिरमाई, वेताळ, एकनाथ, गोलांबिका, खारेश्वर, व्यंकोबा, मल्हारीमार्तंड, ब्रह्मदेव वगैरे देवतांना लोकांच्या असमंजसपणाने कुलस्वामींचें स्थान मिळालें आहे, असें दिसतें. ह्यांपैकी बरेचसे देव बाहेरील आहेत. तसेंच केडजाई, करंजेश्वरी, नवलाई, केळाई, पावणाई इत्यादि ग्रामदेवतांनाहि कुलस्वामींत स्थान मिळतां कामा नये. कान्हो कृष्ण हा गोगट्यांचा पूर्वज एका गोगटे कुटुंबाने आपला

कुलस्वामी बनविला आहे. कालभैरव हाहि विचारांत घेण्यासारखा देव नाही. प्रत्येक गांवीं शंकराच्या देवळाबरोबर, बहिरी, भैरव, कालभैरव ह्या नांवाच्या देवाचें देऊळ असतें. जोगेश्वरीप्रमाणे शंकरावर अवलंबून राहणारा दुय्यम देव कालभैरव समजला जातो.

# ८ ग्रामदेवता

कोंकणांत पंचायतनांतील सर्व देवतांचीं देवळें आहेत. देवीचीं व शंकराचीं देवळें तर अनेक आहेतच, परंतु गणपति, सूर्य व विष्णु ह्या देवांचीं देवळेंहि कमी नाहीत. लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनारायण, लक्ष्मीनृसिंह व केशवराज हीं विष्णूचीं नांवें होत. चित्पावनांत शैव घराणीं फार. फार थोडीं घराणीं विष्णूला कुलस्वामी मानणारीं आहेत. ज्यांचा कुलस्वामी केशवराज, लक्ष्मीनारायण, लक्ष्मीकेशव किंवा लक्ष्मीनृसिंह आहे त्यांचा कुलस्वामी पूर्वी एखादा शंकरच असावा अशी आमची समजूत आहे. लक्ष्मीनृसिंहाचीं देवळें मद्रास इलाख्यांत आहेत. तिकडील राजांनी वरील देव कोंकणांत आणले असतील. केशवराजाचें देऊळ बीड जिल्ह्यांत आहे. ज्या गांवांत हें देऊळ आहे त्या गांवाचें नांव केसापुरी असेंच आहे.

आंबव येथें सूर्यनारायणाचें देऊळ आहे.

पिशाच्चांपासून त्रास होऊं लागला म्हणून विप्रांचें संरक्षण करण्यासाठी देवांनी प्रत्येक गोत्राची रक्षक देवी स्थापन केली अशी स्कंदपुराणकारांची कल्पना आहे[1] :—

रक्षणार्थे हि विप्राणां लोकानां हितकाम्यया
गोत्रान्प्रति तथैकैका स्थापिता योगिनी तदा
यस्य गोत्रस्य या शक्ति रक्षणे पालने क्षमा
सा तस्य कुलदेवीति साक्षात्तत्र बभूवह
श्रीमाता, तारणीदेवी आशापुरी च गोत्रपा
इच्छाऽऽर्तिनाशिनी पिप्पली विकारवशा

---

१ तृतीयब्रह्मखंड, धर्मारण्यखंड अध्याय ९.

......वगैरे.

अनार्य जातीचे मूळचे लोक देवीउपासक आहेत ह्याविषयी शंका नाही. म्हणून कोंकणांतील ग्रामदेवता ब्राह्मणांच्या असणें संभवत नाही.

देवीभागवतांत कालिका, भर्गा, कुमारी, नीला, पावनी, पाटली, भाविनी, भूतवासा, यक्षिणी, बंदीदेवी वगैरे देवींचीं नांवें देवीसहस्र-नामांत सांगितलीं आहेत. बंदी देवी काशीस असल्याचा उल्लेख गुरु-चरित्रांतहि आहे.

ग्रामदेवतांचें अस्तित्व हें निष्कृष्ट संस्कृतीचें द्योतक आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील ह्या देवतांच्या संख्येवरून हीन संस्कारांच्या रानटी लोकांची वस्ती तेथे बरीच असली पाहिजे असें अनुमान करतां येतें. ह्या जिल्ह्यांतील देवता इतरत्र न आढळणाऱ्या आहेत असें नाही. प्राथमिक स्थितींतील माणसाला भूतें हींच सृष्टीचें नियमन करीत असतात असें वाटतें. देवा-विषयी ह्याहून अधिक उच्च कल्पना त्यांची नसते. भूतें हेच त्यांचे देव. आणि हीं भूतें मेलेल्या माणसांचीं असतात ही त्यांची दुसरी कल्पना असते. जाखाई, पावणाई, गिऱ्हा, असला वगैरे सर्व भूतें होत. बाळंतपणांत अगर पाण्यांत जीव देऊन बायको मेली तर ती जखीण होते अशी समजूत आहे. कित्येक लोक चामुंडा हें बाळंतपणांत मेलेल्या स्त्रीचें नांव आहे असें म्हणतात. यक्षीण ह्या शब्दाचें जखीण रूप आहे. विशिष्ट स्थितींत मेलेलीं माणसें यक्षयोनींत जन्म घेतात अशी एक वेळची समजूत असावी. अनात्मवादी लोक मेल्यानंतर असुर देशांत जातात असें उपनिष-दांत म्हटलें आहे त्याचप्रमाणे ही कल्पना असावी. जखाई व जाखाई एकच. जखाई, जुखाई हीं दोन स्त्रीपिशाच्चें होत. यक्ष हे कुबेराच्या घरचे नोकर होते. जाखादेवी, जाखा, जाखामाता, जाखाई, जखाई हीं एकच स्वरूपाचीं भूतें होत. जाखादेव हा ह्यांचा पुरुष देव होय. जुन्या

कागदपत्रांत जाखोजीची आण म्हणजे शपथ घेतलेली आढळते. यक्षाचें प्राकृतांत जक्ख असें रूप होतें. जखाई–जाखाई–जुखाई–जोखाई अशीं रूपें बोलणारांनीं बनविलीं आहेत. जाखाईचा पुजारी महार किंवा मांग असतो. नवलाई हीहि जखिणीप्रमाणे पिशाचदेवता आहे.

चेडा हें अविवाहित मृत महाराचें भूत आहे. चेटक हें कुणबी जातीच्या मनुष्याचें भूत.

कित्येकांकडे बोळांत रस्त्यावर नैवेद्य ठेवण्याची चाल आहे ह्यावरून बोळांत पिशाच्च राहतें अशी समजूत असावी.

चव्हाट्यावर भूतें असतात हा समज सर्वत्र आहे.

गिरा–गिऱ्हा–ग्रह+वीर=गीरवीरा–

गिऱ्हा शब्द संस्कृत ग्रह शब्दावरून व्युत्पादितां येण्यासारखा आहे; उदा. ग्रहपूजन ह्याचा गिऱ्हेपूजन असा अपभ्रंश होतो. ग्रहणाला मांग–महार गिऱ्हा असेंच म्हणतात. परंतु अर्थ विचारांत घेतां ही व्युत्पत्ति जुळण्यासारखी दिसत नाही. गिऱ्हा पाण्यांतलें पिशाच्च आहे असें म्हणतात¹. पाण्यांत बुडून मेलेला अथवा खून झालेला मनुष्य गिऱ्हा होतो अशी लौकिक समजूत आहे. वीर हें अविवाहित मृत क्षत्रियाचें भूत आहे. वीर हे वेताळाचे सामर्थ्यवान् अनुचर आहेत. वेताळ हा भूतांचा राजा समजला जातो. त्याला वाहणा अर्पण करण्याची वहिवाट आहे.

अप्सा–असला–हसला आणि माउली (माउल्या अनेकवचन)—

अप्सा व माउली ह्या जलदेवता आहेत. त्या तळ्याच्या कांठीं व विहिरी-नजीक असतात. ह्या देवता तळ्यांत, विहिरींत माणसाला बुडवतात असें म्हणतात². कित्येकांकडे घरच्या विहिरीवरचा नैवेद्य म्हणून एक असतोच.

१ मोल्सवर्थ. २ Indian Antiquary, November 1914.

जलदेवता अथवा अप्सरा सात आहेत[१]; त्यांचीं नांवें:— १ मच्छी, २ कूर्मी, ३ कर्कटी, ४ दर्दुरी, ५ जतुपी, ६ सोमपा, ७ मकरी.

खैस व म्हश्या पाण्यांत राहतात असें म्हणतात.

जाकरीन नांवाचीहि एक जलदेवता आहे.

घराण्याचा मूळपुरुष हाहि एक मेल्यानंतर पूजास्थान होऊन देवतांत शिरतो. पुष्कळ लोक ''मूळपुरुषा'च्या नांवाने नैवेद्य दाखवितात; उदा. मिरजेच्या गद्र्यांच्या नैवेद्यांत लवेलचा मूळपुरुष असा एक नैवेद्य आहे. हे गद्रे मूळ लवेलचे राहणारे. हा गांव रत्नागिरी जिल्ह्यांत आहे. डॉ. केतकर ह्यांनीहि केतकर घराण्याच्या मूळपुरुषाची प्रतिमा पूजतात म्हणून विद्यासेवकांत लिहिलें आहे, मूळ पुरुषाचा नैवेद्य घरांत भक्षण न करण्याची चाल श्री. के. भा. लिमये ह्यांच्याकडे आहे. हिचें कारण समजत नाही. मूळ पुरुष भूतयोनींत गेला असें समजावयाचें काय?

शिरगांव (ता. रत्नागिरी) येथे आदिष्टीच्या डाव्या अंगास एक लहान काळा दगड आम्हीं पाहिला; त्याचें नांव कासारदेव. हाहि कदाचित् एक मृत कासार असावा. ह्याचा पुजारी गुरव आहे. तसेंच येथे भविक नांवाचा देव आहे. तो गुरवांचा मूळपुरुष अशी कल्पना आहे. हा नुसता काळा दगड आहे. सोलापूरच्या श्री. केशव भास्कर लिमयांच्या नैवेद्यांत मूळपुरुष आहे. परंतु त्याचा नैवेद्य घरांत घेत नाहीत. प्रो. स. वा. जोशी हे ज्या मूळपुरुषाला नैवेद्य दाखवितात त्याचें नांव नाइकबा. मुंजा हा ब्राह्मण असला पाहिजे. मुंज झाल्यावर पण सोडमुंजीच्या अगोदर मेलेला मनुष्य मुंजा होतो. ह्या कारणास्तव मुंजाला संतुष्ट करण्यासाठीं मुंजे जेवूं घालण्याची वहिवाट पडली. ठिकठिकाणीं मुंजे असावयाचेच. मुंजा हें ब्राह्मणभूत होय.

---

१ ही माहिती इंडिअन अँटिक्वेरींतून घेतली आहे.

महापुरुषाचा नैवेद्य श्री. ओगल्यांच्या 'वेगळी देवी'प्रमाणे बाहेर ठेवण्याचा उल्लेख सातारकर कोल्हटकर करतात ह्यावरून महापुरुष हा अस्पृश्य असावा असा तर्क चालतो. परंतु कित्येक ठिकाणीं महापुरुष पिंपळावर असतो असें समजतात. श्री. लक्ष्मण मोरेश्वर रानडे लिहितात :— गांवांत (मोभार येथे) महापुरुषाचा पिंपळाचा पार आहे. पुरुख म्हणजे पुरुष ह्याची पूजा महाराने करावयाची असते. हा महारांचा मूळ पुरुष असावा. एखादा थोर ब्राह्मण मेल्यावर पिशाच्च झाला तर त्याला महापुरुष म्हणतात[१]. महापुरुषाचें देऊळ गुहागरास आहे. महापुरुष यास देवदिवाळी-च्या दिवशीं नैवेद्य दाखविण्याची चाल कित्येक परांजप्यांकडे आहे[२].

मेलेला मनुष्य भूत होतो. ह्याच्यावरची कल्पना म्हणजे तो देव होतो. म्हणून मनुष्यांच्या नांवाचे देव आपणांस आढळतात; उदा. काळूबाई, कासातेली, कुसुमबाई, पहुबाई, गायकवाड, चाचवळकरीण, जैनकाका, दिघकरीण, मांगूबाई, मुरुगकर, सातारकर वगैरे.

स्थलांवरून देवतांना नांवें प्राप्त झालीं आहेत. प्रत्येक स्थलाची अधिष्ठात्री देवता असते. डोंगराई, पांढरी, चव्हाटा, घरणंकरीण, घामणदेव, सीमादेवी वगैरे.

पांढरी म्हणजे गांवठण, लोकवस्तीची जागा; तेथील अधिष्ठात्री देवता अधिष्ठा, आदिष्टी, आयादृष्टि हीं अधिष्ठात्री शब्दाचीं भ्रष्ट रूपें असावीं.

बहिरी सावणेकरीण }
पेठकर दारवटकरीण } आंजलें.

ह्यांत बहिरी–सावणेकरीण आणि पेठकर–दारवटकरीण अशा जोड्या आहेत. म्हणजे एकाच पानावर दोन मुदा घालून जोडीला नैवेद्य दाखवितात. बहिरी व पेठकर हे देव असून सावणेकरीण व दारवटकरीण ह्या

१ मोल्सवर्थ. २. परांजपे घराण्याचा इतिहास, पान ४.

देवी आहेत. पेठकर देवाला देवालय नाही. आंजर्ल्याचा पेठपाखाडी नांवाचा भाग आहे. त्याच्याजवळ डोंगरांत एका वृक्षाखाली सदर देवाचें वास्तव्य आहे. दर आश्विनांत पेठपाखाडीचे लोक त्या ठिकाणीं जेवणी उर्फ वनभोजन याकरिता जात असतात. त्या वेळीं देवाच्या आसपासचीं झाडें-झुडपें, गवत काढून टाकतात आणि तेथील वृक्षावर एक नवीन निशाण लावण्यांत येतें.

"आंजर्ल्याचा सावणें म्हणून दुसरा एक भाग आहे. त्याच्या सीमेवर सावणेकरीण ह्या देवीचें झोपडीवजा एक देवालय आहे. देवीची पूजा क्वचितच होते. मंडळी कधी वनभोजनास गेली तर देवीची पूजा होते; कारण तिला नैवेद्य दाखवावयाचा असतो." —ग. बा. नित्सुरे.

देवीचीं अनेक रूपें असल्यामुळे अनेक नांवें आहेत. भवानी ही सृष्टि-देवता अथवा आदिमाया होय. अर्थात् प्रजनन वा उत्पादनदेवता असेंहि तिचें स्वरूप आहे. ह्या कारणास्तव प्रसूतीच्या वेळीं स्त्रिया भवानीचें स्मरण करतात. शंकराची—महादेवाची शक्ति म्हणून महादेवी हें नांव ती धारण करते. शिवाची सहधर्मचारिणी ह्या नात्याने पार्वती म्हणून ती ओळखली जाते. राक्षसांपासून देवांचें संरक्षण करणारी ही गोष्ट तिच्या दुर्गा नांवावरून प्रतीत होते. ह्या स्वरुपांत कात्यायनी हेंहि तिचें दुसरें नांव आहे. दैत्यांचा वध करण्यासाठी तिला पुष्कळ आयुधें वापरावीं लागतात. एवढ्याकरिता तिला अनेक हात देण्यांत आले आहेत. कालाचाहि अंत करणारी म्हणून तिला काली म्हणतात. अशा वेळीं प्रत्यक्ष शिवाचा वध करतांना आपण तिला मूर्तींत पाहतों. दुर्गेच्या मूर्तीला दहा हात असतात. एका हातांत भाला असतो. ह्या भाल्याने ती महिषासुराला मारीत आहे असें दाखवि-लेलें असतें. दुसऱ्या हातांत तरवार असते. तिसऱ्या हाताने राक्षसाची शेंडी धरलेली असते. बाकीच्या हातांत त्रिशूळ, वाटोळा दगड, परशु, गदा,

बाण व ढाल हीं असतात.

ग्रामदेवता, स्थानदेवता, कुलदेवता, वास्तुदेवता, इष्टदेवता असें देवतांचें वर्गीकरण करण्यांत येतें. गांवांत बहुधा शिव, चामुंडी कालिका, जोगाई, मारुति, वाघोबा, चेडोबा, वेतोबा, वीर, अंबा, भैरव, म्हसोबा, हे देव असतात.

ग्रामदेवतांमध्ये शंकराचाहि समावेश होत असावा. आज जे आपण कुलस्वामी समजतों ते पूर्वी ग्रामदेव असण्याचा संभव आहे.

निरनिराळ्या देवतांचे निरनिराळे वार ठरले आहेत. त्या वारीं त्या देवतेचें अर्चन व्हावयाचें. सूर्याचा आदितवार तर देवीचा मंगळवार आणि शिवाचा सोमवार. गणपतीचा विशिष्ट असा वार दिसत नाही. तीच स्थिति विष्णूची. पूजा दर दिवशीं करावी लागते. देवीची तिच्या वारीं केली तरी चालते. गणपतिपुळ्यास ग्रामदेवीला नैवेद्य दर मंगळवारीं दाखविण्याची वहिवाट आहे.

प्रो. सदाशिव वामन जोशी ह्यांच्याकडे त्यांचा कुलस्वामी कालभैरव ह्याला दर रविवारीं गुळाचा नैवेद्य दाखवावा लागतो. आणि हा नैवेद्य रात्रीं दाखवितात. ह्यावरून काळभैरव हा निशाचरांपैकी आहे असें वाटतें. त्याचप्रमाणे मूळ पुरुषाला दहीभात व लिंबाचें लोणचें ह्यांचा नैवेद्य प्रत्येक मंगळवारीं दाखवावयाची चाल आहे. ह्यावरून मूळ पुरुष मंगळवारीं मेला व त्याला दहीभात आणि लिंबाचें लोणचें आवडत होतें असें समजावयाचें काय ?

मूर्ति ही उच्च संस्कृतींत प्रतीत होते. असंस्कृतावस्थेंतील लोकांचे देव म्हणजे नुसते दगड अथवा खडे. त्यांतहि खडे प्रथमावस्थेंतील असावेत. मोठा दगड ही पुढची अवस्था. पाठीमागून मूर्ति. शंकराची पिंडी ही

१ India in Greece ३९०, ३९१.

हलकी संस्कृति दर्शविते. तसेंच खालचे लोक आपल्या देवाची पूजा नित्य करीत नाहींत; सणावारीं करतात, व तेव्हांच त्यांना नैवेद्य दाखवितात. शिमगा, थोरली-धाकटी दिवाळी आणि चैत्रपाडवा ह्या सणांना बहुधा नैवेद्य व पूजा देवांना मिळते. वरच्या पायरीवरचे लोक प्रतिदिनीं पूजा करतात. त्याचप्रमाणे दारू व मांस हीं कनिष्ठ देवतांना फार आवडतात.

निकृष्ट देवता उघड्यावर राहूं शकतात. वास्तू लाभणाऱ्या देवता अधिक संस्कृत होत. रानटी लोकांच्या देवतांना शेंदूरहि नसतो. शेंदूर हें रक्ताचें प्रतीक असल्यास दैत्यांना मारणाऱ्या पुराणोक्त देवतांना शेंदूर लावण्यांत येतो. परंतु ह्या देवताहि खालच्या संस्कृतींतील असाव्या लागतात. रामाने व मारुतीने रावणाच्या वधाचें कार्य केलें. परंतु मारुतीला शेंदूर लावण्यांत येत असला तरी रामाला तो कधीच लावीत नाहीत. दैत्य, राक्षस ह्यांनी मारण्याकरिता अवतार घेणाऱ्या देवी शेंदराने माखलेल्या असतात. गणपतीनेहि राक्षसांचा वध केला आहे म्हणून त्यास शेंदूर लावण्यांत येत असावा. कृष्णाने पुष्कळ असुरांचा वध केला, तथापि कृष्णाची मूर्ति बिनशेंदराची असते. ह्याचें कारण संस्कृतिभेदांत असावें.

धोतर, उपरणें, पागोटें हा विष्णूचा पोषाख अन्य देवतांच्या नशिबीं नसतो. शंकरावर पोषाख चढविण्याची रीत पडली आहे, पण ती शंकराचें मूळचें स्वरूप विसरल्यामुळे पडली आहे. पोषाखांत जोडा क्वचित् आढळतो. तथापि आडिवऱ्याच्या देवीला चांभाराकडून दर वर्षी पायतणांचा जोड घेण्याचा हक्क आहे. जोडा देवाला व पायतण देवीला असा भेद केला गेला होता कीं काय निश्चयपूर्वक सांगतां येत नाही. कित्येक ठिकाणीं महालक्ष्मीला जोडे वाहण्याची चाल आढळते.

अंजनेश्वर— "हा देव जानशींतील मूळचा असून सांप्रत मिटगांवणें गांवांत गणला जातो. स्वयंभू स्थान आहे. तें वहाळींत असून देवालय

बांधतेवेळीं वहाळी दूर परतलेली आहे. मंदिराचें बरेंच काम एका संकट-मुक्त यवनानें श्रीसेवेकरतां केलें आहे. मंदिराच्या सभामंडपाच्या पायांत एक शिला त्या यवनाचें स्मारक म्हणून घातलेली आहे. श्रीच्या लिंगांत (जांब्या दगडाची शिला) गंगा नित्य सूक्ष्म रूपानें असते." (नारायण गोविंदभट गोरे)

आदित्यनाथ— "आडिवऱ्याजवळ कशेळी गांवीं आदित्यनाथाचें देऊळ आहे. त्यास प्रतापादित्य असेंहि म्हणतात. हें सूर्याचें स्थान आहे. दुसरें देऊळ काळधें, ता. रत्नागिरी, येथें आहे तेंहि सूर्याचें आहे. ह्या देवाला विशेषतः कऱ्हाडे भजतात. परंतु गावडेगुळें, ता. रत्नागिरी, येथें आदित्य-नाथाचें देऊळ आहे तें शंकराचें समजलें जातें. ह्या ठिकाणीं विशेषतः चित्पावनांची वस्ती आहे." (महादेव विठ्ठल लिमये, राजापूर).

श्री. र. कृ. पाटणकर लिहितात— "आदित्यनाथ मला विदित नाही, पण आदिनाथ ह्या नांवाची विष्णुमूर्ति खारेपाटणापाशीं वायंगणी गांवीं आहे."

आदिष्टि— शिरगांव ता. रत्नागिरी, येथे अधिष्ठात्रीचें देऊळ सड्यावर आहे. मूर्ति काळ्या दगडाची असून चतुर्भुज आहे. हातांत तरवार, ढाल, त्रिशूळ व कमळ असावें असें वाटतें. देवीला तेलाचें माखण घालतात. शेंदूर लावलेला नाही. आदिष्टी, कुमारी, आकाशी ह्या देवींचा निर्देश देवीभागवतांत केला आहे.

कनकादित्य— कशेळीस सूर्याचें देऊळ आहे. ह्या देवाचें नांव कन-कादित्य. ह्या देवाविषयीं आख्यायिका आहे ती अशी— एकदा एका व्यापा-ऱ्याचें गलबत माल भरण्याकरता सुरतेस गेलें. तेथे त्या व्यापाऱ्याला शाळीग्राम शीलेची मूर्ति एका देवालयांत आढळली. ती संग्राह्य वाटल्या-वरून प्रयत्नाने तेथून उचलून त्याने ती आपल्या नौकेंत घातली आणि तो व्यापारी स्वदेशीं येण्यास निघाला. कशेळी गांवासमोर जहाज येतांच तें

एकाएकीं चालत नाहीसें झालें. प्रयत्नांची पराकाष्ठा झाली पण व्यर्थ. अखेरीस कशेळी गांवींच कड्याच्या कपारींत त्याने ती मूर्ति नेऊन ठेविली व परत गलबतावर आला. गलबत पूर्ववत् चालूं लागलें. इकडे राखणे वगैरे मंडळी येऊन पाहतात तों नवीन देव त्यांस आढळला. नंतर सर्व गांवकऱ्यांच्या मताने त्या मूर्तीची स्थापना करण्याचें ठरून त्याप्रमाणे झालें. ह्यावरून सूर्याची मूर्ति बाहेरून आल्याची ही दंतकथा आहे हें उघड आहे. मूर्ति दोन अडीच हात उंचीची आहे. 'सप्ताश्वरथमारूढो द्विभुजः स्यात्सदा रविः' अशा स्वरुपाची ही मूर्ति आहे असें कळतें. कनका नांवाच्या वेश्येने हें देऊळ बांधिलें अशीहि दुसरी आख्यायिका आहे.[1]

करंजाई— करंज्याच्या झाडांची देवता. ही वृक्षदेवता होय.

कालभैरव— हा पिशाचांचा आणि मांत्रिकांचा अधिपति असून तो प्रसंगीं शिवाच्या आज्ञेने काशी येथे राहतो. कालभैरवाची कोणत्याहि शुभ प्रसंगीं पूजा करीत नाहींत.[2] शतघ्न राक्षसाला मारण्याकरता शंकराने कालभैरवाचा अवतार घेतला असें हरिरहेश्वर महात्म्यांत आहे. कालभैरवाची पूजा नर्कचतुर्दशीच्या दिवशीं नागव्याने करण्याची वहिवाट कित्येक ठिकाणीं आहे.

कालिका—कालकाई– ही देवी असली तरी तिचे चाकर भुतें असतात.

खेम— हा इजिप्तच्या लोकांचा देव होता.[3]

गांगो—"हा एक दगड पूजलेला असतो. ह्याची मूर्ति माझ्या पाहण्यांत नाहीं. गांगोचें स्थळ "घाडी" म्हटलेले मराठे (कुळवाडी) यांच्याकडे असतें. ह्या देवाचा बळी घाडीच कापतो. माझ्या मतें घाडी व गांगो हे

१ पाटणकर.

२ लौकिक दंतकथा पृ.१४८-१४९.

३ श्री. बखले ह्यांचा गुदमैथुनावरील अप्रसिद्ध निबंध.

मूळचे कानडी मुलखांतील होत. हें दैवत (!) ब्राह्मणी नव्हे खास. देव आकारी, निराकारी, निनो, दिर्बा ह्या देवता ब्राह्मणी नव्हेत. त्या शूद्रांच्या असल्या पाहिजेत.''

घारंभट नारायण— हें देऊळ गुहागरास आहे. घारंभट हें देवस्थान स्थापन करणाराचें नांव. मनुष्य देवाचें नांव स्वतः घेतो तसें आपलें नांव देवाला देतो. पुष्कळ शिवलिंगांना स्थापकाचीं नांवें मिळालीं आहेत.

घोडमुखी— घोड्याचें तोंड असलेली देवी.

जांबरादेव— ह्या देवाला नैवेद्य दाखविण्याची चाल कांही परांजपे घराण्यांत आहे. हा देव कोण तें समजत नाही.

जैन— ''जैन आणि ब्राह्मण अशीं दोन स्थळें देवस्थानव्यवस्थेंत आहेत. जैन स्थळ चित्पावन ब्राह्मणांच्या वसाहतींत आहे किंवा नाही तें समजत नाही. राजापूरपासून खालच्या भागांत बहुतेक तें आढळेल. वस्तुतः जैनांचा पाषाण किंवा प्रतीक हें जैन धर्माचें निदर्शक नाही. जैन म्हटलेल्या स्थळांत शिवलिंग असतें व त्याच पाषाणावर नंदी, गणपति यांच्या मूर्ति कोरलेल्या असतात. शिवाय एक किंवा अधिक पुरुषांच्या मूर्ति आसनमांडी घालून ध्यानस्त बसलेल्या अशा असतात. कित्येक शंकराच्या (लिंगाच्या) देवळांत मुख्य शिवलिंगाच्या जवळपास आणखी एक लिंग असतें. त्याला जैन असें नांव असतें. हें लिंग असून त्याला जैन हें नांव चुकीनें देण्यांत आलें आहे. परंतु त्या चुकींत जुना इतिहास आहे. जैन म्हटलेलें हें स्थळ लिंगायतपंथीयांचें निदर्शक आहे. कित्येक देवळांत गुरव पुजारी असतात. त्यांत कांही मराठे व बरेचसे लिंगायत असतात. लिंगायत गुरवांस इतर लोक जैन म्हणतात व तेहि आपणांस जैन समजतात. जैनांचे बहुसंख्य लोक लिंगायत बनले. ह्यामुळे तें स्थळ जैन म्हटलें गेलें इतकेंच. जैन म्हणजे शिवलिंग असें कधीच असणें शक्य नाही.''

जाखमाता— पिरंदवणें येथे गांवाशेजारीं उघड्यावर आकार नसलेला असा एक दगड आहे. त्याला जाखमाता म्हणतात. ही देवी टोळ नांवाच्या एका कुणब्याने स्थापन केली असें सांगतात. हिचा पुजारी कुणबी आहे. पूजा रोजची आहे. पौष महिन्यांत मंगळवारीं घरोघरीं खिचडीचा नैवेद्य जाखमातेला दाखविण्याचा प्रघात आहे. कांही साळ्यांकडे जाखाय देवीची उंडी घराबाहेर ठेवतात.

जोगेश्वरी— पिरंदवण्याची जोगेश्वरीची मूर्ति संगमरवरी दगडाची असून चतुर्भुज आहे. दोन हातांत तरवारी व एका हातांत अंकुश आहे. पुजारी लिंगायत गुरव आहे. परंतु आंब्याच्या जोगाईची ही प्रतिमा साळ्यांनी नवीन करवून स्थापन केली आहे.

आमच्या शेतांत अखंड वाहणारें धरणाचें पाणी आहे. त्या धरणाची देवता धरणंकरी असावी. (कृष्णाजी केशव कोलटकर-सातारा)

नवलाई-पावणाई— रत्नागिरीजवळच्या शिरगांवास एका दगडावर दोन बारीक दगड ठेवलेले गांवाबाहेरील पण गांवठणांतील उघड्या जागेत आढळले. ह्यांचीं नांवें गुरवाने नवलाई व पावणाई म्हणून सांगितलीं. हे बिनआकाराचे खड्यासारखे दगड होते. नवलाई व पावणाई हीं स्त्री-भूतांचीं नांवें आहेत अशी समजूत आहे. पाण्यांत बुडून मेलेल्या स्त्रियां भुतें होतात. परंतु त्यांस वरील नांवेंच लावण्यांत कां आलीं हें गूढ उकलत नाही. पावणा म्हणजे खलाशी. खलाशाची बायको ती पावणाई असें. म्हणतां येईल. राजापूरचे दिनकर गोविंद गाडगीळ ह्यांच्याकडे नागपंचमीच्या दिवशीं पावणाईला नारळ देऊन तिची प्रार्थना करण्याची वहिवाट आहे. नागपंचमी हा नागांचा सण. नाग लोक पाताळांत राहत आणि पाताळ म्हणजे कोंकण. परंतु कोळ्यांचें देवक नाग असल्याचें माहीत नाही. मात्र कोळी सर्प ह्या नांवाच्या जातीचा *उल्लेख भारतांत आहे.

नवलाई व पावणाई ह्यांचे दोन दगड एकत्र असे तिसऱ्या दगडावर ठेवलेले आहेत ह्यावरून ह्या दोन सवती तर नसतील ! पावलाई व पावणाई ह्यांत भेद नसावा. परंतु वाड्यास पावणाईची मूर्ति दगडाची आहे. तिला दोन हात असून तिचें स्वतंत्र देऊळ आहे. पुजारी सुतार आहे. नवला म्हणजे नवदुर्गा समजतात.[१] परंतु त्याविषयीं शंका येते. नवलाई-पावणाईला एकाच पानावर दोन मुदा घालून नैवेद्य दाखविण्याची चाल कल्यांचे लिमये सांगतात.

निनादेवी—कामादेवी—राजापुरास निनादेवी व कामादेवी अशीं ग्रामदेवतांचीं मंदिरें आहेत. निना हा नित्याचा व कामा हा कामदा-काम्या ह्याचा अपभ्रंश आहे. त्या मंदिराच्या पुढे दोन चव्हाटे आहेत. एका चव्हाट्यांत कामादेवीची होळी पुरतात. शिमग्यांत तेथे तमाशे होतात. सांप्रतची कामादेवी कोणी राजस्त्री सती गेली तिचें स्मृतिचिन्ह आहे असेंहि कित्येक म्हणतात. दोनहि देवींची पूजा होते.

(र. कृ. पाटणकर)

निराकारी— "इकडच्या पट्ट्यांत (राजापूरच्या आसपास) अनेक गांवीं निराकारीचीं स्थानें आहेत. त्याभोवतीं मोठ्या वनराजी (राई) असतात. त्यांचें कवळ कोणीं तोडावयाचे नाहीत. निराकारी म्हणजे प्रतीकावांचून कल्पिलेली देवता. वार्षिक प्रार्थना, नैवेद्य (सजीव किंवा निर्जीव जशी भक्तांची भावना चालत आली असेल तसा) इत्यादि कारुकें असतात."

"येथें (राजापुरास) भटाळीचे श्रीमारुतीचे देवालयाचे पापडीचे वायव्य-कोपऱ्यावर एक आंब्याचें झाड आहे. तेथें रडवा देव (निराकार) आहे. मुलें फार रडूं लागलीं म्हणजे त्याला कोंब्याचे कांबीचा लहानसा पाळणा देण्याचा नवस बोलतात. नवसास देवी पावली म्हणजे (वेंदल) पाळणा

१ गोखले घ. इ. १३८.

तेथें झाडास बांधतात." (र. कृ. पाटणकर)

पांढरी देवी— शेतांची देवता. ही गांवची प्रमुख देवता होय. दर पौर्णिमेच्या दिवशीं हिला नारळ देतात व आवणीलावणीच्या वेळीं बकरें, कोंबडे देण्याची वहिवाट आहे. गुरव किंवा मराठी कुणबी ह्या देवीचा पुजारी असतो.

पावणाई— वाडें येथील पावणाईची मूर्ति असून ती द्विभुजा आहे. तिचा पुजारी सुतार आहे. देऊळहि त्याच्याच मालकीचें आहे.

ब्राह्मणदेव—"ह्याची पूजा ब्राह्मणाकडून होत असते. कित्येक गांवांत ब्राह्मणदेवतेची मूर्ति असते तर अन्यत्र नुसता पाषाण पूजलेला असतो. मूर्तीच्या डोक्यावर मुगूट, अंगावर अलंकार, कानांत कुंडलें, गळयांत हार, एका हातांत रुद्राक्षांची माळ, दुसऱ्या हातांत कमंडलु व पायांत खडावा अशा स्वरुपाची ती मूर्ति असते. गळयांत यज्ञोपवीत असतें. माझ्या संग्रहांत साडेतीनशें वर्षांचे–कदाचित् पूर्वीचे अस्सल कागद आहेत. त्यांतील कांहीं कागद ग्रामपंचायतीचे असावे. ह्या कागदांपैकीं कित्येकांच्या श्रीकाराच्या डाव्या बाजूकडील कोनाच्या भागांत आडवी ओळ लिहिलेली असते, तींत त्या गांवच्या अधिष्ठात्री देवतेचें व ब्राह्मण यांचीं नांवें असतात. देवतेच्या पूर्वी ब्राह्मणाचें नांव असतें हा त्यांत विशेष आहे; जसें 'स्वस्तिश्री ब्राह्मण वा तारा देवी'.

ब्राह्मण देवाची एक मूर्ति द्विभुज असून तिच्या एका हातांत झारी व दुसऱ्या हातांत कमळ किंवा फूल आहे."[1]

अणसुऱ्याचा ब्राह्मणदेव लक्ष्मीनारायणाच्या आवारांत एका पूर्वाभिमुखी चिरेबंदी देवळांत आहे. हा एक २० इंच परिघाचा व ७ इंच उंचीचा काळा दगड आहे. वरचा भाग सपाट आहे. पुजारी ब्राह्मणच असून ब्राह्मणाखेरीज कोणी पूजा करीत नाही. समोर सत्य (पादुका) आहेत.

१ बांबर्डेकर.

त्याचे वरील कौल प्रसाद मानकरी घेतात. देवाची जेवणावळ ज्येष्ठांत-श्रावणांत घालण्याचा प्रघात होता. मार्गशीर्षमासीं गिरेश्वराची जत्रा भरते तेव्हा ब्राह्मणदेवास वस्त्रें देतात. हा देव सोवळा आहे. देवापुढील नैवेद्य, प्रसाद, वस्त्रें, खिरापत सर्व पुजाऱ्यास मिळतें. (नारायणराव देसाई)

ह्याच्या उलट पडेलचे श्री. विष्णु विठ्ठल मराठे काय म्हणतात पाहा:—

ब्रह्मनदेव (ब्राह्मणदेव) रानांत अर्ध्या डोंगरांत माळावर ५०।६० हात लांबीरुंदीच्या जांभ्या दगडांच्या वास्तूंत आहे. यांत मध्यें जवळ जवळ निम्मे सखल दोन हात खळगा असून त्यांत एक चौक उंच १०।११ ब्राह्मण बसतील एवढा जांभे शिलांचा असून त्यांत १॥ हात वर्तुळ अशी शाळुंका आहे, लिंग नारळाएवढें आहे. देवळाच्या आसपास एक कोसांत वस्ती नाहीं. जवळ वहाळ आहे. दिवाळीनंतर ब्रह्मन्देवापाशीं शेतांतील भाताचें उडवें ठेविलेलें झोडून घेऊन मग तेथें वार्षिक समाराधना घालतात.

तसेंच वाळपई प्रांतांतील नगर गांवांत (गोवा मुलूख) ब्रह्मनदेवाचें देऊळ आहे. ह्या देवाला तेथील चित्पावन भजतात. वाळपई प्रांतांत चित्पावनांचीच वस्ती प्रामुख्याने आहे.[1]

ब्रह्मदेव, ब्रह्मणदेव, ब्राह्मणदेव, ब्रह्मणदेव — गुजराथी कोंकण्यांचा सुद्धा हा देव आहे. तेथे साम्रीच्या झाडाखाली शेंदूर लावलेला एक दगड, शेजारीं मातीचा घोडा आणि एक निशाण असें त्याचें वर्णन केलेलें आढळतें. ही देवता ब्राह्मणांची नाहीं. ह्याचा पुजारी ब्राह्मण असतो परंतु नैवेद्य गुरवाला देतात, ब्राह्मण खात नाही. तूं अपूज्य राहशील, तुझी पूजा कोणीहि करणार नाहीं, असा ब्रह्मदेवाला सावित्रीने शाप दिल्याची कथा स्कंदपुराणांत आहे. तथापि ब्रह्मदेवाचें देऊळ दक्षिण कोंकणांत आहे. जामसंडें (देवगड) येथे एक लिंग आहे

१ मांद्रयाचे केळकर यांचें खासगी पत्र.

त्याला ब्रह्मदेव म्हणतात.

भराडी—"ह्या देवीचीं नांवें निरनिराळीं असलेलीं आढळतात, उदा.– भद्रकाली, भावई, भराडी इ. विष्णुशक्तीच्या देवतेला हीं नांवें आहेत. भगवती हें तिचेंच दुसरें नांव. ही देवी पद्मासनस्थ बसलेली अशी बहुतकरून असते. डोकीवर मुगूट, कानांत कुंडलें, गळ्यांत माळ व दोनहि हातांत कमल धरलेलें (कमळाची कळी) असें हिचें स्वरूप दाखविलेलें असतें. तिच्या दोन्ही बाजूंस स्त्रीपरिचारिकांच्या लहान मूर्ति असतात. त्यांच्या हातांत चौऱ्या असतात. देवीच्या दोन बाजूंना दोन हत्ती (माहुतासहित) असून ते आपल्या तोंडांत पाण्यानें भरलेले कलश धरतात. ह्या घडणीवरून ते देवीला स्नान घालीत आहेत असा देखावा दिसून येतो. मूर्तीच्या खालीं एक दालन कोरलेलें असतें. त्यांत सुमारें १५ पुरुषांच्या आकृति असून कांहीं ढोल वाजवीत असतात, कांहीं नुसते पाहात उभे असतात. हें सर्व सामान्य वर्णन झालें. कित्येक मूर्तीच्या वर्णनांत थोडा फरक आढळून येईल. परंतु ही विष्णूची शक्ति असेंच मानण्यांत येतें. माझ्या घराण्याची कुलस्वामिनी भद्रकाली आहे."

भराडी व भद्रकाली एकच असें रा. ब. बांबर्डेकर म्हणतात. परंतु आम्हीं पूर्वी दिलेल्या माहितीप्रमाणे भराडी ही हलक्या दर्जाची देवता असली पाहिजे असें वाटतें.

तथापि शिरगांव येथे शिमग्यांत श्रीमहारुद्र सोमेश्वराची पालखी निघते तिच्या दोन्ही बाजूंना श्रीआदिष्टी व श्रीभराडीण ह्या देवी असतात असें शिरगांवच्या श्री. विष्णु गणेश आपटे यांच्या लिखाणावरून समजतें. त्यांच्या घरीं आदिष्टी व भराडीण ह्यांची श्रावणमासांत खणानारळांनी ओंटी भरावयाची असते. ह्यावरून उपरोक्त देवता अस्पृश्य नसाव्या असें म्हटलें पाहिजे. शिरगांवची भराडीण म्हणजे नुसता उभा काळा दगड. तो

आदिष्टीच्या उजव्या बाजूस उघड्यावर आहे. पुजारी शाखाहारी लिंगायत गुरव आहे.

अणसुरे येथे भराडीण देवतेचें देऊळ आहे. तेथील वर्णन श्री.नारायण-राव देसाई करतात तें असें:—

"हें देऊळ अर्धें चिरेबंदी असून अर्धें उघडें आहे. म्हणजे अर्ध्या भागासच भिंती आहेत. देवीची पिंडी[1] तीन फूट परिघाची असून उंची एक फूट आहे. वरतीं थोडी निमूळती असून सपाट आहे. पिंडी काळे दगडाची आहे. हिचेजवळ लहान आकाराची पिंडी असून ती दीड फूटांवर दोन इंच उंचीची लहान आहे. देऊळ अणसुऱ्याचे पूर्वेस दोन मैल लांबी-वर भराडें वाडीजवळ आहे. ह्या वाडींत कुणबी लोकांची वस्ती आहे. देवीचे पुजारी गावडे (कुणब्यांची जात) आहेत. ते कौल, प्रसाद वगैरे लावतात. देवळांत हिंसा होत नाहीं. नारळ ठेवतात. दारू, माडी पिऊन कोणीहि जात नाहीं. नैवेद्य श्रावणांत मार्गशीर्षांत शुद्ध प्रतीपदेस घरींच घालतात ते गावडे घेऊन जातात. ही देवी शुद्ध आहे."

भराडी–भराडीण हा भरतदुर्गेचा अपभ्रंश आहे असें कित्येक समजतात.[2]

कुवेशीस भरतदुर्गेच्या मंदिरांत देवीचें असोल्या नारळाएवढें लिंग प्रतीक आहे. ह्या लिंगाभोंवतीं लहानमोठीं दुसरीं २७ लिंगें आहेत.[3]

भराडीण— भराड्याची बायको. भराडा हा एक गोसाव्यांचा पंथ आहे. भराडी देवापुढे नाचत वाजवीत भजन करतो. तथापि मिरजेचे भट यांच्या लिहिण्यावरून भराडी, गांवराख्या व मांग हे अस्पृश्य देव आहेत. त्यांचे नैवेद्य अस्पृश्यांना देतात. सोलापूरच्या श्री. के. भा. लिमयांकडेहि ह्या देवतांचे नैवेद्य घरांत घेत नाहीत; अस्पृश्यांना देतात.

---

१ नुसता उभा दगड. २ गोखले घराण्याचा इतिहास. ३ पाटणकर.

भावकाई— ही देवी म्हणजे एक अर्धवर्तुळाकृति काळ्या दगडाचा चिरा आहे. पाठीमागची बाजू सपाट असून तळास १३ इंच, वरतीं ६ इंच आहे. उंची २३ इंच आहे. पुजारी गावडे आहेत. देवीपुढे कोंबडें बकरें मारतात. श्रावण–मार्गशीर्ष महिन्यांत शुद्ध प्रतिपदेस घरीं नैवेद्य दाखवितात तो गावडे पुजारी घेऊन जातात. शूद्राचें स्मशान देवीच्या शेजारीं होतें. ही देवी शूद्र अथवा ओंवळी समजतात. ब्राह्मण पूजा करीत नाहीत. हें देऊळ गांवाच्या दक्षिणेस एक फर्लांगावर आहे. शेजारीं गांवची होळी होते. शिरगांवीं मांगूबाईचा दगड पाहण्यांत आला. मुंग्या, गोचडया वगैरेचा उपद्रव झाल्यास धार म्हणजे दारू व घुगऱ्या ह्यांचा ह्या देवीला नवस करतात. कधी कधी बकरें देण्याचा नवसहि करण्यांत येतो. ह्या देवीच्या काळ्या दगडाला गंध लावलेलें आढळलें. गांवाच्या बाहेर एका राईत उघडयावर ही देवी आहे.

मुसळादेवी— हत्यारांची पूजा करतात. मुसळ हें यादवांचें युद्धाचें शस्त्र होतें. त्यावरून मुसळादेवी हें नांव पडलें असावें. मुसळ पवित्र मानतात. त्याला पाय लावीत नाहीत. हा तर्क बरोबर असल्यास उत्तरे-कडून कोंकणांत लोक आले असें म्हणावें लागेल.

रवळनाथ— वेळंदूर येथील मूर्ति दगडाची असून घोड्यावर आहे आणि ती एकमुखी आहे. ह्यावरून ती शंकराची नाही. वाडें पडेल पैकी वाडेगांवीं रवळनाथास क्षेत्रपाळ म्हणतात. परंतु रवळनाथाला रवि-वारीं कित्येक नैवेद्य दाखवितात. ह्यावरून रवळनाथ हें सूर्याचें नांव असावें असा संशय येतो. परंतु रवळनाथ म्हणजे परमेश्वराच्या तृतीय-प्रकृतीचें प्रतीक आहे. ही देवीची मूर्ति आहे असें समजातात असें आडि-वऱ्याचे श्री. चिंतामण दीक्षित लिहितात. सामान्य समजूत अशी दिसते की, रवळनाथ हें शंकराचेंच स्वरूप आहे. घाडी, रावळ, गुरव किंवा सुतार

ह्या जातीचे लोक रवळनाथाचे पुजारी आहेत. गोळपचे श्री. भास्कर श्रीपाद गोगटे लिहितात— येथील रवळनाथ हा स्वयंभू आहे. त्याच्या पिंडीचीं छकलें झालेलीं आहेत. दृष्टान्तावरून जागा खणतांना छकलें झालीं. ह्या जागेवर पूर्वी चिवारीचें बेट होतें. तेथें गाय नेहमीं दुधाचा पान्हा सोडी.

देवगड तालुक्यांत जामसंडे गांवीं वार्षिक वाकोवाचीची समाराधना होते. या समाराधनेकरता भांडींकुंडीं, चूलचौका, लाकूडफांटा इत्यादि सर्व सामग्री सिद्ध करण्यांत येते. मात्र स्वयंपाकाचें साहित्य आणावयाचें नसतें. गांवकरी, अधिकारी वगैरे सर्व मंडळी येऊन हात जोडून प्रार्थना करण्यांत येते; गाऱ्हाणें घालण्यांत येतें. त्यांत 'जयदेवा महाराज वर्षाप्रमाणे ही वाकोवाचीची समाराधना घातली आहे; ती मान्य करून घे; आणि सर्वांची चूक माफ करून सर्वांचें बरें कर महाराज' इत्यादि गाऱ्हाणें झाल्यावर सामानसुमान जागोजागीं पोचविण्यांत येतें. (र. कृ. पाटणकर)

वेगळी—निराकारीप्रमाणे वेगळीचेंहि देऊळ नाही असें समजतें. वाडे पडेलकडे वेगळीचें जंगलच आहे. ह्या झाडाखाली दगड आहेत हें मात्र खरें. वेगळीच्या जंगलांत पाणी असतेंच असें नाही; निराकारीच्या असतें. निराकारी व वेगळी ह्यांच्याकडे विटाळश्या फिरकत नाहीत. वेगळीचा नैवेद्य तिच्या दिशेकडे रस्त्यावर टाकतात.

व्याघ्रांबरी—ही गुहागरची ग्रामदेवता. हिचें देवालय आहे. इतर गांवांप्रमाणे गुहागरीं ग्रामदेवतेचा उत्सव फाल्गुनांत न होतां चैत्र महिन्यांत होतो. त्या वेळीं देवतेची रौप्यप्रतिमा पालखींत घालून सवाद्य स्वारी निघते. मानकरी लोकांकडील पूजा प्रथम घेतात. सर्व पूजा होऊन पालखी देऊन पालखी देवळांत परत येईपर्यंत पावसाला सुरवात होते. भंडारी, कुणबी वगैरेंचे वाड्यांत पालखीचा मुक्काम असतांना ते लोक पालखी नाचवून व तमाशे करून उत्सव करतात.

खाली दिलेली माहिती रा. ब. बांवडेकर यांनी लिहून कळविली आहे:—

सांतेरी—डोकीवर मुगूट, गळ्यांत माळ अशी मूर्ति चतुर्भुज असते. एका हातांत त्रिशूळ, एकांत तरवार, तिसऱ्या हातांत ढाल आणि चौथ्या हातांत फासा (फाश्यासारखे कांहीं). महीष नांवाच्या दैत्याला ती पायां-खालीं तुडवीत आहे असें दाखवलेलें असतें. सांतेरीला कोठें कोठें सांतेर आणि सारेबाप असेंहि म्हणतात.

ह्या देवीचीं देवालयें प्रत्येक गांवीं असतात. तिला कित्येक ठिकाणीं "माडली" असेंहि म्हणतात. कित्येक ठिकाणीं हिला आठ हात असलेले दिसतात, पण ध्यान तेंच असतें. आठांपैकी डावीकडील एका हातानें महिषमुखी असुराची जीभ ती ओढीत असते व उजवीकडील एका हातांतील त्रिशुळानें त्याला भोसकीत असते. ह्या देवीच्या उद्भवाची पौरा-णिक कथा सुरासुरांच्या युद्धप्रसंगीं वर्णन केलेली सर्वविश्रुत आहे. सर्प फोंडसें वगैरे विषारी प्राण्यांचा दंश झाल्यास सांतेरीचें न्हावण (तीर्थ) दिल्याने उतार पडतो व कुष्ठ रोगहि बरा होतो. वेतोडें नांवाचे गांवीं सांतेरीचें एक देवालय आहे. देशाकडीलहि रोगी लोक त्या ठिकाणीं सेवेस येऊन राहत असतात.

सुकाई— पिरंदवणें येथे सुकाई देवीचा नुसता दगड आहे. पुजारी गुरव आहे. पिरंदवणें, सड्ये व जून ह्या तीन गांवांची ही ग्रामदेवता आहे.

सोमेश्वर— ह्या देवाला गूळ व घट्ट तूप ह्यांचा नैवेद्य दाखविण्याची चाल सोलापूरच्या लिमयांकडे आहे.

क्षेत्रपाळ— हा प्रत्येक गांवीं बहुधा असतो. गांवाचें संरक्षण करणें हें त्याचें काम असावें. जोगीण, डाकीण ह्यांच्या वर्गात क्षेत्रपाळ मोडतो. ब्रह्मवैवर्तपुराणांत ह्याची उत्पत्ति कृष्णाच्या नाकापासून झाली असें म्हटलें आहे. (डाकिन्यश्चैव योगिन्यः क्षेत्रपालाः सहस्रशः आविर्बभूव

कृष्णस्य नासिकाविवरोदरात्[1]). वेड्या मुलीचें लग्न क्षेत्रपाळाशीं लावलें असतां वेड जातें, अशी गुजराथेंत समजूत आहे. गांवरख्या व क्षेत्रपाळ ह्यांच्यांतील भिन्नता सांगतां येत नाही. ह्याच वर्गांतील राखणदार नांवाचा दुसरा एक देव आहे. गांवरख्याजवळ गांवांतले लोक जेवावयास जाण्याचा प्रघात असे; उदा. '।· खरेदी दहीं—गांवरख्याजवळ जेवण्यास गांवकरी गेले त्याची किंमत.'[2] शिरगांवचा गांवरख्या नुसता काळा दगड उघड्यावर आहे. पुजारी गुरव आहे. परंतु गुहागरास नारायणाच्या देवळांत एक लिंग आहे. त्याचें नांव क्षेत्रपाल आहे. हें शंकराचें देवालय फार जुनें आहे असें म्हणतात.

मिरजेच्या महाबळांच्या नैवेद्यांची यादी येणेंप्रमाणे:—

१ कालभैरव[3]—वडे ५
२ उग्याची माउली—वडे ५
३ सत्या—वडे ५ ; मुदा ५
४ खळनाथ ओटवण्याचा—वडे ५
५ खळनाथ सातरड्याचा—,, ५
६ रामलिंग —,, ५
७ खामदा —,, २
८ मूळवेर —,, २
९ पूर्वज —,, २
१० ब्राह्मण —,, २ (ब्राह्मणास देणें)
११ अंबाबाई
१२ संगमेश्वर
१३ आमुच्याभरण

---

१ अ.५ श्लो.७५. २ वेळणेश्वरच्या कुळकर्ण्यांकडील स.१८२७ चे कागद.
३ कालभैरवाचा नैवेद्य घरीं घेण्याचा; बाकीचे देण्याचे.

१४ श्री गणपति

१५ पात्र पुजेचे

केशवराज—आंजर्ल्यापासून ६।७ मैलांवर डोंगरांत केशवराजाचें देऊळ आहे. त्याचा पुजारी जवळ ब्राह्मण आहे. देऊळ तुरवडें गांवाच्या हद्दींत आहे. तुरवड्यास चित्पावनांची वस्ती नाही व नव्हती.

आसूदला केशवराजाचें दुसरें एक देउळ आहे.

विष्णु व तत्सदृश देव

लक्ष्मीकांत–ढोकंबळें

लक्ष्मीकेशव–कर्लें; कोळीसरें; चिखलगांव; बिवली; बसणी; मिरजाळें

श्रीनारायण–अडूर; मुरुगवाडा (नेवरें[1]); कुर्धें

नारायण–

लक्ष्मीनारायण–हेदवी; आगरगुळें; आंजर्लें–करजगांव; केळशी; केळ्यें; श्रीवर्धन; वरेळ; पडेल; दाभोळ; मालदोली; बिवली

लक्ष्मीनृसिंह–संगमेश्वर

श्रीनृसिंह–अडूर

महाविष्णु–कुर्धें

परशुराम–परशुराम

भार्गवराम–गोठणें

महालक्ष्मी–कोतवडें

आदित्य–कोतवडें

आदित्यनारायण–नेवरें; आरवली (संगमेश्वर)

शिवलिंगें

अंजनेश्वर–मिटगांवणें; दर्ळें

अंजनीवटेश्वर

अमृतेश्वर

आदित्यनाथ–आगरगुळें; आजगांव; नेवरें; मुरुड; सावडें; कुर्धें;

आदित्येश्वर[2]–वरवडें

१ वऱ्यांनी बांधलेलें.

२ मासाभिषेकाकरिता रुपये तीनची पुरातन सनद (महादेव भार्गव जोशी).

आमणेश्वर[1]—कळंबुशी
उद्दालकेश्वर—अंजनवेल
ओंकारेश्वर—मालगुंड
कमळेश्वर
करहाटेश्वर
कामेश्वर—वसणी
कनकेश्वर
कुणकेश्वर
कुंभेश्वर—संगमेश्वर; सारंग
कुसुमेश्वर—कोतवडे
कृष्णेश्वर
केदारेश्वर
कोळेश्वर—कोळथरें
गंगेश्वर
गांगेश्वर—नारिंगरें
गिरेश्वर—अणसुरें
गोवर्धनेश्वर—गोठणें
गौतमेश्वर—दाभोळी
चवंडेश्वर
जानेश्वर—करजगांव
टाळकेश्वर
थानेश्वर—शिवर्णे; मुटाट
दाल्भ्येश्वर
दुलभेश्वर
नगरेश्वर
नर्मदेश्वर—अणसुरें
नागेश्वर
नागलेश्वर—मुरूड
पाताळेश्वर
बल्लाळेश्वर
बांदेश्वर
बापेश्वर
बालेश्वर
बेलेश्वर
बोबडेश्वर
भवानीशंकर
भानेश्वर
भिलेश्वर
महादेश्वर—मुरूड
महेश्वर—गोवळ
रत्नेश्वर
रामेश्वर—नाखरें; आगरगुळें; मालगुंड; कुवेशी; गुहागर; नारिंगरें; मालवण
लिंगेश्वर—इळें (देवगड); साकेडी
वाकेश्वर

१ आमडी झाडांत असलेला देव.

| | |
|---|---|
| वाडेश्वर } गुहागर; मुरुगवाडा<br>व्याडेश्वर } (नेवरें) | ढोकंबळें; उसगांव |
| | अंबाबाई[1]–नारिंगरें |
| वायंगणेश्वर | अयला |
| विमलेश्वर–वाडें; मुर्डी | असरा } धाऊलवल्ली |
| विश्वेश्वर–गावडें अंबेरें; पावस; डोंगर | असलादेवी } |
| वीरभद्रेश्वर–पुरळ; कोचरें | अश्मन् देव |
| वीरेश्वर | आकार ब्राह्मण–आरवली |
| वेतेश्वर | आकारी |
| वेळणेश्वर | आकाशदेवी } पडेल |
| वेळेश्वर–करजगांव | आकाशी } |
| व्याघ्रेश्वर–आसूद | आदिष्टि } भावे अडोम; शिर- |
| शंकरेश्वर | अधिष्टा } गांव; गोठणें |
| शिवेश्वर–वायंगणी | आरास |
| संगमेश्वर | इंगळाई–दाभोळ |
| सत्येश्वर–गोळप | उग्याची माउली–उगें |
| सप्तेश्वर | उमळोबा–आघारी |
| सिद्धेश्वर–निवें बुद्रुक | उसळाई |
| सर्वेश्वर–आंबेरलें | एकवीरा[2]–चिपळूण |
| सोमेश्वर–मालगुंड; शिरगांव; | कडदोबा |
| सोमेश्वर; | कमळजा |
| स्थानेश्वर–दळें | करंजेश्वरी |
| हरिहरेश्वर–गोळप; शीळ; नेवरें– | कळंबादेवी |

* लोकांनी लिहून पाठविलेल्या कागदांवरून खालील यादी तयार केली आहे.

१ परशुरामाची आई रेणुका हिचें दुसरें नांव.

कांगो
कान्हई
कान्होकृष्ण
कामादेवी
कायश्री मानोबा–भिर्ले
कालिका
कालेश्री–श्रीवर्धन
कासा तेली
काळकाई }
काळखाई }
काळभैरव–रत्नागिरी; हिंदळें; गुहा-
गर; चिपळूण; इरेश्वर
काळूबाई
कुमळोबा–आघारी
कुमारी
कुसुमबाई
केडजाई
केळमाई
केळाई
कोलीदेवी–गोळप
खामदा
खेडजाई–खेड
खेमं[1]–करंबवणें; आडखल; पालशेत
गांगो–आरवली (मालवण); गोवळ;
डोंगर; इर्डी; राजापूर–
कोंड्याची तड
गांगोबा
गांगोभराडी
गायकवाड–आघारी
गावडा
गांवढा
गांवरख्या–शिरगांव
गीरवीरा
गुरेरख्या
गोंदोबा–आघारी
घडवसी
घरचा गुरु
घरचा नरसोबा
घाणेकरीण
घारंभट
घोडमुखी
चंडकाई } कोतवडें; चार्पे; गण-
चंडिकी } पति पुळें; दाभोळ;
मालगुंड; नांदिवडें

१ चांगलें पीक यावें व गुराढोरांची वृद्धि व्हावी म्हणून पुजतात.

चव्हाटा
चांगो
चाचवलकरीण–मुरडी
चालकोबा
चालोबा
चेणकाई
चौकर्णी
जरीमरी
जलदेवता
जाखाई, जाखमाता, जाखादेवी, जखुबाई } आंबेरें, परशुराम; पीरंदवणें; संगमेश्वर; गोळप; केळशी, बसणी; वेळंदूर; कोळथरें; गांवखडी; माणगांव (सांवंतवाडी); घाऊलवल्ली
जागेदारी
जानाई–मुरडी
जानोबा
जांभई
जुगादेवी, जोगेश्वरी } गांवडे आंबेरें; पिरंदवणें; निवें बुद्रुक; रत्नागिरी, हरिहरेश्वर; कळंबुशी; गुहागर; कुर्वे-
आडिवरें; गांवखडी
जैनब्राह्मण–आरवली
झोलाई–आसूद; पालगड; वेरळ; पालशेत[1]; वेळणेश्वर
डोंगरदेव
डोंगरादेवी–डोंगर
तोरणेश्वरी
त्रिमुखी–कोळंबें
दाड(ढ)
दारवटकरीण
दिघकरीण
दुमदेव
दुर्गा
देवसखी
धरणंकरीण–नेवरें
धर्णिका
धानया
धानोबा–मुरडी
धामणदेव
धावजी–परशुराम
धावगी, धाऊगा } गोळप

१ पालशेतच्या झोलाईचा पुजारी गुरव आहे.

नरवेल[१]
नळो
नवदुर्गा
नवलाई, नवलादेवी } हेदवी; केळ्यें; कोतवडें; गोवळ; रत्नागिरी; पावस; गोळप; गोठणें; धाऊलवल्ली
नवसरी—वरवडें
नागयाना
नाटी, नाटीश्वरी } जानशी
नाठाई
नांदगांवकरीण
नित्यादेवी
निघडादेवी
निनावी
निनो—डोंगर
निरंकारी—कोचरें
नीलो
न्हावणकरीण—मुरडी
न्हावी
पदूबाई
पद्मावती—गुळधें; आसूद
पाटकरीण
पांढरी देवी—आसूद
पायरदेव
पानबुडी
पावणाई, पावनाय, पावलाई, पाहुणाई, पाहुणजाई } कोतवडें; केळ्यें; रत्नागिरी; त्रिंबक (मालवण); आडिवरें; गोळप; मालवण; राजापूर, कुवेशी
पावसाचा देव
पुरूख—धाऊलवल्ली
पूर्वज
पूर्वपाया
पूर्वादेवी
पेठकरीण
पोवई (पार्वती)—नारिंगरें
फराजिणी
बंकी
बहिरी
बांदेजाई ( बंदीमाता )
बापदेव—दळें
बापूजी देव
बाळसिद्ध

१ नरवेल नांवाचा एक वेल आहे. त्याच्या पानांची चटणी करतात.

ब्रह्मदेव—गोवळ; डोंगर; हिंदळें

ब्राह्मणदेव—अणसुरें, पडेल; राजापूर; गोठणें; शिवणें

ब्राह्मण

भगवती—कुर्धे; नाखरें

भरदुर्गा

भराडी-ण—अणसुरें; आडिवरें, पिरंदवणें; भावेअडोम; शिरगांव; दळें

भाउका, भावकाई, भावई } गुहागर; अणसुरें; पडेल; निवेंडी; वाडें; आरवली; मालवण; नारिंगरें

भानोबा

भाली

भूताय—वेळणेश्वर

भूमका, भूमकरी }

भूमहादेव

मराठी

महादेवो—महादेव

महापुरुष

महामाई

महामाया—करजगांव

मळदेव

मळ्यांतले देव

माखाई

मांग

मांगूबाई[1]—शिरगांव

मानमोडी—गांवखडी

मानाई—वेळंदूर; नेवरें; चापें

मानादेवी—गोळप

मानूबाई[2]—अडिवरें

मामई

मालाई

मुंजा

मुरुकर

मुरुगकर

मुसळादेवी—मुसळपुळें[3]

मुहूर्तादेवी

मूळपुरुष

मूळवेर

मेरवी—मेरवी; कुर्धे

---

१ पुजारी महार.

२ श्रीमहासरस्वतीला मानूबाई म्हणतात असें आडिवऱ्याचे दीक्षित सांगतात.

३ गणपतिपुळें व नेवरें यांमध्यें.

म्हैसासूर कोतवडें; वेरळ (खेड);
रणवीर मालदोली; चिखली;
रवळनाथ—गुळधें; गोळप; वसणी; बामणोली
पडेल; सोमेश्वर; वेळंदूर,
निवेंडी; आडिवरें; नांदि-
वडें; उभादांड (वेंगुर्लें);
आजगांव; आरवली
(मालवण); ओटवणें
रवळाई
राखणदार } वसणी
राखणा
रेडजाई[१]—खेड
लखमराज
लिंगदेव
लुमादेवी
वनदेवी
वरंडावरचा देव
वरदंबिका
वरदान } कळंबुशी; नेवरें; चार्पे;
वर्धान } निवें बुद्रुक
वाकदेवी
वागजाय—गोळप; नरवणें; निवें बुद्रुक
वाघजाई—विवली; कळंबुशी; केळ्यें;

वाढी
वामन व त्याचे सहकारी
विठाई } गुहागर; देवरूख,
विठलादेवी } कुवेशी
विंध्यवासिनी
विश्वन्‌देव
वीर
वीरचंडी
वेगळी देवी
वेताळ—आर्डे; आजगांव
व्याघ्रांबरी
व्यासाबाई
सत्पुरुष—दाभोळ (देवगड)
सत्पुरुष महादेव—
सत्ताबाई—आडिवरें
सातमाई—गुडधें
सातारकर
सातेरी
सायकरीण—मुरडी
सालबाय—वेळणेश्वर; चार्पे

१ दर तीन वर्षांनी चैत्री पूर्णिमेस रेडा बळी देतात.

सालबाकरीण–मुरडी
सावणेकरीण[1]–मुरडी; आंजर्लें
साळथी (शी ?)ची देवी
सीमादेवी–साळदुरें
सुकाई–कापसाळ; पिरंदवणें, मालघर
सोनकाया
सोनसांखळी–कसोप; अडूर
सोमजाई–श्रीवर्धन; करचुंडें (सोमेश्वर)
सोमबा-या
सोळजाई–देवरूख
स्वयंभू[2]
शेडवई
श्रावणेकरीण
क्षेत्रपाळ–गुळधें; अंजनवेल; आसूद; गोळप
इत्यारें
हसळा–गोठणें
हेळादेव

---

१ दारू-अंडयांचा नैवेद्य.

२ लिंग.

# ९ कुलाचार

ह्या सदरांत मुख्यतः कांही विशिष्ट कुलाचार देत आहों. तथापि इतर चालींचाहि समावेश करण्यांत आला आहे.

आंजर्ल्यांचे शित्रे यांच्याकडे वर्षातून एक वेळ कुणबीण सवाशीण सांगून तिची बांगड्या चोळी देऊन पाठवणी करतात. सवाशीण सांगितली असल्यामुळे जेवावयास घालतातच. ही चाल सर्व शित्र्यांकडे नाही. एकाच कुटुंबांत आहे.

काणे व दातार ह्यांच्याकडेहि अशाच तऱ्हेचा रिवाज आहे. मात्र वार्षिक सवाशणी खेरीज कार्यानंतरहि कुणबी सवाशीण जेवूं घालावी लागते.

श्री. गोपाळ नारायण दातार, मिरज, यांच्याकडे माटलादेवीनिमित्त विटाळ गेलेल्या चांगल्या घराण्यांतील सुवासिनीस नवरात्रांत न्हाण व भोजन घालण्याची वहिवाट आहे. ह्याच्या उलट नाशीकचे वामनशास्त्री दातार लिहितातः—"५ पुत्रवती सुवासिनी, ६ वी अस्सल मराठ्याची लग्न झालेली आणि ऋतुस्नात झालेली, ३ ब्राह्मण, १ कुमारिका व १ मुंजा हा कुलधर्म आश्विन शुद्धापासून कार्तिक शुद्धांत केव्हा तरी करतों."

श्री. गदाधर प्रभाकर काकतकर, म्हापसें (गोवें) यांच्याकडे सोन्याचा कोठिंबा अगर विटाळ गेलेल्या सुवासिनी न मिळाल्यास बोडण भरीत नाहीत.

बोडण भरणें तें निरनिराळे लोक निरनिराळ्या प्रसंगीं भरतात. श्री. गणेश पांडुरंग फडके, मिरज, यांच्याकडे नवरात्रांत शेवटल्या दिवशीं बोडण भरतात तर श्री. बाळकृष्ण बळवंत बोडस यांच्या घरीं गाय व्यायली असतां बोडण भरावें लागतें. त्याचप्रमाणे पुणें येथील सान्यांकडे व कर्व्यांकडे मूल जन्मास

आल्यावर बोडण भरण्याचा रिवाज आहे. विशेषतः मुलगा झाल्यास बोडण अवश्य भरलें जातें.

नेन्यांच्या घराण्यांत बोडणाला सवाशीण सांगतात ती पहिल्या न्हाणावर गर्भार राहिलेली व मूल न गेलेली असावी लागते. ह्यावरून बोडण हें प्रजननदेवतेचेंच कार्य असावें असें दिसतें.

"गोमंतकांत वझे नांवाची अनेक कुटुंबें आहेत. त्यांपैकी नानोडें येथे एक घराणें आहे. ह्या घराण्यांत बोडण भरण्याच्या चालीच्या जागीं पतीर म्हणून भरण्याची चाल आहे. ज्या दिवशीं पतीर भरण्याचें असतें त्या दिवशीं गांवांतील जोग्याला बोलावून आणतात. हा जोगी तें पतीर (पात्र) घेऊन येतो. हें भोपळ्याचें अगर तांब्याचें केलेलें असतें. तें रांगोळी घालून ठेवलेल्या पाटावर ठेवतात व त्यांत धान्य अगर शिजलेला भात भरतात. नंतर त्या पात्राची षोडषोपचारांनी पूजा करतात. महानैवेद्य दाखवितात. आंतल्या जिनसांसह तें पतीर जोगी घेऊन जातो. हें कार्य दरवर्षी, विशेषतः श्रावण महिन्यांत करावयाचें असतें." (रामकृष्ण नारायण केळकर, कळंगूट)

नैवेद्य— बेळगांवच्या दांत्यांकडे देवदिवाळीला नैवेद्य दाखवितात त्यांपैकी कांही घरांतील मंडळींनी भक्षण करावयाचे असतात. हे कनकेश्वर, विश्वेश्वर स्वयंभू, महालक्ष्मी या देवतांना दाखविलेले नैवेद्य होत. निरहंकारी, ब्रह्मदेव, निनुदेव, पावसाचा देव, मूळ देव, गांगो देव, जोगेश्वरी ह्यांचा नैवेद्य गरीबाला किंवा गुरवाला द्यावयाचा असतो. घरच्या देवांपैकी हे देव नव्हत हें उघड आहे.

श्री. श्रीकृष्ण धुंडिराज लेले, जळगांव, ह्यांच्याकडील सर्व नैवेद्य व दक्षणा कुळंब्याला देण्याची वहिवाट आहे. त्यांचे नैवेद्य नलो, निलो, गांगो (एका पानावर); महादेव, विश्वेश्वर (एका पानावर); डोंगरादेवी, म्हसोबा, कृष्णाबाई यांपैकी प्रत्येक स्वतंत्र पानावर. म्हसोबाच्या नैवेद्यावर दहीभात

अधिक घालतात.

वेताळ व रवळनाथ यांचे नैवेद्य घारवाडच्या फाटकांकडे बाहेर देऊन योगेश्वरी, विष्णुपंचायतन व गणपति यांचे नैवेद्य घरीं भक्षण करण्याची वहिवाट आहे.

श्री. बा. ना. सहस्रबुद्धे, खरगपूर, यांच्याकडील चाल येणेंप्रमाणे :—

"आमच्या देवता बारा आहेत. ह्यांचीं नांवें आर्यांत गोवून ठेविलीं आहेत. या आर्या घरांत सर्वांनी म्हणण्याचा प्रघात आहे. आर्या—

श्रीगणपती जुगाई मानाई मारुती महालक्ष्मी ।
श्रीवर्धन कुसुमेश्वर जोगेश्वरी वाग्जई नमितों मी ॥
श्रीनंदी घरणंकरि श्रीआदित्यादि देवता माता ।
कुलयशवर्धक रक्षक असोत जैशा मुलासि त्या माता ॥

ह्या सर्व देवतांचीं मंदिरें कोतवड्यास आहेत. मार्गशीर्ष शु॥ १ व फाल्गुन वद्य ५ अथवा चैत्र शुद्ध १ आणि वैशाख किंवा ज्येष्ठ महिना असे तीन वेळां वरील देवतांस नैवेद्य दाखवावे लागतात. पैकी वैशाख अगर ज्येष्ठ महि-न्यांत घालावयाचे नैवेद्य घराचे बाहेर घालण्याची रीत आहे. यास मारग मळणें असें म्हणतात. या वेळीं स्वयंपाक घरीं न करतां घराचे बाहेर कोतवड्याच्या मार्गावर जाऊन तेथे स्वयंपाक करून नैवेद्य घालतात. ह्याशिवाय कुलदेव-तेचा रक्षक म्हणून मारक्याचा नैवेद्य निराळा घालून तो घरांत खात नाहीत. बाकीचे सर्व नैवेद्य घरांत सर्वजण भक्षण करतात. ह्या दिवशीं देवांची पंचामृती पूजा करतात. सुवासिनी व ब्राह्मण भोजनास सांगतात. मारग मळण्याच्या दिवशीं देवीस नारळ फोडून एक भाकरी अर्धवट भाजून वर एक कोंबडीचें अंडें ठेवून ती कोंकणचे मार्गाचे बाजूस गांवाबाहेर ठेवतात. वैशाख-ज्येष्ठ मासांत दोन सुवासिनींना भोजनास बोलावून आमरस घाल-तात. ह्यांस अंब्याच्या सुवासिनी म्हणतात.

दिवाळींत घराबाहेर दोन करंज्या मुद्दाम कोंकणच्या दिशेस टाकतात.

लग्नमुंजीच्या प्रसंगीं देवप्रतिष्ठेपूर्वी श्रीदेवास नमस्कार करण्याच्या वेळीं प्रथम सौ. जुऊबाईच्या नांवाने चोळीपातळ, हळदकुंकू, विडा ठेवून नमस्कार करून तें चोळीपातळ कोणा सुवासिनीस देतात. ही चाल दीडशें वर्षांपासून अनुसरली जात आहे. त्याची गोष्ट अशी— वाईतील सहस्रबुद्धे (मधली आळी) यांचे मूळ पुरुष गोविंदभट यांची एक बहीण सुवासीन कोंकणांत मयत झाली होती. गोविंदभटाचा परिवार पुढे फार वाढला व ५०।६० मनुष्यें वाईस एका घरांत सुखाने होतीं. या सर्वांना पाहण्याची इच्छा जुऊबाईस झाली. इकडे वाईस एकाएकीं सर्व ५०।६० मनुष्यें तापाने आजारी पडलीं. कोणास कारण समजेना. जुऊबाईने कोणाच्या स्वप्नांत येऊन तुम्हा सर्वांना भेटावयास आलें, घाबरूं नका, उदयिक सर्व ठीक व्हाल असें सांगितलें आणि सर्व दुसऱ्या दिवशीं बरे झाले. या कारणाने चोळीपातळ लग्नकार्यप्रसंगीं देण्याचा प्रघात पडला.''

''भराडी, गांवरखा, मांग हे नैवेद्य वेगळे दाखवून ते महार, झाडू, भंगी, रखवालदार, परीट, न्हावी वगैरे पान मागण्यास येणाऱ्यास द्यावे अशी वहिवाट आहे. त्या त्या जातीच्या मागत्यासच कोंकणांत हे नैवेद्य देत असें वडील सांगत. आमच्या दहा नैवेद्यांपैकीं सात स्पृश्य व तीन अस्पृश्य देवतांचे गणले जातात. भराडी, गांवरखा, मांग ह्या अस्पृश्य देवता होत.'' (दा. मो. भट, मिरज)

''कलें हा गांव पूर्वी नाचणें गांवाचा पाडा म्हणून मानला जात असावा. सबब नाचणें गांवच्या ग्रामदेवतांस वार्षिक राखण व देव दिवाळीस नैवेद्य घालण्याची वहिवाट आहे. नैवेद्य दाखवितों त्यांत नवलाई व पावणाई मिळून एकाच पानावर दोन मुदा घालून नैवेद्य दाखवितों.'' (म. वि. लिमये, राजापूर)

"दाखविलेले नैवेद्य घरांत कोणी खावयाचे नाहीत. सोमेश्वर, पद्मावती, रवळनाथ, विठलादेवी यांचे नैवेद्य अस्सल मराठे (शूद्र) घराण्यांतील कोणास द्यावयाचे. पांचवा गांवराख्याचा नैवेद्य कमी दर्जाच्या शूद्रास (व्यभिचारी अगर तशाच संबंधापासून उत्पन्न झालेल्या कुळास) द्यावयाचा असतो." (ग. ब. सोवनी, मिरज)

"फिरस्ता नैवेद्य आमच्या मागीलदारीं उंबर आहे तेथे दाखवावयाचा असतो. शिवाय चुकून कोणी राहिल्यास त्याला "चुकला माकला" असाहि एक नैवेद्य दाखवावा लागतो."

"कोळथरें येथील कुलस्वामिनी महिषासुरमर्दिनी देवी आहे. तिचा तांब्याची पाठ असलेला रुप्याचा प्राचीन टांक देवांत आहे."

महापुरुष नैवेद्य घराबाहेर ठेवण्याचा असतो. कोळेश्वराचा नैवेद्य घरांत प्रसाद म्हणून घेण्याचा असतो. आदित्यनाथ, वरदान, मानाय, धरणंकरणी व समस्त ग्रामदेवता हे पांच नैवेद्य कोणास तरी द्यावयाचे असतात.

श्री. भास्कर दत्तात्रेय भावे, नागपूर, यांच्याकडे असा आचार आहे की, नैवेद्याच्या भाताच्या मुदींचे आडव्या पंजाने दाबून दोन भाग करावयाचे. नैवेद्याचे देव—आदिष्टी, गांगोबा, भराडी व कुलस्वामी.

आडिवऱ्याच्या एका जोशांकडे असा रिवाज आहे की, सर्व देवांचे नैवेद्य एका पानावर असले तरी मुदा घालीत नाहीत. मोकळा भात ठेवतात आणि चारी बाजूंस तुरीचें वरण वाढून ठेवतात.

श्री. केशवराव ओगले, डोंबिवली, कळवितात की, आमच्याकडे दर मंगळवारीं 'वेगळी देवी' हिला नैवेद्य दाखवून तो बाहेर रस्त्यावर ठेवावयाचा असतो.

इदवींच्या खऱ्यांकडे देवीचा नैवेद्य गुराख्याखेरीज दुसऱ्या कोणाला तरी देतात; गणपतीचा नैवेद्य मात्र स्वतः भक्षण करतात.

एका लोंढ्यांकडे नैवेद्य नाहीत. परंतु दर मार्गशीर्षांत एका शुक्रवारीं ५ ब्राह्मण, लगेच पुढल्या सोमवारीं १ बैरागी व १ ब्राह्मण आणि दुसऱ्या दिवशीं मंगळवारीं २ ब्राह्मण असे घालावे लागतात. पैकी शुक्रवारचे ५ ब्राह्मण त्र्यंकोबाचे आहेत.

मिरजेचे शिधये यांच्याकडे नवरात्रांत अष्टमीला दहीवड्याचा नैवेद्य दाखवून मुंजा जेवण्यास घालण्याची चाल आहे.

मिरजेच्या लेल्यांकडे वर्षांतून एकदा ५ मुंजे भोजनास बोलावून त्यांपैकी एकास पंचजोडी देण्याचा शिरस्ता आहे.

प्रो. सदाशिव वामन जोशी ह्यांच्याकडे पौष महिन्यांत मूळपुरुषाच्या नांवाने पांच पंच्यांची पूजा करून ते पंचे ब्राह्मणांस देण्याची चाल होती. त्याचप्रमाणे मूळपुरुषाला दर मंगळवारीं दहीभात व लिंबाचें लोणचें ह्यांचा नैवेद्य दाखवितात. ह्याशिवाय दर रविवारीं रात्रीं काळभैरवाला गुळाचा नैवेद्य दाखविण्याची वहिवाट आहे.

श्री. परशुराम दिनकर परांजपे सांगतात की, महापुरुषाचें प्रयोजन कार्तिकांतील कोणत्या तरी एका सोमवारीं घालावें लागतें. त्या वेळीं महापुरुषाला दुधाची एकादशणी करून सर्व गांवांतील मंडळी त्या झाडाखाली जेवतात. जखिणीला एक कोंबडें, हळदकुंकू व तांबड्या भाताचा बळी देतात.

कुळगांवचे गोळे यांच्याकडे करजांचें तेल वापरीत नाहीत व करंजाचें लाकूड जाळीत नाहीत. तसेंच देवी छापीत नाहीत. पटवर्धन घराण्याचा तर हा कुलाचारच आहे. दोघांचीहि करंजेश्वरी कुलस्वामिनी आहे. गोवळ व मुरुड (हर्णै) येथील काळ्यांकडे खुळखुळा व घंटा वाजविण्याची बंदी आहे. अंजनवेलच्या सोहन्यांकडे हीच चाल आहे. घंटेंत लोळा न ठेवण्याचा प्रघात आहे. हाच प्रकार जवळ जवळ आडिवऱ्याच्या गोऱ्यांच्या घराण्यांत चालू आहे. घंटेला लोळी नसतेच, परंतु बायकामुलांच्या अंगा-

वर घुंघुर, वाळे वगैरे वाजणारे दागिने घालीत नाहीत. हा रिवाज कुवेशीचे वामन गोविंद ताम्हणकर (शांडिल्यगोत्री) यांच्याकडेहि आहे. पडघवलीच्या डोंगऱ्यांच्या बायकांनी काळें वस्त्र नेसावयाचें नसतें. नेसावयाचें झाल्यास माहेरचें आणून नेसावें.

करचुंड्याचे (भोर संस्थान) वैद्य तीनच चित्रावती घालतात. मिरजेच्या फडक्यांकडे मुलाच्या कार्यांत १००० मोदकांचा नैवेद्य गणपतीस दाखवावा लागतो. नातू घराण्यांत गणपतीनंतर गौरी आणावयाची रूढि नाही. पडघवलीचे डोंगरे, वेळंदूरचे गोळे आणि पालशेतचे कांही जोशी यांच्याकडे गणपति आणीत नाहीत. वरसईच्या गोडशांकडे महालक्ष्मीचा वसा नाही.

"मार्ग. शु १ रोजीं एक मराठा व एक ब्राह्मण जेवूं घालण्याचा कुलाचार आहे." (दाभोळीचे ओगले)

आरोशीच्या बर्व्यांकडे कार्याच्या वेळीं व कुलाचाराच्या दिवशीं एका मराठ्यास जेवण्यास बोलावण्याची पद्धति आहे. (रा. ना. केळकर, मांद्रे)

अंजनवेलच्या साठ्यांकडे पांचवीपूजन नाही.

भिवंडीच्या कुंट्यांकडे पिंडदान करीत नाहीत व बलिहरण घालीत नाहीत.

कोरेगांव येथे "भिसळ शेणै" नांवाचें खडक आहे. त्या ठिकाणीं बर्वे मंडळींस वर्षांतून एक वेळ नैवेद्य दाखवावा लागतो. तसेंच कार्याच्या वेळीं भिसळ शेणैस पहिल्यानें नारळ ठेवावा लागतो. ही परंपरा ३।४ पिढ्या आहे. (केळकर, मांद्रे-गोवा)

"महालक्ष्मी ठेवण्याची व बोडण भरण्याची चाल खरे कुटुंबांत नाही." (खरे कुलवृत्तांत-अप्रसिद्ध)

"गुहागरचे खरे गणेशचतुर्थीच्या उत्सवांत नजीकच्या गणपतिपुळ्यास देवाच्या दर्शनाकरिता जात असत. तेथे हे द्रविड ब्राह्मण म्हणून त्यांची

पानें वेगळीं मांडीत." (कित्ता)

फफ्यांकडे परंपरागत हरतालिका-पूजन नाही.

वाघोबाच्या निमित्ताने ठाण्याच्या अभ्यंकरांकडे दरसाल ११ ब्राह्मण सांगावे लागतात.

"स्मार्त असूनहि आम्ही दुसरी एकादशी करतों. वासुदेव हें आमचें उपास्य दैवत आहे. नारद पंचरात्राप्रमाणे वासुदेवाची उपासना देण्याचाहि उपक्रम आमच्या घराण्यांत असून तें काम वाटेगांवचे दिवेकर करतात. नागचौथ म्हणून या भागांत एक उपासाची चाल आहे. फक्त देवदिवाळीला कोंकणांतील देवतांना रसवड्याचा नैवेद्य दाखवितों."

(महादेवशास्त्री दिवेकर)

पुण्याचे शंकरराव चापेकर लिहितात—"नवरात्रांत आम्ही देवीला तीन वेळां नैवेद्य दाखवितों. सकाळीं दहीपोह्यांचा, दुपारीं महानैवेद्य आणि संध्याकाळीं बेसनाच्या दोन लाडवांचा."

गणेशचतुर्थीच्या दिवशीं घरीं मूर्ति आणून तिची पूजा करण्याची चाल गुहागरच्या खरे घराण्यांत नाही. (गणेश रावजी खरे)

सतीचा पाट—ही एक पाटाच्या आकाराची घडवून सपाट केलेली शिला गुहागर गांवांत आहे. पूर्वी स्त्रिया सती जात तेव्हा गांवांतील सर्व बायका जमून ह्या पाटावर तिला स्मशानाकडे नेत. भाविक वाटसरू जवळच्या कुंपणांतील निरगुडीचा पाला काढून त्या शिलेवर वाहतात. फाल्गुनांत धुळवडीच्या दिवशीं सर्व ब्राह्मण लोकांची मिरवणूक सवाद्य खेळत खेळत ह्या पाटाशीं आल्यावर धर्माधिकाऱ्यांपैकी कोणी तरी त्यावर बसतो. मंडळींपैकी कांही जण झाडाच्या डाहळ्या छत्रचामराप्रमाणे त्या धर्माधिकाऱ्यावर धरतो. मग तो एक लांब मंत्र सावकाश म्हणतो आणि नंतर समारंभ पुरा होतो. बऱ्याच देवतांचीं व वसिष्ठादि महर्षींचीं नांवें उच्चारून

त्यांच्या प्रसादाने भक्तजनांचें शारीरिक, बौद्धिक आणि आर्थिक कल्याण होवो अशा प्रार्थनेचा धर्माधिकाऱ्याने म्हणावयाचा मंत्र असतो. हा मंत्र असा:—

यथोपसंनिहिता ब्राह्मणाप्रसादें त्रयोग्नित्रिपुरुषाप्रसादें मन्वाद्या आचार्याप्रसादें वसिष्ठादि महर्षिप्रसादें शंखचक्रगदाधरा वासुदेवाप्रसादें महालक्ष्मीसोमेश्वराप्रसादें होलिकेच्या विभूति वंदनीं मिळाले याजकास क्षेमायुः प्राप्त व्हावें कीर्तिधन प्राप्त व्हावें, यश प्राप्त व्हावें, स्वस्ति.

हा मंत्र तिनदा म्हटला जातो.

गुहागरास दुर्गादेवीचें स्थान आहे. चैत्राच्या उत्सवांत शिजलेल्या भातांत मोठमोठे पेटवलेले काकडे घालून तयार केलेला बलि गांवाच्या सीमेवर नेऊन ठेवण्याची चाल आहे. ह्याचा पुढाकार परचुरे महाजन ह्यांजकडे आहे. ह्या देवीच्या आवारांत तलाव आहे.

श्री. सखाराम अच्युत सहस्रबुद्धे ह्यांच्या माहितीप्रमाणे कोंकणांत वार्षिक नैवेद्य प्रायः खोत जमीनदारांकडे दाखवितात. इतर ब्राह्मणांनी त्यांचें अनुकरण केलें आहे. हें संभवनीय दिसतें. गांव वसवणारा तो खोत. तेव्हा सर्व ग्रामदेवतांना वर्षातून निदान एकदा तरी त्याने नैवेद्य दाखविणें स्वाभाविक आहे.

ह्याच सहस्रबुद्धयांनी कोतवडें येथे देवतांच्या संबंधाने काय केलें जातें ह्याविषयीं दिलेली माहिती येणेंप्रमाणेः—

चैत्र — ध्वजारोपण : रात्रीं रुपें उतरणें; वसंतपूजा.

शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं सर्व देवतांना नैवेद्य दाखविणें; अमावास्येच्या दिवशीं राखणा देणें.

आषाढ— कुसुमेश्वर, धामणेश्वर, महालक्ष्मी या तीन देवांना बळद करणें (राखणा देणें).

श्रावण— पोर्णिमेस देवांना पोवतें घालणें व विडे देणें.

आश्विन— महालक्ष्मीचें नवरात्र: दसरा.

कार्तिक— कुसुमेश्वराचा उत्सव: त्रिपूर लावणें—देव समजावणें.

मार्गशीर्ष— देवदिवाळीस नैवेद्य; राखणा देणें.

फाल्गुन— शिमगा: शुद्ध ७ पासून खोताच्या हुकमाने खेळे बाहेर पडतात. पौर्णिमेच्या दिवशीं तीन वाजतां गांवांत सती फिरते. रात्रीं वाड्याच्या होळ्या लागतात. गांवची होळी उजाडल्यावर आठाच्या सुमारास लागते. सती दारावरून गेल्यावर जळतें कोलीत विझवून वाढवणीने जागा साफ करतात. कोलीत खाली विझवितात.

ह्यांतील सती जाण्याची हकीकत मनोवेधक आहे. कोणीतरी प्रेताची बतावणी करून स्मशानयात्रा काढण्याच्या पद्धतीचा उल्लेख श्री. धोंडोपंत कर्वे ह्यांच्या आत्मचरित्रांत आहे. सती जाण्याची चालहि ह्याच स्वरूपाची होय.

असले प्रकार करण्याचा हेतु खरें मरण लांबणीवर घालविण्याचा असावा. बायकोला बाळंतपण कष्टप्रद होऊं नये म्हणून पुरुष बाळंत झाल्याचें सोंग करतो व बाळंतिणीचे सर्व उपचार आपण करून घेतो ह्यासारखाच वरील प्रकार असावा.

सतीविषयीं थोडी अधिक माहिती देणें अवश्य आहे.

सतीचें सोंग पुरुषाला देतात. मात्र तो महाराचा मुलगा असावा लागतो. सोंग घेण्यास खोताची परवानगी लागते. सतीला पिंवळें पातळ नेसवतात, डोक्याला टोप असतो व गळ्यांत कांचेच्या मण्यांची गळेसरी घालतात. नारळसुपारी, तांदूळ ह्यांनी सतीची ओटी भरल्यावर ती फिरण्यास बाहेर पडते. ओटीसह गांवाच्या वेशीवरून तिला जावें लागतें. तिचें शेवटचें जाण्याचें ठिकाण अर्थात् स्मशान होय. तेथून मागे फिरून मूळ ठिकाणावर म्हणजे गांवची होळी असते तेथे यावयाचें. होळीवर आल्या-

नंतर सतीच्या अंगावरील सर्व पदार्थ—पातळ, टोप, गळेसरी, ओटीचे नारळ, तांदूळ वगैरे–होळींत टाकतात. कोतवडें गांवच्या स्मशानांत एक पुरातन तळें आहे त्यास सतीचें तळें अथवा सतीची खाई असें नांव आहे. तळ्यांत जीव देणें हा सती जाण्याचा एक प्रकार असावा असें ह्यावरून दिसतें; असो. गांवांतून सती तळयाकडे जातांना ज्यांच्या ज्यांच्या घरांवरून ती जाईल ते ते घरधनी हातांत जळतें कोलीत, केरसुणी व पाणी घेऊन अंगणाच्या कडेला उभे राहतात. सती पुढे गेली म्हणजे त्या कोलितावर पाणी घालून तें केरसुणीने झाडून टाकतात. जळतें कोलीत, केरसुणी व पाणी हे तीन पदार्थ एकदम हातांत घेणें अशुभकारक समजतात व सती गांवांत फिरेल त्याच दिवशीं हें अशुभ म्हणूनच करावयाचें असतें.

सतीबरोबर ढोल वाजविणारा असतो. प्रत्येकाला घरामागे एक पै मिळते.

"तळवण्याच्या परांजप्यांकडे पौष महिन्यांत समंधाच्या नांवाने एक ब्राह्मण जेवावयास घालावा लागतो. ह्या ब्राह्मणास घरांत वाढावयाचें नाही. घरासमोरील व्हरांडयांत जेवण घालणें व समंधास नैवेद्य दाखविणें. या दिवशीं उडदाच्या डाळीचें वरण व अन्नशुद्धीस तुपाऐवजी तिळेल तेल वापरावयाचें."

"तळवणें येथील बर्वे यांच्या कुटुंबांतील कोणाहि पुरुषाने आश्विन शु॥ १० पासून चौथ्या रात्रीं तळवणें येथील गांवकरी सावंत यांच्या घरीं जाऊन देवास (खळनाथ-मावली) नारळ ठेवून आमंत्रण करणें. मग त्याच रात्रीं (म्हणजे दशमीपासून चौथ्या रात्रीं) देव बर्वे यांच्या घरीं पावणेरास जातात. बर्वे यांचा कुलपुरुष फोडया ब्राह्मण याच्यासह देवांची (तरंगांची) पूजा करणें व नैवेद्य दाखविणें. नैवेद्य (भाताचा) रात्रीचाच होतो. नंतर देव त्याच रात्रीं देवालयांत जातात." (रा. ना. केळकर)

"देवदिवाळीला (निर्वे बुद्रुकचे) ढोल वगैरे घेऊन घरोघर दिवा घेऊन

फिरतात व 'इडापीडा टळो बळीचा राज्य चांगबला' असें म्हणतात. शिमग्यांत देवी (वरदान) ची पालखी निघते व घरोघर फिरते. शेवटीं साहणेवर दहा-पंधरा दिवस राहते. मग गुरवाचे घरीं राहते.''

(न. ब. राजवाडे)

## कुलाचारांवर टीपा

बोडणं भरण्याच्या प्रसंगांवरून बोडण शब्द वर्धन ह्या शब्दावरून व्युत्पादिला जातो तें बरोबर आहे असें दिसतें. लग्नमुंजीसारखें कार्य झाल्यास बोडण भरण्याचा रिवाज आहेच, पण वरील कुलाचारांत घरांतील स्त्रिया प्रसूत झाल्यावरहि बोडण अवश्य भरलें जातें असें दिसतें. एवढेंच नव्हे तर गाय व्यायली असतांहि बोडण भरावें लागतें. ह्या सर्व गोष्टींवरून बोडणाचा संबंध वर्धनाशीं आहे असें मानण्यास हरकत नाही.

घोपावकर दीक्षित, धुळ्याचे पटवर्धन, बसणीचे फाटक व लेले, भोरकडील फाटक, गणपतिपुळ्याचे घनवटकर, नेवऱ्याचे बर्वे व घुले, पिरंदवण्याचे भावे आणि ढोकंबळ्याचे केळकर ह्यांच्याकडेहि संतति किंवा कर्म झाल्यास बोडण भरण्याची चाल आहे.

जर्मनीमध्ये वोडन (woden) नांवाच्या देवतेस भजतात. ही ट्युटॉनिक देवता आहे. स्वस्तिक हें तिचें चिन्ह आहे. बोडण आणि वोडन ह्यांत उच्चारतादात्म्य आहे. जर्मन लोकांची ही देवता आहे.

घंटा वाजवावयाची नाही, वाजणारे दागिने अंगावर घालावयाचे नाहीत ही चाल उकिडवे, काळे, गोरे, सोहनी यांच्या कुटुंबांत आहे. हीं सर्व कुटुंबें वत्सगोत्री आहेत. वत्स—वासरूं याच्या गळ्यांत घुंगुर बांधतात. करंजेश्वरी कुलस्वामिनी आहे म्हणून करंज्यांचें तेल व करंजाचें फाटें न जाळणें हा जसा प्रघात तसाच प्रकार वत्सगोत्र व घुंघुर न घालणें ह्या-

१ महालक्ष्मी व बोडण ह्यांसाठी "बदलापूर" पृ.२१४ ते २२० पाहा.

विषयी असावा. शांडिल्यगोत्री ताम्हणकरांकडे ही चाल बायकांकडून आली असावी. माहेरचे आचार स्त्रिया सासरीं आणतात असा अनुभव आहे. नाही तर वत्सगोत्राखेरीज अन्य गोत्रांत हा प्रघात असण्याचें कारण नाही. ताम्हणकरांप्रमाणे नेवऱ्याचे चितळे ह्यांच्याकडेहि हा आचार आहे.

यजुर्वेदी मुद्गल गोत्राच्या कुटुंबांतहि अशीच चाल आहे. घंटा वाजवावयाची नाही; घागऱ्यांचा करगोटा घालावयाचा नाही. मुद्गलांविषयी कथा अशी आहे की, एकदा चोरांनी ह्याचे एक म्हातारा बैल खेरीजकरून सर्व गाईबैल चोरून नेले. तेव्हा तो म्हातारा बैल आणि लाकडी भरीव मुद्गर (मोगर) गाडीस जुंपून मुद्गल युद्धास गेला व चोरांवर मुद्गर टाकून त्याने चोरांचा पराभव केला आणि गाईबैल परत आणिले.[1] ह्यावरून वत्स ऋषीप्रमाणे गाईबैल हें मुद्गलांचें कुलदैवत असावें असें वाटतें. मुद्गलगोत्री मुंज होईतों शेंडी ठेवीत नाहीत व कटिसूत्र बांधीत नाहीत, ह्याचेंहि कारण चरित्रकोशांत दिलेल्या माहितीवरून कळण्यासारखें आहे.

कित्येक म्हणतात त्याप्रमाणे आमच्यांतील कांही गोत्रें देवतारूपी मनुष्येतर प्राणी व वनस्पति असू शकतील. वत्स, कपि, कौंडिण्य हीं गोत्रें उदाहरणादाखल सांगतां येण्यासारखीं आहेत. किंवा गायींच्या वत्सांत वाढल्यामुळे एका राजपुत्राला वत्स नांव पडलें, त्याप्रमाणे ह्याहि ऋषीच्या संबंधाने झालें असावें. वत्स ऋषि प्रथम क्षत्रिय असून नंतर ब्राह्मण झाला असा परंपरागत इतिहास आहे.

माटलादेवी कुणबीण असल्यामुळे आम्ही कुणबीण सवाशीण सांगतों असें कित्येक काण्यांचें म्हणणें आहे तें बरोबर दिसतें. कुणबीणहि देव होऊं शकते. काण्यांची देवी माटला आहे. ही कुणबीण सवाशीण पाटाची चालत नाही. तिने त्या दिवशीं निषिद्ध सेवन करतां कामा नये. म्हणून

---

१ प्रा. च. कोश पृ. ४५२.

जेवतांना "आज तुला भूक लागली तर दुसरें खाऊं नकोस आमच्याकडे ये आणि जेव" असें बजावतात. अशी सवाशीण दिवाळीला, लग्नकार्यांत अगर गर्भाधानाच्या प्रसंगीं सांगण्याची वहिवाट आहे. पूर्वी ब्राह्मण शूद्र स्त्रिया करीत तेव्हाचा हा अवशेष असावा. तथापि माटल हें आडनांव कुंभारांत असल्याचें आढळतें.[1] माटला म्हणजे कुंभारीण. घारा माटल हें पुरुषाचें नांव. वसईच्या शेंडे घराण्यांतहि लग्नकार्यप्रसंगीं कुणबीण सवाशीण सांगण्याची चाल आहे. त्यांची देवी गोलांबिका आहे. ह्या देवीने ही चाल आणली असावी.

काणे ह्यांच्याखेरीज शांडिल्यगोत्री दातार व काश्यपगोत्री शिंत्रे यांच्यांत कुणबी सवाशीण जेवूं घालण्याची चाल आहे. काणे शांडिल्य-गोत्री आहेत. दातार वासिष्ठगोत्री आहेत. त्यांच्यांत ही चाल नाही. शांडिल्यगोत्री दातारांची देवी माटलाच आहे. ह्यावरून काणे व दातार एकच असावे. दातार हें आडनांव अनेक गोत्रांना लागलेलें आहे त्या अर्थी काण्यांतूनच दातार निघाले असावे. हीच चाल काश्यपगोत्री शिंत्र्यांत आढळते त्या अर्थी काश्यपशांडिल्यांचे तादात्म्य सिद्ध होतें व तसें तें आहेहि. प्राचीनकाळीं विटाळ गेलेल्या स्त्रियाच सुवासिनी सांगत असाव्या. अस्पृश्य होणाऱ्या बायका श्राद्धकर्मांतहि अपवित्र मानल्या जात. परंतु अशा बायका मिळणें कठीण असल्यामुळे विटाळशा बसणाऱ्या स्त्रिया बोलवाव्या लागतात.

आपलें कुलदैवत असेल त्याचा रोष होऊं नये ह्या बुद्धीने कांही आचारविषयक निर्बंध पडले आहेत; उदा. करंजेश्वरी कुलस्वामिनी मानणारे पटवर्धन करंजांचें तेल जाळीत नाहीत अथवा करंजाचें फाटें जाळीत नाहीत त्याचप्रमाणें बांदेश्वरी उर्फ बांदेजाई किंवा बंदीमाता हें कुलदैवत

१ दीक्षित.

असणारे जे केळकर त्यांच्याकडे झाडावरचें बांदवीड जाळीत नाहीत. ह्या त्यांच्या आचारावरून ह्या देवीचें स्वरूप समजण्यासारखें आहे.

कुटुंबांत अनिष्ट प्रकार घडल्यास काम्य व्रतें वर्ज करण्याची प्रवृत्ति आढळून येते. वाघाने देवी नेली म्हणून बोडण व महालक्ष्मी वर्ज झाल्याची दंतकथा कुवेशीच्या ताम्हणकर घराण्यांत आहे. अशाच कांही कारणामुळे गौरीगणपति न आणण्याची चाल कित्येक घराण्यांत पडली आहे. जेथे प्रत्यक्ष गणपतीचें जागृत स्थान आहे तेथे भाद्रपदांत गणपति घरोघर बसविण्याची चाल नाही. उदा. गणपति पुळें. आसपासच्या गांवांतील कित्येकांकडे अशीच चाल आहे. ते पुळ्यास गणपतीच्या दर्शनास जातात; उदा. जून येथील बापट, मालगुंडचे बापट, नेवऱ्याचे गाडगीळ, कोल्हटकर; परांजपे, भावे, चितळे, जोगळेकर, जोशी, करमरकर, ढोकमळ्याचे केळकर, ह्यांच्याकडे गणपति आणीत नाहीत.

कुंकू घरांत न करण्याच्या चालीचा उगम अशाच स्वरुपाचा असावा.

ठिकाण किंवा आगरपुरुष ह्या नांवाने नारिंगऱ्याच्या गद्योंना पांच नैवेद्य दाखवावे लागतात. ज्याच्यापासून जमीनजुमला खरेदी केला असेल त्याच्या नांवाने नैवेद्य दाखवून त्याचें संतर्पण करण्याची ही पद्धति दिसते.

जमखंडीचे सोहोनी कळवितातः—

सासूरवाशीण माहेरीं जाऊं लागली म्हणजे तिची ओटी भरावयाची नसते, फक्त कुंकू लावतात. पहिल्या वर्षी महालक्ष्मी घरीं पुजावयाची नसते.

आमच्या मतें सासूरवासणीची माहेरीं जातांना ओटी न भरण्याची चाल बरोबर आहे. ओटी भरणें हें गर्भार राहून संतति व्हावी ह्या इच्छेचें द्योतक आहे. गर्भाधानाला ओटभरण ही संज्ञा आहे. ओटी म्हणजे बेंबीखालचें पोट. अजूनहि ओटीपोट असेंच त्या भागाला म्हणतात. ओटी भरतांना ओच्यांत नारळ, दुसरीं फळें वगैरे टाकतात. फुलेंहि फळांबरोबर घाल-

ण्याची पद्धति आहे. फल व पुष्प हीं संतति सुचवितात. तांदूळ विघ्न-निवारक आहेत. ओटी भरणें म्हणजे संतति होवो असें सुचविण्यासारखें आहे. माहेरीं जातांना गर्भधारणेचा संभव नसल्याकारणाने ओटी भरण्याचें प्रयोजन नाही. मूळ हेतु न समजल्यामुळे हल्ली बऱ्याच ठिकाणीं ओटी भरण्याची विपर्यस्त रूढि चालू आहे.

विष्णूशिवाय दुसऱ्या देवतांचा नैवेद्य आपण भक्षण करावयाचा नसतो. मिरजेचे सोवनी व जळगांवचे लेले यांच्याकडील चाल बरोबर दिसते. शिवाचा नैवेद्य घरीं भक्षण न करतां गुरवास किंवा शूद्रास देतात तेंच बरोबर आहे. निरहंकारी, निनूदेव, ब्रह्मदेव, पावसाचा देव, मूळदेव, गांगोदेव व जोगेश्वरी ह्यांचे नैवेद्य गरिबाला अथवा गुरवाला द्यावयाचे असतात असें बेळगांवचे दाते लिहितात. त्यावरून उपरोक्त देव अब्राह्मण आहेत असें होतें. जळगांवच्या लेल्यांचे डोंगरादेवी, नलो, निलो; धारवाडच्या फाटकांचे रवळनाथ, वेताळ; साताऱ्याच्या कोल्हटकरांचे वरदान, आदित्यनाथ, मानाय, धरणंकरीण हे देव, वरील मालिकेंत समाविष्ट केले पाहिजेत. गांवराख्याचा नैवेद्य व्यभिचारोत्पन्नास द्यावयाची रूढि मिरजेचे सोवनी ह्यांच्याकडे आहे; त्यावरून गांवराख्या देवाचें स्वरूप ध्यानांत येईल. राजापूरचे लिमये ह्यांच्याकडील वहिवाटीवरून सोवन्यांच्या म्हणण्यास बळकटी येते. भराडी, गांवरखा, मांग हे नैवेद्य वेगळे दाखवून ते महार, झाडूवाले, भंगी, परीट, न्हावी वगैरे पान मागण्यास येणाऱ्यास देण्याची चाल लिमये सांगतात. सामान्यतः नैवेद्याच्या देवाची जी जात असेल त्या जातीच्या मागल्यास तो नैवेद्य देत असतात. ह्यावरून वरील सर्व देवता मनुष्यांच्याच बनल्या आहेत असें स्पष्ट दिसतें. नैवेद्याची भाकरी अर्धवट भाजावयाची, मुदा न घालतांना मोकळा भात वाढावयाचा, तो पंजांनी दाबावयाचा वगैरे चाली देवतांची हीन संस्कृति दर्शवितात.

सहस्रबुद्धे यांनी वर्णिलेल्या हकीकतीवरून चाली कशा पडत जातात हें समजतें.

नेवऱ्यांच्या उकीडव्यांकडे मुसलादेवीचा नैवेद्य स्वतः भक्षण करण्याची चाल आहे ती अशुद्ध दिसते.

दिवेकर शास्त्र्यांनी कळविलें नसतें तर वासुदेवाची उपासना अद्यापि महाराष्ट्रांत रूढ आहे हें कळलें नसतें.

## नैवेद्य

देवाला जें निवेदन म्हणजे अर्पण करावयाचें त्या अन्नास नैवेद्य ही संज्ञा आहे. देवांना वर्षांतून विशिष्ट दिवशीं नैवेद्य अर्पण करावयाची चाल चित्पावनांत आहे. हे नैवेद्य कोणत्या दिवशीं व कोणत्या देवतांना दाखवितात व त्याच्यावरून कांही अनुमानें करतां येतील कीं नाहीत ह्यांचा येथे विचार करावयाचा आहे.

कोंकणाशीं संबंध तुटलेल्या कुटुंबांत नैवेद्य दाखविण्याची प्रथा अलीकडे बंद पडत चालली आहे; आणि कोंकणांतहि दारिद्र्यामुळे ती सुटूं पाहत आहे. आमच्याकडे आलेल्या माहितीच्या कागदांत १००।१५० जणांनी नैवेद्याचें सदर भरलेलेंच नाही. कांही थोड्या जणांनी आम्ही नैवेद्य दाखवीत नाही असें स्पष्ट लिहिलें आहे. ६८३ जणांनी ह्याविषयीची माहिती पुरविली आहे. त्यावरून असें दिसतें की, नैवेद्य दाखविण्याच्या दिवसांत एकवाक्यता नाही. ह्या गोष्टीला शास्त्राचा आधार नाही हें उघडच आहे. ही एक रूढि आहे. दररोज जेवणापूर्वी देवाला अथवा देवांना नैवेद्य दाखविण्याची चाल परंपरेने वागणाऱ्या कुटुंबांत अद्यापि आहेच. ह्या अर्थाने एकाने रोज नैवेद्य दाखवितों म्हणून म्हटलें आहे तें बरोबरच आहे. परंतु प्रसंगाचें माहात्म्य असतें. कोकणांतील देवांना वडे घारगे प्रिय असतात. आपण दररोज वडेघारगे करीत नाहीं. परंतु

प्रासंगिक नैवेद्याच्या वेळीं हे पदार्थ केले जातात. ह्यावरून असें दिसतें की, वडे घारगे हें कोंकणांतील अत्युच्च पक्वान्न होय. जें सर्वश्रेष्ठ तेंच देवाला समर्पण करण्यांत येतें. असो.

चैत्र शु १, आश्वी. शु १०, कार्तिक शु १, मार्ग. शु १, फा. शु १५, हे दिवस मुख्यतः नैवेद्याचे समजले जातात. हे दिवस म्हणजे पाडवा, दसरा, धाकटी दिवाळी, देवदिवाळी व होळी हे सण होत. तेव्हा सणांच्या दिवशीं नैवेद्य दाखविले जातात असें म्हणतां येईल. भातखंडे, भट, बापट, केतकर, सोवनी ह्या आडनांवांच्या कित्येक लोकांनी आम्ही सणवारीं नैवेद्य दाखवितों असें म्हटलेंहि आहे. सण हेंच जर नैवेद्य दाखविण्याचें कारण असेल तर ह्या सणांचा विस्तार होणें स्वाभाविक आहे. धुळवड, रंगपंचमी, गोकुळअष्टमी, गणेशचतुर्थी, नागपंचमी, चंपाषष्ठी हेहि नैवेद्याचे सण कित्येकांनी बनविले आहेत. चंपाषष्ठीला नैवेद्य दाखविण्याची शिंऱ्यांची चाल घाटावर आल्यानंतरची आहे ह्यांत संशय नाही. ह्या दिवशीं नैवेद्याला कांद्याचे पदार्थ करतात कीं काय ह्याबद्दल त्यांनी कांही लिहिलें नाही. लेले, बापट, अभ्यंकर ह्यांपैकी प्रत्येकीं एक कुटुंबच गणेशचतुर्थीला नैवेद्य घालणारें आहे. तीच स्थिति नागपंचमीची. सहस्रबुद्धे, साठये व पटवर्धन ह्या आडनांवाच्या एकेका इसमानेच नागपंचमी सणाला नैवेद्य घालून महत्त्व आणलें आहे. एकाने तर नागपंचमीला नागदिवाळी असें संज्ञिलें आहे. गोकुळअष्टमीला नैवेद्य घालण्याची प्रथा एका टिळक कुटुंबाने पाडली आहे. अक्षय्यतृतीया ह्या पितृतिथीला सण समजून गोरे व परांजपे नांवाचे दोन इसम त्या दिवशीं नैवेद्य घालतात. कुवेशीचे ताम्हणकर श्राद्धपक्षाच्या दिवशींहि नैवेद्य घालतात. पितृदिनाच्या दिवशीं देवकृत्य ! हे सर्व प्रकार अपवादात्मक आहेत ह्यांत संशय नाही. तथापि अक्षय्यतृतीयेला परशुरामजयंतीची सबब सांगण्यासारखी आहे हें विस-

रतां कामा नये.

कित्येक नवरात्रांत नैवेद्य दाखवितात. कोणी शारदीय नवरात्रांत, कोणी वासंतिक नवरात्रांत तर कोणी दोनहि नवरात्रांत हा आचार पाळतात. एका मिरजेच्या गृहस्थाने म्हटल्याप्रमाणे देशावर आल्यानंतर नवसाने हा आचार प्रचारांत आला. लग्नमुंजीसारख्या मंगल कार्यांत देवतांना नैवेद्य घालण्याची रूढि कांही थोड्या कुटुंबांत आहे. लागू, आपटे, साठे, दामले, पाटणकर व मराठे ह्या चार कुटुंबांत ही चाल आहे. एका गृहस्थांनी नियमित दिवसांचें बंधन तोडून वर्षांतून केव्हा तरी एक दा नैवेद्य घालण्याची परंपरा पाडली आहे. एका साठे कुटुंबांत बारशाच्या दिवशीं नैवेद्य दाखवतात. ऐनेकर गोळे घराण्यांतहि ही चाल आहे[1]. वर्षांत बारशाचा प्रसंग आला नाही तर देवांना नैवेद्य मिळावयाचा कीं नाही हें समजण्यास मार्ग नाही. एक बर्वे गृहस्थ आम्ही बोडणाच्या दिवशीं नैवेद्य दाखवितों असें सांगतात. लोकांनी आपल्या समजुतीप्रमाणे व सोयीप्रमाणे निरनिराळ्या चाली पाडलेल्या आहेत. अमुक कारणाने अमुक दिवशीं नैवेद्य घालावयाचे ह्याचा विसर पडला म्हणजे असा प्रकार होणें अपरिहार्य आहे.

जागर हा एक नैवेद्याचा प्रशस्त दिवस म्हणून कित्येक कुटुंबांत मानला जातो. श्रावण शुद्ध १५ ला जागर म्हणतात असें मराठी कोशावरून दिसतें. वस्तुतः ह्या पौर्णिमेच्या रात्रीला जागर ही संज्ञा आहे (मोल्सवर्थ). आणि नैवेद्य तर रात्रीं दाखवावयाचे नसतात. अर्थात् ज्या दिवशीं जागर-रात्र असते तो दिवस असेंच येथे समजलें पाहिजे. जागरच्या ऐवजी श्रावण शु॥ १५ हा दिवस नैवेद्याचा म्हणून अनेकांनी सांगितला आहे. श्रावणी पौर्णिमेखेरीज चैत्र शु॥ १५, आश्विन शु॥ १५ ह्यां दोन पौर्णिमांचाहि

१ गोळे कुलवृत्तान्त, पान १३९.

निर्देश कित्येकांनी केला आहे. हे पौर्णिमावाले लोक प्रायः घाटावरचे होत. चैत्र शु॥ १५ सांगणारे नागपूरचे भिडे व साठे असून आश्विन १५ सांगणारे मिरजेचे एकटे सोवनीच आहेत. ह्यावरून चैत्र १५ व आश्विन १५ हे नैवेद्याचे खरे दिवस नव्हत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. माघ वा॥ ४ हाहि अपवादच आहे. वर सांगितलेल्या भिड्यांकडील हा प्रघात आहे. माघ वा॥ ४ ही तीथ नैवेद्यांना कां निवडण्यांत आली हें समजत नाही. शुद्धांतील चतुर्थी ही गणेशजन्मतिथि तरी आहे. मूळ चाल सुटून भलतीच अथवा दुसरीच चाल प्रचारांत कशी येते ह्याचीं हीं उदाहरणें आहेत.

ह्या बाबतींत वरीलपेक्षा आणखी निराळ्या प्रकारचे कुलाचार आढळतात. आश्विन शुद्ध अष्टमीपासून मार्गशीर्ष शु॥ प्रतिपदेपर्यंत केव्हाहि एकदा नैवेद्य घालण्याची चाल एका नातू कुटुंबाने पाडली असून दुसऱ्या एका फाटक कुटुंबाने कार्तिक शुद्ध प्रतिपदेपासून द्वादशीपर्यंत एक दिवस देवांना नैवेद्य समर्पण करण्याची प्रथा पाडली आहे. "आश्विनमासीं नवरात्रांपासून दिवाळीपर्यंत" ही प्रथा एका शिधयांची आहे.

नैवेद्यासंबंधाने श्रावण महिन्याचें महत्त्व फार दिसतें. मूळचा प्रकार असा दिसतो की, मार्ग. शुद्ध १ ला व दुसऱ्या दोन पाडव्यांना ग्रामदेवतांना नैवेद्य दाखवावयाचे असून श्रावणांत शंकराला नैवेद्य दाखवावयाचे. चित्पावन हे शैव आहेत असें माझें मत आहे. त्यामुळे श्रावण महिन्यांत शिवाला विशेष नैवेद्य घालणें स्वाभाविक आहे. ज्या गांवांत आपण राहतों तेथील ग्रामदेवतांना वर्षारंभीं नैवेद्य अर्पण करणें हेंहि तितकेंच स्वाभाविक आहे. परंतु कालान्तराने एकाबरोबर सर्वच देवांना नैवेद्य घालण्याचा परिपाठ पडूं लागला. ह्या कारणास्तव श्रावण महिना हाहि नैवेद्यांचा काल समजला गेला. श्रावण महिन्यांत दररोज केव्हाहि

एकदा, दर श्रावणे सोमवारीं, एका श्रावणे सोमवारीं असे नैवेद्य दाखविण्याचे प्रकार सुरू झाले. तथापि तिसऱ्या सोमवाराचा निषेध कित्येकांनी कां मानला आहे त्याचें कारण समजत नाही. हे लोक तिसरा सोमवार वगळून बाकीच्या कोणत्याहि श्रावण सोमवारीं नैवेद्य घालतात. ह्याच्या उलट कित्येक श्रावण वद्य पक्षांतील सोमवारींच नैवेद्य दाखवितात. एका फाटकांना व दात्यांना तिसरा सोमवार वर्ज तर मिरजेचे दातार ह्यांना श्रावणांतील तिसराच सोमवार नैवेद्य घालण्यास प्रशस्त वाटतो ! हा घरसोडपणा क्षणभर बाजूस ठेवला तर एवढें निश्चित की, थोरल्या दिवाळीला समस्त देवतांना व श्रावणांत शंकराला नैवेद्य दाखविण्याची जी रीत अद्यापि कित्येक कुटुंबांनी चालविली आहे तीच मूळची होय. श्रावण महिना हा शंकराचा आहे. श्रावण महिन्यांत नैवेद्य अस्थानीं नाहीत, परंतु फफे व दाते ह्यांच्यांत ज्येष्ठ मासांत नैवेद्य घालण्याचा रिवाज कां पडला असावा ह्याचा उलगडा होणें कठीण दिसतें. वर्षारंभाचे महिने तर हे नसतील ! एका सहस्रबुद्ध्यांकडे विकल्प केला जातो. वैशाख अथवा ज्येष्ठांत ते नैवेद्य घालतात. ह्यांतहि वैशाख महिना कां यावा समजत नाही. ह्याच सहस्रबुद्ध्यांचा दुसरा विकल्प फा. वा ५ किंवा चैत्र शु १ हा होय. ह्यांच्याच लिहिण्यावरून वैशाख अगर ज्येष्ठांत दाखवावयाचे नैवेद्य मार्ग मळण्याच्या प्रसंगाचे आहेत हें विसरतां कामा नये. गांवाबाहेर जाऊन स्वयंपाक करून भोजन करणें ह्यास मार्ग मळणें म्हणतात. ह्या वेळीं क्षुद्र देवतांना विशेषतः अन्न समर्पण करतात.

शंकराला सोमवार, विशेषतः श्रावणी सोमवार, त्याप्रमाणे रवळनाथाला रविवार. दर रविवारीं रवळनाथाला नैवेद्य दाखवितों असें गोळपचे गोगटे सांगतात. ह्यावरून रवळनाथ म्हणजे सूर्य असावा असें अनुमान निघतें; परंतु त्याच गांवचे दुसरे गोगटे लिहितातः "श्रीरवळनाथ हा स्वयंभू

आहे. त्याचे पिंडीचीं छकलें झालेलीं आहेत. कारण त्या ठिकाणीं चिवारीचें बेट होतें. तेथे गाय नेहमी दुधाचा पान्हा सोडी. पुढे स्वप्नांत कोणा-(ला) दृष्टान्त झाला. सबब तेथे खणतांना पिंडीचीं छकलें झालीं अशी दंतकथा आहे.'' ह्यावरून खळनाथ शंकर दिसतो. खळनाथाच्या लिंगाची ही हकीकत गोळपचीच आहे. असें असतां एका गोगटयांकडे खळनाथाला रविवारीं नैवेद्य कां दाखवतात ह्याचा शोध करण्यासारखा आहे. प्राचीन काळीं कोंकणांत सूर्याचीं देवळें होतीं. शिवोपासना सुरू झाल्यावर सूर्योपासना मागे पडली असें असण्याचा संभव आहे. खळनाथ हें सूर्याचेंहि नांव असावें. परंतु खळनाथाचें कूळ हा शब्दप्रयोग दरिद्री माणसासंबंधाने करण्याचा प्रघात आहे त्यावरून खळनाथ म्हणजे भिकारी शंकर असावा असें वाटतें.

कांही ग्रामदेवींना दर मंगळवारीं नैवेद्य दाखविण्याची वहिवाट आहे ( घनवटकर, बापट–चंडिका ) तर भगवतीच्या नांवाने पौषी पौर्णिमेला नैवेद्य घालण्याची चाल पुष्कळ कुटुंबांत आहे. हे विशिष्ट प्रकार सोडले तर सरराहा ग्रामदेवतांना नैवेद्य घालण्याची तिथि म्हणजे मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा होय. सुमारे ६५० लोकांपैकी २०० जणांकडे ह्या एकाच तिथीला नैवेद्य दाखवितात. ज्यांच्यांत नैवेद्यांची ही तीथ नाही अशीं फक्त १८ कुटुंबेंच निघालीं. ह्यावरून मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेचें महत्त्व प्रतीत होतें. वर्षातून एकदा, दोनदा, तीनदा, चारदा व पांचदा नैवेद्य घालण्याची चाल निरनिराळ्या कुटुंबांतून आहे. परंतु त्यांत बहुधा मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा नाही असें होत नाही. दोन पाडवे, थोरली दिवाळी, होळी व दसरा ह्या दिवशीं सामान्यतः कोंकणांत नैवेद्य घालतात. हे सण आहेत. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेला थोरली अथवा देवदिवाळी असते. आश्विनांतील धाकटी दिवाळी होय. देवदिवाळीविषयी फारशी माहिती उपलब्ध नाहीं.

मार्गशीर्ष महिना विशेषतः विष्णूचा आहे. असें असून विष्णूच्या ऐवजी शुद्ध ग्रामदेवतांना नैवेद्य समर्पण करण्यांत येतात. मार्गशीर्षमाहात्म्यांत शुद्ध प्रतिपदेविषयी कांहीएक सांगितलेलें नाही. माहात्म्यकारास ह्या देवदिवाळीची वार्ताहि नव्हती असें दिसतें. चित्पावनांखेरीज मार्गशीर्ष शु॥ १ चें महत्त्व कोणासहि नाही. आणि चित्पावनांत सुद्धा नैवेद्य दाखविण्यापलीकडे कांही करीत नाहीत. आता मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदेलाच नैवेद्य दाखविण्याचें कारण केवळ देवदिवाळी हेंच असावें. आता ही दिवाळी कोणत्या लोकांत पाळली जाते हें पाहिलें तर शूद्र लोकांतहि ह्या दिवाळीला नैवेद्य दाखविण्याची चाल आहे असें समजतें. गांवचा खोत हा गांवातर्फे देवदिवाळीला ग्रामदेवतांना नैवेद्य दाखवितो.

# १० भाषा

१

"बाबी भिम्ये, आज किती दिवस तुझे कानीं कपाळीं मे एकसारखो टाहो फोडचां सां सांग बरां ! पण तुझां आपलां 'सब सोडेंगा नि एक पकडें गा,' से तां से. बाबी गो, तुझां एतां लौकरच हें बारावां वरीस पाठी पडेवे आयलां. देवदया झाली तर माही शिमगे हारीं तुझां वऱ्हाड-दखील होएल. तुला सासरां कसां मिळचे ही एक रातदिवस आमला काळजी सेच. पण तां कसांहि बरां वाईट मिळालां—आई भोवानी कुळ-स्वामिणी, माझ्या ह्या बाबीला चांगलां घर मिळों दे ग्ये बाई, मग तुझी खणानारळांय् ओटी भरीन—तरी तूं त्याहांची सासरेवाशीण खरीनी ! मग एठांचे गत त्याहां अष्टौ प्रहर पुस्तकां नि कागद का वाचीत बेसतां येल तुला ! तूं म्हणसील त्यांहां पुस्तकां की वाचीत बेसन मे, नि वाचे-नांसां वाटलां तरी कां येक मिळणार पण नाहीं; हें तुझां म्हणणां खरं सलां तरी बाबी गो, वाडवडलांची म्हण से 'जो गुण बाळा तो जन्मकाळा।' ती खरी से. बाळगुण सुटेवो नाहीं. कामा उद्याला लाहानपणापाही आंग मळेवां लागचे. कामाधामाची रीतभात ठाऊक होयवे हवी. आज वेरीं हैंतलां एकय् गम्य तुला नाहीं. उद्यां तूं सासरें गेलीश नि कांयेक करतां येयनासा झालां म्हणजे सासरची माणसां कितां म्हणतील बरां ! म्हणतील, आय्शीन लाडकोबा करनी ठेवलीन से. अशीं माझे कपाळावर मिऱ्यां वाटीत रेहेतील. मालाय तां वाईट नि तुझे डोळेठी टिपां गळेवेचीं.

घाकटें बाबत वडीलधारे माणसांचे मनांत किती परची हुरहूर लागत रेहेचे ! पण तेंत दखील बोड्यें:शां चेडीबाळींची अधिक. अदी त्यांना

सासरां कसां मिळेल, सासरर्ची माणसां कशी वागयतील, घोवालाश ती कशी आवडेल, एक नी दोन किती म्हणी सांगू ! चेडीचे कसलेय बोभाटे झाले नाहीं नि ती नीट नांदों लागली म्हणजे आयशी बापसांना हायसां होवनी गंगांत तेंचे गोडे न्हायवेचे.

एतां तूं म्हणशील माझां एडला वऱ्हाडच करूं नये म्हणजे झालां. ते बापूसायबांची इंदूताई १७-१८ वर्सांची झाली, पण त्याचां कें लगीन केलींसे; ती अजून साळाकालेजांत शिकचेच से. पण बाई ग्ये, तेंची गोष्ट आणीक से. ते पडले बगूतेवार मातूबर; मनांत आयलेबरोबर चिटक्यासरसां लगीन करनी मोकळे होतील, तेंय् शब्द टाकलेबरोबर हवो तेला वांकयतील. तेंची गोष्ट कें नि आमची कें ! तरी दखील माला वाटचे तां मे सांगचां. चेडी अशो १८-२० वर्सांवेरी लगीन न करतां घोडनवऱ्यो करणां बरां नाहीं. कीं म्हणशील तर अशी आपलेपणांत आयलेली मोठी बायाको लगीन झालेबरोबर आपले दादलेचे चाकऱ्यावर जायवेची; मग कितां तीं उल्लु झालेलीं दादलो बायाको हवे तसे थेर उडयचत. कोण बोलतां नाहीं सवरतां नाहीं, मग त्याला सास्वाची ओळख कसली नि सासरेचो मान कसलो ! आपण नि आपलो नारो ! कशी रीत निरवेस लागेवी ! आम्ही जुनीं माणसां खरीं, आतांशाच्यो खाणे-जेवणेच्यो परी, नि तो नटवेपणा आमला काय ठाऊक ! पण बाई ग्ये, जुनां झालां तरी सगळांच टाकाव नसचे. माणसाला आपलेपणाचो थोडो-तरी अभिमान हवो. आपलो धर्म, आपले आचारविचार, आपल्यो चाली-रीति, विचार केलो तर पुष्कळ बऱ्यो सत. पण विचार कोण करचे ! गोमेन केलान म्हणीन सोमेन करेवेचा ! आपलां गैर सेल तां सोडे वां, दुसरेचां चांगलां सेल तां घेवां. पण आपला तां सगळां वाईट नि दुसरेचां सगळां चांगलां हें खरां नाहीं. असो.

हेसंबंधान कितीतरी सांगेवे जोगांसे. पण तूं कंटाळशील म्हणी एतां आटपचां. तरी पण माझे अणखी दोन शब्द ऐक. तूं एतां जाणती होत जायवेची, सगळां ठाऊक होयसां हवां, म्हणी थोडथोडां सगळां करूं लाग, म्हणचे येतां होवनी कें गेलीश तरी कोणी नांव ठेवणार नाहीं."

२

"बाबी, केडला आयलोश ! सगळीं खुशाल सतनीं ! हातपाय धोवलेश का ! तुला गुळपाणी मिळालां नी ! आमचे एठा चहाकाफ्याची सवय नाय बाबी कोणाला, नि आम्हीं तो आणीतय नाहीं. थोडे पहूबिहू खाचश का ! भुकायलो सशील. एतां जेव्वेला दवील लोकरच होएल. आज बळकट दिवस देवळा गेल्यां नतल्यां. आज सोमवारचां देवदर्शन घेवनी यवांसां वाटलां म्हणी गेल्यां. देवदर्शन घेतलां, ओळखीदेखीच्यो चार बायको भेटल्यो, तेंचेजवळ अमळशी बोलत बसल्यां, म्हणी दोन घटका उशीर झालो. पण पुणें मुंबईहारची बातमी समजली; बरां झालां. खरां बघितलां तर देव म्हणचे देवळांत बरीक सचे, घरांत नाहीं, असा थौडांच से ! तो जगाचो मायबाप जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं, जकडा तकडा भरलेलोच से. पण पुष्कळ माणसां एकदम एकजागे भेटेवीं. सगळेंच्यो ओळखीदेखी होयव्यो, सगळेंची ख्यालीखुशाली एकामेकांना समजेवी, कमजास्ती गरजो कळेव्यो, आपलेपण वाढत जायवां, कांही गोष्टी सगळेंच्या जुटीन होयवेच्यो सचत तेंचो विचार करेवो, म्हणचे थोडकेंत सांगों का ! गावांत एक शिस्तीची जूट होयवी, म्हणी एक जागा; नि भावना बेसणेसारखी ती पवित्र, अशी कोण भाग्यपुरूषान ती ठरवनी ठेवलीन; नि सगळेंच्यो वरचेवर एकदम भेटी होणेसाठीं वेगवेगळे पुष्कळ उत्सव केलेन. अशो कितीतरी पुष्कळ चांगल्यो रीती नि शिस्ती आपले वाडवडलांनी पाडलेल्यो नि चालत आयलेल्यो सत. पण तेंचो बरोबाईटपणा कळचे से कोणाला

नि तेप्रमाण वागचे से कोण? मे मुंबईपुणेसारखे मोठे शहरांत गेल्यां वावरल्यां नाहीं, पण केडला केडला आयकों येचे, नि मुंबईहारठीं आयलेलीं लाहान मोठीं बरींच माणसां आढळचत, नि घरांत दखील केडला तरी बोलणीं होचत, तेवरठीं आपले चांगलें रीतरिवाज अगदी सुटत चालले-सां दिसों लागलां, हें बरेचां चिन्ह नाही. दिवसान्‌दिवस भलमलत्योपरी नि चोचले वाढत चालले; तेमुळां दुनिया भिका लागली. कितां ते बूट, पाटवणी का पाटलणी, आंगांतलीं आंगडीं तरी किती परचीं नि एकावर एक, नि तेंना पाठीपोटावर बंद किती, गळेंत लोंबत्यो चिंध्यो कितां, डोयावर केसांची झिपतरां नि शिपतरां कितां, एक नि दोन, कांयेक ताळ-तंत्र रेहेलो नाहीं. रोज सकाळीं उठलेबरोबर आदी पोरांबाळांसकट चाहा नि भिस्कुटां हवीं; तेशिवाय म्हणे परसाकडाच होत नाही, कसल्यो घाणेरड्यो ह्यो सवई!! रागां भरों नाकां. बरें वाईटाचो विचार करणारो तूं सश, नि नावडते बोलणारे माणसाला ईंगडायवेचो नाहीं, म्हणी तुझे-जवळ बरे वाईट दोन शब्द बोलेवेसे वाटचत. तरी दखील माला वाटचे तां मे अगदी थोडकेंत सांगचां.

पहिलेन बुटाचीच गोष्ट बघीश नायू. आपले पाईची ठेवण कशी से? पावलान्चे बोटांहारचो भाग सगळेंत रुंद, नि तेचे उलट बुटाचो तकडाचो भाग अरुंद, मग बुटांत पाऊल घातलेवर चवंडो आवळेल का नाही? नि तेला रग लागेल का नाही? बरोच वेळ झालेवर पावलां उन्नतील का नाही? आंगाला इजा होणां चखोट का? घालेवे काढेवे किती वेळ लागचे? बरां इतकां सोनी मोल तरी थोडां का? दुप्पट तिप्पड पैको बेंचेवेंचो नि तो सगळो परावे लोकांचे हातांत जायवेचो. पण आपले-हारच्यो वाहाणो बघ, सगळे हारठीं सोय.

तीच गत पाटलणीची. आदी ती जाडे कापडाची सेवेची. बेसतां उठतां

कोण त्रास ! हें मे आज देवळांत दोघां पुरशांचां आपले डोळेंस् बघितलां. मुंबईहारठीं हे थेर आयले. आपलीं घोतरां, पंचे किती बरां सुटसुटीत !

डोयावर म्हणचत शिपतरासारख्यो टोप्यो घालचत. ह्यो सगळ्यो पराव्यो चाली. असां अणखी कितीतरी सांगणेसारखां से.

बाबा रे, देश तसो वेश, अशी म्हण से. आपलेहारची हवा फारशी थंडय् पण नाही, नि बळकट उष्णय् पण नाही. तेसारखो घोतरां, पंचे, बंड्यो असलोच पोशाक चखोट; नि तेणीनच देहाला सुख होएल.

माणसान घे म्हटले आपलेपण सोडूं नये. दुसरेचां चखोट सेल तां घेवां. पण उठले सुटले दुसरेच्यो सगळ्योच तऱ्हा घेणां अगदी वाईट. खाणां, पिणां, पोशाक, बोली, आचारविचार, धर्म हें तेचां तेणीन सोडतां कामा नये. तेंत आपलेपणाचो अभिमानच हवो. आतांशा पुरुष, बायको, धाकटीं, बघेवीं तीं अगदीच आपलीं शेळपट दिसचत. तरणेताठे बांड पुरशांना पहिले म्हातारेंचां अवसान नि रग नाही. मे अजुनी दोन दोन तीन तीन कुडवांचे पहू कांडूं लागल्यां तर मुसळ खाल ठेयणार नाहीं. नि एतांच्यो तरण्यो बायाको दोन पायल्यांचा भाताचां तपलां उतरतांना हासामूस होचत. असां की होऊं लागलां हेचो कोणच विचार करीत नाही. दिवसान् दिवस सगळ्याच गोष्टीज् भिकारपण नि दुबळेपण वाढत चाललां. हेचो सगळेंज् विचार करनी आपलां हितसाधन करेवे हवां. नि हें साधेवे तुमच्नसारखे शिकले-सवरलेले नि तरणे लोकांज् मनापाष्टीं झटेवे हवां. पुरे एतां. देव तुझां भलां करू."

३

## मुंडाज्याचो समाचार[१]

"ता. ४।९।३६ चे दिस्सं आमचे भिडेंडाचे स्कूलांतु मोठी सभा झाली.

---

१ ही गोष्ट मुंडाज्याचे रा. भिडे ह्यांजकडून आली आहे.

जिल्लेचे आघे अधिकारी आय्ले छले. हें स्कूल भिडेंडाचेयी नवं बांधितलेलं. हें ता. १।८।३६ पास्टीं सुरूं छवुनी एश्शा त्यांतु २८ धाकुटीं त्सति. ह्मारांची धाकुटी सुद्धा मस्त येत्सति असं झालं तें आघेंचो उद्धारु ह्यवे बरो काळु लाग्गो नायि.

मद्रास सरकाराचे ग्रामोद्धर कार्यांतु आमच्या मुंडाजीला ही स्थान ण्केलं त्सोकट्ची. पण हें तु फित ह्यर तं पुडं कळं ह्व. इतलंचि."

४

"दुष्टांघा आश्रयो दिय्लो ते ह्यिवेचो परिणामु बरे मायावी जालेले असले. आतापि, वातापि, इल्वल असे तीघे राक्षस सले. त्यांतु दोघ फळं, पक्वान्न इत्यादि खायिवेचे पदार्थ होवुनि राहाले. तीस्रेळीनमट्टे तपस्वी ब्राह्मणाचं रूप घेत्लनं. अनिक वाट्टां तुजां ते लेंधा कोणा तरि अतिथीचि वाट पलावितु बेट्लोसे, असं दाररव्वेवुनि, वाट्टावेलियं जांतेले मनुष्यांघा अति आग्रहेन आप्ले आश्रमां तुहाण्णि. मायान निर्माण केल्लेले पदार्थ खाय्वे देसलो नि "यारे स्नेहितांनो! असं साद्देयिसलो. तत्क्षाणिंचि ते फळादिकांचे राक्षस ह्वुनि पोट फोड्डनि बाहेरु येसले. अर्थात् ते मनुष्यांचो प्राणु जासलो. राक्षसांघा संतोषु ह्सलो. असं, इंत सलं. एदा महामुनि अगस्ति हे प्रसंगांतु अडकलो. पण तो सलो दिव्यज्ञानी. तेलां तीं फळं खांतां घाचि हें कपट कळोनि तेळिन. त्याहांचि तें घाजिर् वेविनि सोड्लेन. आद्दिला सारखंचि एक राक्षसो सुयेवुनि तेंधा साद्देवु लागलो. पण ते जीर्लेसलेनि, येंतिर केह्ेठी! ते वेल्यं तो राक्षोसुय्यहोनि समुद्रांतु जावुनि लिक्कालो. तसं आगस्तीन तो आवुघो समुद्रचि एका घोट्टानं प्येवुनि सोडूनि ते दुष्टांचो नाशु केल्लोतु. हें चोख्खटाचि जालं! पण तो पाप समुद्राला दुष्टाला टिं भोवेळु आश्रयो दिय्लेले मात्रानचि नाशु हैवेचि पाळी

आय्ली. आखेयालॆ मट्टे मट्टेयि विचार्लेलें निमित्य मुत्ताचे रूपानं अगस्तीन तेला बाहेरु काढयेलोनु. तरी पण तेला खारटपणा आयिलं तं आयिलंचि ! पळा दुष्टाला आश्रयो दिल्लेलेचं फळ कितं जालं तं !"

भाषांतर

आतापि, वातापि, इल्वल हे तिघे राक्षस मोठे मायावी होते. त्यांनी एका दोघांनी कांहीं फळें, पक्कानें वगैरे कांहीं खाण्याचे पदार्थ बनविले. एकाने मोठ्या तपस्वी ब्राह्मणाचें रूप घेऊन मार्गांत जणू कोणा अतीताची वाट पहात बसला आहे असें दाखवून, कोणी एखादा मनुष्य त्या मार्गानें जाऊं लागला की त्यास आग्रह करून आपल्या आश्रमांत नेऊन ते मायेचे पदार्थ खावयास द्यावे. नंतर 'या रे गड्यांनो' अशी हांक मारतांच त्या फळांचे राक्षस बनून ते पोट फोडून बाहेर पडत. अर्थातच त्या मनुष्याचे प्राण जाऊन ह्यांची चंगळ उडे. एके प्रसंगीं अगस्ति महामुनि ह्यांच्या प्रसंगांत सांपडले. ते होते अंतर्ज्ञानी पुरुष. त्यांनी तीं फळें कंठांत घालतांच हें कपट समजून तेथच्या तेथेच त्यांची रक्षा करून टाकली. चालीप्रमाणे एक राक्षस त्यांच्या नांवाने त्यांस हांक मारूं लागला. पण त्यांची रक्षा झाली ते बाहेर कोठून येणार ! त्यामुळे हा भयभीत होऊन समुद्रांत जाऊन लपला. अगस्तीने साऱ्या समुद्राचा एकच घोट करून त्या सर्व दुष्टांचा निकाल केला. हें तर ठीकच झालें. पण बिचारा समुद्र त्या दुष्टास क्षणमात्र थारा दिल्यामुळे नाश पावल्याच्याच रंगांत आला. शेवटीं मग मोठमोठ्यांच्या भिडेनें अगस्तीने लघुशंकेच्या रूपाने अगस्तीने त्यांस बाहेर काढलें. तरी त्यांनीच संगतीमुळे त्याला क्षारपणा आला तो आलाच. पाहा दुष्टास आश्रय दिल्याचें फळ काय झालें तें !" श्री शुभमस्तु ॥ ॐ ॥

## चित्पावनी भाषांतलीं पदां

### पद १ लां

कृष्ण तुझो धटकी । बायो कृष्ण तुझो बटकी ॥ध्रु०॥
गोवों राखचे दिसचे मोठो । म्हणचे तुम्हि बटकी ॥बायो० १॥
चालचे दुडदुड बोलचे फडफड । नाचचें जसो नटकी ॥बायो०२॥
मोठो होचे लाहान होचे । बोव्यो तुझो चटकी ॥बायो० ३॥
म्हणचे गायवीं प्रभुगुणगाणीं । वाजयनी चिटकी ॥बायो०४॥
साधुसज्जनां पोशिन म्हणचे । मारिन खळ झटकी ॥बायो०५॥
आत्मारामीं प्रेमकृपाधन । दिवसनिशीं हटकी ॥बायो०६॥

### पद २ रां

वेणू वाजयचे । देहुडा वेणू वाजयचे ॥ध्रु० प०॥
देवभावना सर्वोभूतीं । तेला हो कळचे ॥देहुडा० १॥
भाविक भोळे दृढविश्वासी । तेंना हो फळचे ॥देहुडा० २॥
योगतपांहीं नच उमगे जो । तो भजनान् मिळचे ॥देहुडा० ३॥
आत्मारामा देत विसावो । यम दुर्धर पळचे ॥ देहुडा० ४॥

### पद ३ रां

एतां कितां करूं बायो, एतां कितां करूं ।
बांधों जाचां पळों लागचे कसो हेला धरूं ॥ध्रु० प०॥
यशोदाबाई सांगों आयल्यां गोविंदाच्यो खोड्यो ।
दिसचे गरीब मेंगळतोंड्यो, लाडको तुझो बोव्यो ॥ एतां कितां करूं ध्रु० ॥१॥
हळूच येवनी डेरेंत बघचे खाचे सगळां लोणी ।
येंब नाहीं दुभतेचो ग्ये, फोडनी टाकचे दुधाणीं ॥ एतां कितां करूं० ॥२॥

घातळां जरी उन्हवणी, येत नाही लोणी ।
ताक सगळां नायसां होचें, दिसचे शुद्ध पाणी ॥ एतां कितां करूं० ॥३॥
गाई सोडनी, तेंच्या जागां, बईल सगळे बांधचे ।
धार काढेवेला जाञ् तों माझी फसगत होचे ॥ एतां कितां करूं० ॥४॥
निजल्यो पोरी लोणी फांसचे तेंचे तोंडावरतां ।
गांवांत् थारो उरलो नाहीं, हंसचे बोभाट करतां ॥ एतां कितां करूं० ॥५॥
सुप्रभातीं उठा म्हणजे करा त्रिणीफणी ।
बायाकांचे धर्म पाळा, घाला तुळशी पाणी ॥ एतां कितां करूं० ॥६॥
परावे घरा जाऊं नये गोष्टी सांगेवेला ॥
धर्मनीतिच्यो गोष्टी सांगचे, कितां करूं हेला ॥ एतां कितां करूं० ॥७॥
आत्मारामीं रेहेचे उभो हृदयमाजघरीं ।
बघतां हरलां मीतूंपण हें । सुटली जन्मवारी ॥ एतां कितां करूं० ॥८॥

## व्याकरणविषयक सामान्य विचार

ह्या भाषेची घटना भाषासंशोधकांच्या कसोटीवर घासून निघाल्यास कदाचित्–चित्पावन ब्राह्मणवर्गाची वसाहत कोणीकडून कशी प्रसृत होत गेली वगैरे–मोठ्या तत्त्वावर प्रकाश पडण्याचा संभव आहे. महाराष्ट्रग्रंथभाषेशीं चित्पावनी भाषेची तुलना पाहतां भिन्नता दिसते ती :–

### व्याकरणविशेष[1]

स्वरांपैकी ए आणि ओ ह्यांचा उच्चार कांहीसा आडवा म्हणजे ए चा अ, ए ह्यांच्यामध्ये (इंग्रजी an, cat, ह्या शब्दांतील स्वरोच्चाराजवळचा आणि ओ चा अ, ओ ह्यांच्यामध्यें (इंग्रजी on, ox, not. ह्या शब्दांतील स्वरोच्चाराजवळ जवळ) होतो.

---

१ कृ. गो. साठे ह्यांचा म. सा. पत्रिकेंतील लेख.

ह्या उच्चारांसंबंधाने एका शोधक विद्वद्वर्यांचा अभिप्रायः—

"एङ् ओङ् सूत्रे महाभाष्ये

ननु च भोश्छंदोगानां सात्यमुग्रिराणायनीयां अर्धमेकारमर्धमोकारं चाधीयते– सुजाते ए अश्वसूनृते अध्वर्यो ओ अद्रिभिः सुतं, शुक्रं ते ए अन्यत्, यजतं ते ए अन्यत्– इति।

पार्षदकृतिरेषा तत्रभवताम्। नैव हि लोके नान्यस्मिन् वेदे अर्धं एकारोऽर्धं ओकारो वास्ति ॥

सामवेद्यांतील सात्यमुग्रिराणायनीय शाखेचे लोक सामगायन करतांना ए अथवा ओ च्या पुढील अ चा लोप करीत नाहीत किंवा प्रकृतिभावहि करीत नाहीत.

प्रकृत्यान्तःपादमव्यपरे। पा. अ. ६।१।११५.

ह्या सूत्राने अ चा लोप न होतां प्रकृतिभाव प्राप्त असतां हे सात्यमुग्रिराणायनीय शाखेचे लोक गायनपद्धतीला अनुरूप असा एकार किंवा ओकार अ च्या स्थानीं करतात. आणि हा अर्ध एकार व अर्ध ओकार सांप्रत कानडी, तामिल, तेलगू आणि मल्याळ या चार भारतीय भाषांत आहे."

## शब्दस्वरूप

१ नात्याचे वाचक शब्द शकारान्त असतात; जसें:– आईश, बापूश, भाऊश, बेहणीश, चुलतूश, चुलतीश, आतश, घोऊश, ससरूश, सासूश, देरूश, जाऊश, नंदश, सुन्हश.

२ (अ)–महाराष्ट्रग्रंथभाषेंतील आकारान्त शब्द चित्पावनी भाषेंत ओकारान्त असतात; जसें–घोडो, भोपळो, चौथरो; पायल्यो, चिंध्यो, पोथ्यो; लाडको, शाहाणो; त्यो, ह्यो, ज्यो, हो; निघालो, आयलो, बोलल्यो, हवो (क्रियाप.), ठेयलो, इ०

(ई) एंकारान्त शब्द आंकारान्त आहेत; जसें–केळां, सोनां, भांडां, फुलां, गवतां, तां, जां, पांढरां, तांबडां, बकरां, उभां, आडवां.

गेल्यां, म्हटलां, हवां, बोलल्यां, आइकलां, फुटलां इ०

(ऊ) वकारान्त धातु यकारान्त; आणि प्रयोजकभेदी व प्रत्ययाच्या स्थानीं य प्रत्यय– जसें– जेय, ठेय,

करय, फिरयलो, सोपयचे, चालयली, घेवलयां, इ.

अपवाद– चाव धातूच्या व स्थानीं य होत नाहीं.

सामान्यरूप

चित्पावनी भाषेंतील शब्दघटनेप्रमाणें–एकवचनी सामान्यरूपाचे प्रकारः

१ अकारान्त, (अ) पुन्नपुंसक शब्दांचीं आकारान्त; जसें:–

देव-देवा, माणूस-माणसा, पाट-पाटा, चित्र-चित्रा.

(आ) अकारान्त व इकारान्त स्त्रीलिं. (१) जीभ-जिभा, चिंच- चिंचा, वाट-वाटा.

(२) भित-भिती, चेड-चेडी, थाळ-थाळी.

२ आंकारान्त नपुंसक शब्दांचीं एकारान्त; जसें:–

तळां-तळे, केळां-केळे, लोणचां-लोणचे, फुरसां-फुरसे.

३ ईकारान्त स्त्रीलिंगी व नपुंसक शब्दांचीं याकारान्त; जसें:–

भिमी-भिम्हा, खुटी-खुट्या, पायली-पायल्या, घोडी-घोड्या, इनवटी-इनवट्या, बुगडी-बुगड्या, काठी-काठ्या, पाणी-पाण्या, लोणी-लोण्या; इ.

४ ऊंकारान्त नपुंसक शब्दांचीं आकारान्त; जसें–

लिंबूं-लिंबा, गोरूं-गोर्वा, वासरूं-वासरा-वासर्वा, काडूं-काडवा, तारूं-तारवा; इ.

५ ओकारान्त– (अ) पुंल्लिंगी शब्दांची एकारान्त; जसें:–

घोडो-घोडे, पाळणो-पाळणे माचो-माचे, आंबो-आंबे, पाटो-पाटे, हो-हे, जो-जे- तो-ते; इ.

(आ) स्त्रीलिंगी आकारान्त-बायाको-बायाका.

अनेकवचनी सामान्यरूपें एकवचनी सामान्यरूपांप्रमाणेच. परंतु अन्त्य वर्ण सानुनासिक असतो.

विभक्तिप्रत्यय

| | एकवचनी | | अनेकवचनी | |
|---|---|---|---|---|
| | प्रत्यय | प्रत्ययान्त शब्द | प्रत्यय | प्रत्ययान्त शब्द |
| प्रथमा | ० | फूल, करंद | आं | फुलां, करंदां |
| | | गाय, कोशिंबीर | ई | गाई, कोशिंबिरी |
| | | केळां, पातेलां | ई | केळी, पातेली |
| | | घोडो, माचो | ए | घोडे, माचे |
| | | चिंच, वाहाण | ओ | चिंचो, वाहाणो |
| | | शेळी, छत्री, बी | यो | शेळयो, छत्र्यो, बियो |
| | | बीं | यां | बियां |
| द्वितीया } चतुर्थी } | ला | माला, हेला | ला | आमला, तुमला |
| | | गाईला, विठूला | ना | तेंना, हेंना, जेंना, देवांना, गाईना, वासरांना, चिंच्यांना |
| तृतीया | न | देवान, गडयान | य | देवांय्-ञ्, गडयांय्-ञ्, तेंय्-ञ्, |
| | णीन | तेणीन, होणीन | किंवा | हेंय्, जेंञ्, फुलांञ् |
| | | जेणीन | ञ् | |

नमुन्यासाठी कांही विभक्तियुक्त शब्द

| विभक्ति | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्रथमा | देव | देव |
| द्वि.+च. | देवाला | देवांना |
| तृ. | देवान | देवांय्-न्‌ |
| पंच. | देवापाशीं | देवांपाशीं |
| | देवापक्षां | देवांपक्षां |
| | देवाहारठीं | देवांहारठीं |
| षष्ठी | देवाचो (प्रसाद) | देवांचो (प्रसाद) |
| | देवाचो (उत्सव) | देवांचो (उत्सव) |
| | देवाची (भक्ति) | देवांची (भक्ति) |
| | देवाच्यो (गाई) | देवांच्यो (गाई) |
| | देवाचां (नांव) | देवांचां (नांव) |
| | देवाचीं (वस्त्रां) | देवांचीं (वस्त्रां) |
| सप्तमी | देवांत | देवांत |
| प्रथमा | कोयती | कोयत्यो |
| द्वि. च. | कोयत्याला | कोयत्यांना |
| तृ. | कोयत्यान | कोयत्यांन्‌-य्‌ |
| प्र. | मामा | मामा |
| द्वि. च. | मामाला | मामांना |
| तृ. | मामान | मामांय्-न्‌ |
| | मामानश | मामांशीय्-न्‌ |
| पं. | मामापाशीं | मामांपाशीं |

| विभक्ति | ए. व. | द्वि. व. |
|---|---|---|
| | मामापक्षां | — पक्षां |
| | मामाहारठीं | — हारठीं |
| ष. | मामाचो (लोभ) | — चो (लोभ) |
| | मामाचे (मळे) | — चे (मळे) |
| | मामाची (शेती) | — ची (शेती) |
| | मामाच्यो (म्हशी) | — च्यो (म्हशी) |
| | मामाचां (सोवळां) | — चां (सोवळां) |
| | मामाचीं (झाडां) | — चीं (झाडां) |
| स. | मामांत | मामांत |
| प्र. | चाकू | चाकू |
| द्वि. च. | चाकवाला | चाकवांना |
| तृ. | चाकवान | चाकवांञ्-य् |
| पं. | चाकवापक्षां | — वांपक्षां |
| | — पाष्टीं | — पाष्टीं |
| | — हारठीं | — हारठीं |
| ष. | चाकवाचो | चाकवांचो |
| | — चे | — चे |
| | — ची | — ची |
| | — च्यो | — च्यो |
| | वगैरे | वगैरे |
| प्र. तृ. | मे | आम्ही |
| द्वि. च. | माका | आमका |

| विभक्ति | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| पं. | माझेपाष्टीं | आमचेपाष्टीं |
| | माझेपक्षां | आमचेपक्षां |
| | — हारठीं | — हारठीं |
| ष. | माझो (गडी) | आमचो (गडी) |
| | माझो (हात) | आमचे (हात) |
| | माझी (चेड) | आमची (चेड) |
| | माझ्यो (आंगठ्यो) | आमच्यो (आंगठ्यो) |
| | माझां (कूळ) | आमचां (कूळ) |
| | माझीं (फुलां) | आमचीं (फुलां) |
| स. | माझेंत | आमचेंत |
| प्र. | बापूश | बापूश |
| द्वि. } च. | बापसाला | बापसांना |
| | बापालाश | बापांनाश |
| तृ. | बापसान | बापसांय् |
| | बापानश | ० |
| पं. | बापसापाष्टीं | बापसांपाष्टीं |
| | बापाशपाष्टीं | बापांशपाष्टीं |
| | बापसापक्षां | बापसांपक्षां |
| | बापाशपक्षां | बापांशपक्षां |
| | बापसाहारठीं | बापसांहारठीं |
| | बापाशहारठीं | बापांशहारठीं |
| ष. | बापसाचो | बापसांचो |
| | बापाचोश | बापांचोश |
| | बा स. चे | बापसांचे |

| विभक्ति | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| ष. | बापाचेश | बापांचेश, वगैरे |
| प्र. | जो | जे |
| द्वि. च. | जेला | जेंना |
| तृ. | जेणीन | जेंय्—न्स् |
| पं. | जेंपार्ष्टी, जेपक्षां | जेंपार्ष्टी, जेंपक्षां |
| | जेद्वारठीं | जेंद्वारठीं |
| ष. | जेचो (घोडो) | जेंचो ( घोडो) |
| | जेचे (पैसे) | जेंचे (पैसे) |
| | जेची (वांटणी) | जेंची (वांटणी) |
| | जेच्यो (चिट्यो) | जेंच्यो (चिट्यो) |
| | जेचां (जनावर) | जेंचां (जनावर) |
| | जेचीं (पुस्तकां) | जेंचीं (पुस्तकां) |
| स. | जेंत | जेंत |
| प्र. | आईश | आयशी |
| द्वि. } च. } | आयशीला | आयशींना |
| | आयालाश | आयांनाश |
| तृ. | आयशीन | आयशींन्स् |
| | आयानश | ० |
| पं. | आयशीपार्ष्टी | आयशींपार्ष्टी |
| | आयाशपार्ष्टी | |
| | (बाकी बापाप्रमाणे) | |
| ष. | आयशीचो | आयशींचो |
| | आयाचोश | ० |

| विभक्ति | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| | आयशीचे | आयशींचे |
| | आयाचेश | ० |
| | आयशीची | आयशींची |
| | आयाचीश | ० |
| | आयशीच्यो | आयशींच्यो |
| | आयाच्योश | ० |
| | आयशींचां | आयशींचां |
| प्र. | देरूश | देरूश |
| द्वि. } च. | देरालाश | देरांनाश |
| तृ. | देरानश | देराशांय् |
| प्र. | आजोश | आजेश |
| द्वि. } च. | आजेलाश | आजेनाश |
| तृ. | आजेनश | आजेशींय् |
| प्र. | जाऊश | जावशी |
| द्वि. } च. | जावालाश | जावांनाश |
| तृ. | जावशीन | जावशींय |
| प्र. | सासूश | सास्वशी |
| द्वि. } च. | सास्वालाश | सास्वशींना |
| तृ. | सास्वानश | सास्वशींय् -श् |
| प्र. | आतश | आतशी |

| विभक्ति | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| द्वि. च. | आतालाश | आतर्शीना |
| तृ. | आतानश | आतर्शींय्-ञ |

क्रियापदविचार (कालप्रधान) प्रत्यय

वर्तमान

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | आं | ओं |
| द्वि. पु. | श | आ |
| तृ. पु. | ए | त |

हे प्रत्यय फक्त अस् धातूचे आहेत. ह्या अस् धातूच्या पूर्व स्वराचा लोप होऊन स्वरात्मकं प्रत्यय पररूपसंधीने युक्त होतात.

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | चां | चों |
| द्वि. पु. | च श | चा |
| तृ. पु. | चे | चत |

हे प्रत्यय अस् धातूला पूर्वस्वराचा लोप होऊन रीतिवर्तमानकाळीं आणि इतर सर्व धातूंना वर्तमानकाळीं युक्त होतात. इतर धातूंचीं रीतिवर्तमानी रूपें त्या धातूंना त किंवा इत प्रत्यय लागून त्यापुढें (अ) स धातूचीं रीतिवर्तमानी रूपें योजून बनतात.

| भू. काळ कर्तरि | | | | भूत कर्मणि | | |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. पु. | (पुं.) | लों | लों | प्र. (पुं.) | लो | ले |
| | (स्त्री.) | ल्यां | ,, | (स्त्री.) | ली | ल्यो |
| | (न.) | लों | ,, | (न.) | लां | लीं |
| द्वि. पु. | (पुं.) | लोश | लेत | द्वि. (पुं.) | लेत, लेत | लोश, लेश |
| | (स्त्री.) | लीश | ल्योत | (स्त्री.) | लीत, ल्योत | लीश ल्योश |

| | | | |
|---|---|---|---|
| | (न.) | लांश | लींत |
| तृ. पु. | (पुं.) | लो | ले |
| | (स्त्री.) | ली | ल्यो |
| | (न.) | लां | लीं |

| | | |
|---|---|---|
| | (न.) | लांत, लीत लांश, लीश |
| तृ. | (पुं.) | लोन, लेन लीं |
| | (स्त्री.) | लीन, ल्योन ली |
| | (न.) | लान, लीन लीं |

भविष्य

| | | |
|---|---|---|
| प्र. | ईन, एन | ऊं |
| द्वि. | शील | आल |
| तृ. | ईल, एल | तील |

ह्यांत फक्त प्रथमपुरुषीं कर्ता असतां कर्माच्या लिंगवचनानुरूप क्रियापदरूपें बनतात. पण इतर पुरुषीं कर्ता असतां कर्ता व कर्म ह्यांच्या अनुरोधाने प्रत्यय लागून क्रियापदें बनतात.

कियापदरूपें (अ) स धातु

वर्तमान

| | ए. | अ. |
|---|---|---|
| प्र. | सां | सों |
| द्वि. | सश | सा |
| तृ. | से | सत |

रीतिवर्तमान

| | ए. | अ. |
|---|---|---|
| प्र. | सचां | सचों |
| द्वि. | सचश | सचा |
| तृ. | सचे | सचत |

भूत

| | | ए. व. | अ. व. |
|---|---|---|---|
| प्र. | (पुं.) | सलों | सलों |
| | (स्त्री.) | सल्यां | ,, |
| | (न.) | सलों | ,, |
| द्वि. | (पुं.) | सलोश | सलेत |
| | (स्त्री.) | सलीश | सल्योत |
| | (न.) | सलांश | सलींत |
| तृ. | (पुं.) | सलो | सले |
| | (स्त्री.) | सली | सल्यो |
| | (न.) | सलां | सलीं |

भविष्य

| | ए. | अ. |
|---|---|---|
| प्र. | सन | सों. सऊं |
| द्वि. | सशील | साल |
| तृ. | सेल | सतील |

जा धातु

| वर्तमान | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | जाचां | जाचों |
| द्वि. | जाचश | जाचा |
| तृ. | जाचे | जाचत |

| भविष्य | | |
|---|---|---|
| प्र. | जाएन | जाऊं |
| द्वि. | जाशील | जाल |
| तृ. | जाएल | जातील |

| भूत | | | |
|---|---|---|---|
| प्र. पु. | (पुं.) | गेलों | गेलों |
| | (स्त्री.) | गेल्यां | ,, |
| | (न.) | गेलों | ,, |
| द्वि. | (पुं.) | गेलोश | गेलेत |
| | (स्त्री.) | गेलीश | गेल्योत |
| | (न.) | गेलांश | गेलींत |
| तृ. | (पुं.) | गेलो | गेले |
| | (स्त्री.) | गेली | गेल्यो |
| | (न.) | गेलां | गेलीं |

हो

ह्या धातूला फक्त भूतकाळीं होच्याबद्दल झा आदेश होतो याशिवाय फरक नाहीं.

ये धातु

| | वर्तमान | | भविष्य | |
|---|---|---|---|---|
| प्र. | येचां | येचों | येन | येऊं |
| द्वि. | येचश | येचा | येशील | याल |
| तृ. | येचे | येचत | येल | येतील |

भूत

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. | (पुं.) | आयलों | आयलों |
| | (स्त्री.) | आयल्यां | आयलों |
| | (न.) | आयलों | आयलों |
| द्वि. | (पुं.) | आयलोश | आयलेत |
| | (स्त्री.) | आयलीश | आयल्योत |

| | | |
|---|---|---|
| (न.) | आयलांश | आयलींत |
| तृ. (पु.) | आयलो | आयले |
| (स्त्री.) | आयली | आयल्यो |
| (न.) | आयलां | आयलीं |

घर धातु

| | वर्तमान | | रीतिवर्तमान | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. | घरचां | घरचों | घरीतसचां | घरीतसचों |
| द्वि. | घरचश | घरचा | घरीतसचश | घरीतसचा |
| तृ. | घरचे | घरचत | घरीतसचे | घरीतसचत |

भविष्य

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | घरीन | घरूं |
| द्वि. | घरशील | घराल |
| तृ. | घरील | घरतील |

भूत (कर्मणि)

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. | (मैं पोपट) घरलो | (मैं वांसे) घरले |
| | (आम्हीं पोपट) घरलो | (आम्हीं वांसे) घरले |
| | (मैं चिमणी) घरली | (मैं चिमण्यो) घरल्यो |
| | (आम्हीं चिमणी) घरली | (आम्हीं चिमण्यो) घरल्यो |
| | (मैं पाखरूं) घरलां | (मैं पाखरां) घरली |
| | (आम्हीं पाखरूं) घरलां | (आम्हीं पाखरां) घरलीं |
| द्वि. | (तूं पोपट) घरलोश | (तूं वांसे) घरलेश |

| | |
|---|---|
| (तुम्ही पोटप) घरलीत | (तुम्ही वांसे) घरलेत |
| (तूं चिमणी) घरलीश | (तूं चिमण्यो) घरल्योश |
| (तुम्हीं चिमणी) घरलीत | (तुम्हीं चिमण्यो) घरल्योत |
| (तूं पाखरूं) घरलांश | (तूं पाखरां) घरलींश |
| (तुम्हीं पाखरूं) घरलांत | (तुम्हीं पाखरां) घरलींत |
| (तेणीन् पाखरूं) घरलान | (तेणीन पाखरां) घरलीन |
| (तेंयू पाखरूं) घरलीं | (तेंयू पाखरां) घरलीं |

रीतिभूतकाळीं घरीत ह्या वर्तमानकालवाचक अव्ययापुढे [अ] स धातूचीं भूतकाळीं रूपें युक्त होतात. ह्याचप्रमाणे वर्तमानभूत, भविष्यभूत वगैरे इतर संयुक्तकाळींहि ग्रंथभाषेच्या नियमाप्रमाणे ह्या भाषेच्या पद्धतीला अनुसरून रूपें बनतात.

अर्थप्रधान क्रियापदें

| | आज्ञार्थ | | विध्यर्थ | |
|---|---|---|---|---|
| | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्र. पु. | ऊं, ओं | ऊं | वां | वां |
| द्वि. पु. | ० | आ | वांश | वांत |
| तृ. पु. | उंदे, ओनदे | उंदत. ओनदत | वां, एवां | वीं |

स्वरादि प्रत्यय सर्वत्र पररूपसंधीने युक्त होतात.

विध्यर्थी जा धातूला य आगम होऊन त्यापुढे प्रत्यय योजितात; जसें मे जायवां, तूं जायवांश इ०

ये धातु

| | |
|---|---|
| प्र. पु. (मे) येऊं | (आम्ही) येऊं |
| द्वि. पु. (तूं) ये | (तुम्ही) या |

| | | | |
|---|---|---|---|
| तृ. पु. (तो) (ती) (तां) | येऊंदे | (ते) (त्यो) (तीं) | येऊंदत |
| (मे) येवां | | (आम्ही) येवां | |
| (तूं) येवांश | | (तुम्ही) येवांत | |
| (तेणीन) (त्याणीन) (तेणीन) | येवां | (तेंय्) (त्यांय्) (तेंय्) | येवीं |

विध्यर्थाचा आणखी एक प्रकार ; त्याचे प्रत्यय हे कर्तरि आहेत असें:—

| ए. व. | अ. व. | | |
|---|---|---|---|
| एवेचो | एवेचे | (मे) करेवेचो | करेवेचे |
| एवेचोश | ,, | (तूं) करेवेचोश | ,, |
| एवेचो | ,, | (तो) करेवेचो | ,, |
| —ची | एवेच्यो | (ती) —ची | —च्यो |
| —चां | —चीं | (तां) —चां | —चीं |

म्हण—आज्ञार्थ

| | | | |
|---|---|---|---|
| प्र. पु. (मे) म्हणों | (आम्ही) म्हणूं | म्हणेवां | म्हणेवां |
| द्वि. पु. (तूं) म्हण | (तुम्ही) म्हणा | म्हणेवांश | म्हणेवांत |
| तृ. पु. (तो) (ती) (तां) म्हणोनदे | (ते) (त्यो) (तीं) म्हणोनदत | म्हणेवां म्हणावां | म्हणेवीं |

धातुसाधितें

१ वर्तमानकालवाचक—प्रांथिकभाषेप्रमाणेच.

२ पूर्वकालवाचक—धातूला नी प्रत्यय लागतो. मात्र एकाक्षरी धातूंना नी प्रत्ययापूर्वी व आगम होतो. जावनी, येवनी, खावनी, घेवनी इ० करनी, बघनी, शिकनी, म्हणनी, वाचनी, ठेयनी, जेयनी, चावनी इ०

३ निमित्तवाचक—धातूला ऊं, ओं हे प्रत्यय लागून बनतात. येऊं, करूं, जाऊं, शिकूं, शिकों, म्हणूं—म्हणों, बोलूं—बोलों, चालूं—चालों, इ०

## शब्दसंग्रह

फक्त चित्पावनी भाषेतील विशेष शब्दांचा संग्रह येथे केला आहे.

| चित्पावनी शब्द | तदर्थक ग्रंथभाषेतील पर्याय |
|---|---|
| असां | असें (सर्वनाम) |
| असो | असा ,, |
| अउर / अहूर | पूर (नदीचा) |
| आंगचां | गोवर (विकार) |
| आंगडां | आंगडें |
| आंदुळो | झोपाळा |
| इतलो | इतका |
| इतलां | इतकें |
| उपलवट | उपद्व्याप / गडबड |
| एठा | एथें—येथें |
| एठाठीं | एथून—येथून |
| एतां | आतां |
| ओसरी | ओटी |
| ओळक | ओगराळ्याप्रमाणे परंतु मधल्या डेऱ्यापेक्षा तोंड आकुंचित असें नारळाचे बेलें तयार करून त्याच्या तोंडाजवळच किंचित् खाली दोहोंकडे समोरासमोर भोंकें पाडून त्यांत काठी लांब |

| | |
|---|---|
| | सुमारें हातभर बसवून केलेलें ओगराळ्यासारखें नारळी पात्र. हें कढत पाणी भांड्यांतून काढण्याकरितां असतें. |
| कय | कधी |
| कसो | कसां |
| कसो | बंद (बंडी, अंगरख्याचा) |
| कशो | कशा |
| कसां | कसें |
| करेवे | करावयास |
| कडगुलां | बांगडी |
| कितां | काय |
| किडला | कशाला |
| केदला | केव्हा |
| केरखंड | कोन (घरांतील केर जमविण्याचा) |
| केहेठीं | कुठून |
| कें | कोठें |
| कोठिंबो | (लाकडाचा दोणगा लांबट, चौकोनी व सखल) |
| खळ | अंगण |
| खेड | फणसाच्या आठिळांची सुकी भाजी |
| गातां | माचा किंवा बाज ह्याचीं बाजूचीं लाकडें |
| गोह्योत | आंबोण (गुरांचें खाणें; विशेषतः दाणा, गुळी, कुंडा वगैरे शिजविलेलें) |
| घडशी | विटाळ झालेली किंवा विटाळशी |
| घडापड | विटाळ (कमी जातीचा स्पर्श) |

| | |
|---|---|
| घांटलां | तांदुळाच्या कण्या व नारळाचा रस यांची घणसर खीर |
| घोऊश | नवरा |
| चखोट | चांगलें |
| चटोर | चावट |
| चिरगूट | वस्त्र (विशेषतः बायकांचें) |
| चेड | मुलगी |
| जर | ज्वर, ताप |
| जसो | जसा |
| जसां | जसें |
| जशो | जशा |
| जाऊश | जाऊ |
| जावशी | जावा |
| जेडला | जेव्हा |
| जोडां<br>जोडपां<br>मेहूण | नवराबायको हें युग्म |
| जोवणां | वीज चमकणें |
| जां | नें |
| ज्याहां | जेथे |
| झोरो | कृशता |
| ठवणस | करार (येण्याजाण्याचा, कामाला लागण्याचा वगैरे) |
| ठावलां | भांडें |

| | |
|---|---|
| डगर | दरड |
| डगूळ | मोठा फणस |
| डबरो | खळगा |
| डाळी | हातरी |
| ढाळ | जुलाब, रेच |
| तणवणां | तणवणें (गवत सपाट पसरणें) |
| तणावलो | [भू. का. पु. तृ. पु. ए. व. क्रि. निद्र–अव्यय] स्थित निजला. |
| तसो | तसा |
| तशो | तशा |
| तसां | तसें |
| तां | तें |
| तेंठीं | त्यांतून |
| तेडला | तेव्हा |
| त्याह्यां | तेथे |
| त्याह्यांठीं | तेथून |
| त्यो | त्या |
| थारळां | (दूध तापविण्यासाठी शेगडीसारखा जमिनीत केलेला खळगा) |
| थार | जागा, थारा, आश्रय. |
| थाळ | पाणी तापविण्याची मोठी चूल |
| दूड | घागर व कळशी मिळून जोडी |
| देरूश | दीर |
| धाप | दमा |

| | |
|---|---|
| धुकट | धूर |
| नय | नदी |
| नई | नद्या |
| नंदश | नणंद |
| परावो | परका |
| पारो | लहान व कोवळा फणस |
| पावठणी | पायरी |
| पावत | पर्यंत |
| पार्ष्टी | पासून |
| पेगम | प्रयत्न |
| पिठला | झुणका |
| पिढां | पाट (बसण्याचा) |
| पुतो | वरवंटा |
| पैको | पैसा (सामान्यार्थी; पैसा ह्या नाण्याचा वाचक नव्हे.) |
| पोंड | (पाणी सांठवण्याचा खळगा–विशेषतः पाटांत) |
| बळकट | पुष्कळ, फार |
| बोब्यो | मुलगा |
| बळद | खरकटे पदार्थ, खरकटीं भांडीं, सोवळे पदार्थ वगैरे निराळे ठेवण्यासाठी एकीकडे भोवताली बांधोळी घालून केलेली राखीव जागा. |
| बाएल | बायको |
| बुडकुलो | मातीचें तांब्यासारखें तळाकडे रुंदट व तोंडाकडे आवळ असें भांडें |

| | |
|---|---|
| बोजार | आंब्यांचें लोणचें |
| बोडसां | लाकडें तोडण्याजोगी मोठी कोयती |
| भाणस | मातीचें खाली रुंद व वर अरुंद असें उभट भांडें |
| मागतेन | पुनः, फिरून |
| मागोतली | चुलीच्या मागची भिंतीपर्यंत चुलीच्या उंची-इतकी सपाट जागा. |
| माथ्यो | मोठी रवी (ताक घुसळण्याची) |
| माथान | माझ्याजवळ |
| मिरसांग | मिरची |
| मे | मी |
| मोघो | लोटा (पाण्याचा विशेषतः मातीचा) |
| मोरळी | विळी |
| रांधप | स्वयंपाक |
| वळचण | घराच्या बाहेरील भिंतीपासून पावळीपर्यंत जागा |
| वाढवण | केरसुणी |
| वांगड | सोबत |
| बांगडां | बरोबर, संगाती |
| विरस | वेळ (दिवसाचें अर्ध) |
| विरड | कामाचीं लाकडें वगैरे सांठविण्याचा माच |
| विणच्यां | संध्याकाळपैकी सुमारें चार दोन घटका दिवस |
| शाक | भाजी |
| शेरणी | खिरापत (विशेषतः नारळाचे बारीक तुकडे) |
| सांगूळ | फणसाची भाजी—विशेषतः गरे, आठिळी व |

| | |
|---|---|
| | पातीसुद्धा अशी |
| सुघड | मातीचें तपेलीसारखें मांडें |
| सोर | मातीचें लहान तांबुलासारखें मांडें |
| हाड | आण |
| हाडचां | आणतों |
| हाडचे | आणतों–तें–तें |
| हाडेवे | आणावयास |
| हेंगडायणां | वेडावणें |
| हुडहुडी | कंपयुक्त थंडी अंगांत भरते ती |
| होडांगो | अगडबंब (मोठा व स्थूल. निंद्य) |
| क्षानत किंवा शानत | अनिष्ट इजा, अनिष्टसूचक, दिवा पाडणें वगैरे-कृति |

## चित्पावनी भाषेंतील शब्द (गॅझेटिअरप्रमाणें)

१ आटवर=स्वयंपाकघर
२ ओखद=औषध
३ कितां=काय
४ किनला=कशासाठी
५ केडला=केव्हां
६ कें=कोठे
७ के=केव्हां
८ गोत=जवळ
९ घेवनी=घेऊन
१० चखोट=चांगलें
११ चेड=मुलगी
१२ तेनी=तो
१३ त्याहाती=तेथून
१४ येयलें=घातलें
१५ नांकें=नको
१६ ने=नदी
१७ पहानपटीं=सकाळीं
१८ पेख=थांब
१९ फाळणें=बंद करणें
२० वाकर=थोडावेळ

२१ बोलचे=बोलतो
२२ मार्थे=माझ्याबरोबर
२३ मैं=मी
२४ येचें=येणें
२५ विंचें=सूर्यास्तापूर्वीचा काळ
२६ सें=आहे
२७ हडे=दावणें
२८ हर्वे=पाहिजे
२९ हेड=आणणें
३० हे=संबोधन. वडील माणसांना हाक मारतांना बायका वापरतात.

# ११ ऐतिहासिक दंतकथा

१ श्री. विनायक गोविंद साठ्ये, मिरज, आपल्या पत्रांत लिहितातः— आमचे पूर्वज विश्वनाथभटजी मोठे वेदविद्यानिपुण होते. तेवढ्या विद्ये-वर चरितार्थ भागेना म्हणून विशाळगडकर प्रतिनिधींच्या पदरीं पाणी वाहण्याची नोकरी पतकरून राहिले. प्रतिनिधि एके दिवशीं बहिर्दिशेस निघाले असतां शेजारच्या एका छपरांतून संथ, अस्खलित वेदघोष कानीं येऊन चकित झाले. चौकशी करतां विश्वनाथ पाणक्याची योग्यता समजून आली. त्यामुळे पूरगांव इनाम करून दिलें व देवरुखांत वस्तीस जागा करून दिली, असें सांगतात. विश्वनाथभटजींचें देवालय म्हणून त्यास विश्वेश्वराचें देवालय म्हणतात. हें देवालय देवरूख येथे आहे.

२ दातार, हल्ली वस्ती पुणें, सांगतात की, गुहागरच्या देवीची स्थापना वैजनाथ भट दातार यांनीं केली.

३ श्री. केशव वीरेश्वर जोशी (जांभूळपाडा) ह्यांच्या म्हणण्याप्रमाणे— बाजी गोविंद हे रामचन्द्र गोविंद यांचे बंधु. यांनी पेशवाईत पुण्यास सरदारकी मिळविली. विजापूरकरांचा बदामी किल्ला काबीज केला. परंतु बारभाई प्रकरणांत त्याची जहागीर जप्त झाली. बाजी जोशी यांचा वाडा बंडूनाना रानडे यांस विकला. नातूंच्या घराजवळ जोशांची पागा होती. पेशवाई सांवरेल या आशेने बाजी गोविंद यांनी हेटकरी लोकांचें पथक पदरखर्चाने बाळगिलें होतें. हेटकरी लोक मूळ सावंतवाडीकडील. भोर संस्थानांत जे हेटकरी लोक आढळतात ते या पथकाखाली आलेल्यां-पैकी असून तेवढेच या बाजूस आहेत. आमच्या चुलत्यांच्या वांटणीस तरवार आली होती. तिची मूठ चांदीची ८० तोळ्यांची होती. तिचे

पायांतील तोडे करण्यांत आले.

४ श्रीवर्धन येथील उपाध्ये (मूळ उपनांव वैसास) हे पेशव्यांचे उपाध्ये होते. ते पेशव्यांबरोबर पुण्यास न आल्याने पेशव्यांनी करवे यांस उपाध्येपण दिलें.

५ श्री. हरि पांडुरंग आठवले, मिरज, लिहितातः—आमचे पूर्वज वे. शा. संपन्न जीवनभट हे थोरले माधवराव यांच्या स्वारीबरोबर लढायींत राहून पुराणद्वारां सैन्यास उत्तेजन देण्याची कामगिरी करीत. तेव्हांपासून उत्पन्न चालू आहे. आमची पिढी पांचवी आहे.

६ "चिमाजी आप्पाने साष्टी घेतली त्या वेळीं आमच्या पूर्वजांस येथे आणलें." (ठाण्याचे हरि गंगाधर जोशी वकील)

७ "श्रीदुर्गादेवीच्या समोरच्या खांबाजवळ जातां येतां नारळ घेण्याचा मान दातारांचा आहे. आमचे पूर्वज इचलकरंजीकरांकडे आश्रित होते. श्रीमंतांच्या मातुःश्रीस संकटसमयीं त्यांनी मोठें साहाय्य केलें. यास्तव आमच्या पूर्वजांस इनाम मिळालें तें आमच्या घराण्याकडे अद्यापि चालू आहे." (गजानन गंगाधर दातार, मिरज)

८ श्री. मिरजेहून भास्कर गंगाधर पटवर्धन कळवितात—"राममंदिरांतील (मिरज येथील) राम, लक्ष्मण, सीता या मूर्ति पितळेच्या असून त्या श्री-समर्थ रामदासस्वामी यांच्या झोळींतल्या आहेत. देवालयांत श्रीमारुतीची मोठी मूर्ति आहे ती गोमयाची असून श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनी स्वतः भिंतींत लिंपून तयार केली आहे. सदर मठांत समर्थांची शिष्या वेणाबाई ह्या राहत असत."

९ "मराठी राज्यांत आम्हांकडे सराफीचें वतन होतें तें चालू सरकारने रद्द केलें. गणपतीवर रुद्राचा-लघुरुद्र होत असे." (महादेव हरि कुंटे, महाड)

१० "आमचे पणजोबांचे चुलते पुणें येथे भोसल्यांतर्फे वकील होते." (विष्णु काशिनाथ दामले, शीरगांव)

११ श्री. गणेश पांडुरंग कानिटकर आपल्या सांगलीहून लिहिलेल्या पत्रांत लिहितातः—"हरिभट कानिटकर हे प्रथम गणेशवाडीस आले; त्यांचे पुत्र अंताजी हरि हे बापू गोखल्याचे चुलते धोंडोपंत गोखले यांजबरोबर चिंतामणराव आप्पासाहेब थोरले यांचे शिलेदार म्हणून धोंडजी वाघाशीं झालेल्या लढायांत होते. या पराक्रमाबद्दल त्यांस १२०० रुपयांची तैनात व तिच्या वसुलीसाठी जायगव्हाण गांव वहिवाटीस लावून दिला होता. ती तैनात हल्ली बंद आहे. मालकमसाहेबांपाशीं झालेल्या सांगलीकरांच्या तहावर संस्थानिकांच्या सहीबरोबर अंताजी हरींची देखील सही होती असें सांगतात. अंताजी हरींचे वडील बंधु विनायक हरि हे पट्टीचे वैदिक विद्वान होते त्यांस कृष्णातटाकीं मंगावती येथे अक्कलकोटकर भोसले यांनीं पांच बिघे जमीन इनाम दिली होती."

१२ श्री. शंकर हरि घारपुरे कळवितात : "आमच्या गांवांत (कोतवड्यांत) देवीच्या देवळांत जयगड येथील पीराचें स्थान आहे."

१३ "बडोदें सरकारचें अन्नछत्र दरवर्षी ४९३ रु. देऊन चालू होतें तें हल्ली १६ वर्षे बडोदें सरकारने बंद केलें. परंतु हल्ली तें आम्ही चालवितों." (केळकर, क्षेत्र गणपतिपुळें. स. १९३७)

१४ " गुहागरास पेशव्यांचा वाडा होता तो मोडून त्या जागेवर कचेरी बांधली आहे. जुन्या वाड्याच्या एका कोपऱ्याचा भाग ज्यांत वाड्याचें देवघर होतें, त्याचा तळमजला शाबूद ठेवलेला आहे. त्याचा उपयोग सध्या प्रवासीबंगल्यादाखल केला जातो." (गणेश रावजी खरे, गुहागर)

१५ "मूळ बाळंभट देशावर येऊन साताऱ्याजवळ कुर्लें गांवीं येऊन राहिले. तेथे श्रीगिरजाशंकराची पूजा करणेबद्दल कुरण व घर मिळालें.

त्याचप्रमाणे संस्थान सांगलीपैकी मंगळवेढें येथे इनाम जमीन व वर्षासन शंभर रुपये असे धर्मादाय मिळाले. रेटरें गांवीं इनाम जमीन आहे. हें सर्व उत्पन्न अद्यापि आमच्या घराण्यांत चाललें आहे. बाळंभटाचा मुलगा विसाजी हा कित्तुरावर लढाईत मारला गेला व त्या वेळीं सवाई माधवराव पेशवे यांनी विसाजीचा भाऊ बाजीराव यास पागे नेमलें व दोन हजार रुपये जातीच्या तैनातीस दिले. यानंतर देवर आष्टे येथील यमाजी शिवदेव याची पागा कमी करून गणेश बाजीराव यास दिली व देवर अष्टें गांव त्याकरता लावून दिला. पुढे चिंतामणराव पटवर्धन यांनी हा गांव घेतला व त्यामुळे पुढे पेशव्यांनी पुण्यालगतचीं पटवर्धनांचीं पांच गांवें जप्त करून गणेश बाजीराव यास दिलीं. पेशवाई संपल्यावर पागा कमी झाली व दोन हजार रुपयांबद्दल ब्रिटिशसरकारने तहांत मिरज संस्थानांत दोन गांवें देवर आष्टे येथील शेतमळा बुदगांव संस्थानांत एक जमीन असें सर्व सरंजामास लावून दिलें. हें सर्व उत्पन्न अद्यापि चालू आहे. ही पागा आमचे पूर्वज घोड्यावर बसण्यांत पटाईत होते म्हणून मिळाली अशी आख्यायिका आहे. वरील उत्पन्नाखेरीज मिरज संस्थानांतून आम्हांस दोन घोड्यांची चंदी वैरण व दोन मोतदारांचा पगार मिळण्याचा हक्क आहे. आमचे पणजोबा हे एकदा आपल्या आईला उलट बोलले. नंतर त्यांना त्या गोष्टीचा पश्चात्ताप झाला. त्याबरोबर आपल्या जिभेचा शेंडा श्रीगिरजाशंकरापुढे उतरून ठेवला. पुढे पुजाऱ्यास दृष्टान्त झाला व त्याने अंगारा लावून सदर शेंडा जिभेस चिकटविला व तो चिकटला." (कुर्लेकर, मिरज)

१६ "पणजोबा प्रथम मिरजेस आले. तेथे ते शेखदार होते." (कोलटकर, सातारा)

१७ "ताम्हणमळा हा गांव मराठे लोकांपासून आमच्या पूर्वजांनी घेऊन तेथे वस्ती केली. या गांवांत गोखल्यांशिवाय ब्राह्मणांची वस्ती नाही."

(गजानन नीलकंठ गोखले, नागपूर)

१८ "धारवाडाकडे आमचें एक इनामी शेत होतें तें माझे आजोबा दिवाकरभटदादा गोरे यांच्या हयातीपर्यंत होतें. त्यांचे पश्चात् तें इंग्रज सरकारने खालसा केलें." (यशवंत नारायण गोरे, मिरज)

१९ "चितळे घराण्याचे पूर्वज परशुरामचे असावेत असें त्र्यंबकेश्वरचे पाटणकर यांजकडील शक १६६९ सालचे मुरूडचे लेखावरून दिसतें. नंतरचे लेख मुरूड येथे राहणाऱ्यांचे आहेत (श. १६८८ पर्यंत). शके १७०१ पासून आडयास राहूं लागले. स. १९१५ पासून नागपूर येथे कायम वस्ती झाली." (वासुदेव लक्ष्मण चितळे, नागपूर)

२० "पेशव्यांकडून आमच्या कुटुंबांतील कोणा स्त्रीस (ती पेशव्यांची बहीण म्हणून) चोळीबांगडीकरता मुरूडजवळील चोळीगांव मिळाला तेव्हां पासून आमचें आडनांव चोळकर पडलें." (वामन कृष्ण चोळकर, सातारा)

२१ "आमचे पूर्वज कृष्ण जोशी सुमारें ३०० वर्षांपूर्वी संगमेश्वराहून सध्याचा गांव वायंगणी येथे आले. तो गांव मुळे उपनामक गृहस्थाकडे वतन म्हणून चालत होता. त्यांनी कृष्ण जोशी यास वतनाचे सर्व हक्क दिले. अशा रीतीने जोशी यांनी लग्नमुंज वगैरे कार्यांची ज्योतिषवृत्ति मिळविली. ती अद्यापि आमच्याकडे आहे." (कृ. रा. जोशी, जळगांव)

२२ "राजशक २६ च्या पूर्वी आम्ही येथे (सातारा) आलों." (रघुनाथ गणेश दामले, सातारा)

२३ "माझ्यापासून वर पांचवे पुरुष नारायण. याला मुलगे तीन—महादेव, पांडुरंग व बाळाजी. पैकी बाळाजीपंत हे कोंकणांतून पुण्यास आले व तेथे त्यांनी सरदारकी मिळविली. महादेव हे मूळ ठिकाणींच राहिले. त्यांचे आम्ही वंशज." (रामचंद्र काशिनाथ नातू, मिरज)

२४ "आमचे पणजोबा भिकाजी रामचंद्र नेने हे मूळ धामणशाहून

कऱ्हाड मुक्कामीं आले." (वि. रा. नेने, मिरज)

२५ "देवकाचे वेळीं पांगाऱ्याची फांदी बांधतात." (यशवंत गणेश फके, पुणें)

२६ "गाडगीळ मांजरें येथें राहणारे. तेथें कोल्हापूरच्या देवीचें संस्थान आहे. त्यांत गाडगीळ पुराण सांगत. देवीची आराधना करून त्यांनीं विषारावर पाणी देण्याचा वर मागितला व तो मिळाला. ह्या घराण्यांतले पुरुष अजून विषारावर पाणी घालतात म्हणून त्यांस पाणीवैद्य म्हणतात." (नारायणराव गाडगीळ, नागपूर, यांच्या पत्रांतून)

२७ "लवेलहून वाई, वाईहून सातारा, साताऱ्याहून शिगांव-कोरेगांव गांवीं आले व तेथून करवीरास आले. सरदार बापू गोखले यांच्या पत्नी यमुनाबाईसाहेब यांच्याकडे कारभारी होते." (लक्ष्मण कृष्ण गद्रे, मिरज)

२८ "पालशेतास जातांना अजगोलच्या हद्दींत समुद्रकांठावर शंकराचें देऊळ आहे त्याचे मालक पेशवे (भट). जवळ अरुणावरुणा तलाव आहे." (नारायण विनायक जोशी, नागपूर)

२९ "माझ्या आजाचे पणजे महादाजीपंत सोवनी सातारा जिल्ह्यांतील वेणें गांवांत कोणी मराठे धनिक सत्ताधारी होते त्यांच्याकडे चाकरीस राहिले. त्यांचे चिरंजीव अंताजीपंत हेहि पुढे तीच नोकरी करीत होते. त्यांच्यामागे त्यांचे चिरंजीव गोपाळपंत सोवनी हे परशुरामभाऊ पटवर्धन यांच्याकडे आरंभीं कारकून, नंतर बारगीर होत होत शेवटीं सेनापतीच्या हुद्यावर होते. त्या वेळीं ते तासगांवास घर करून राहूं लागले.

आमचे वाडवडिलांपैकीं गोपाळपंत हे परशुरामभाऊ पटवर्धन यांच्याकडे फौजेचे अधिकारी असतांना लढाईंत त्यांच्या डोक्यास जखम झाली. ती बरी होईना म्हणून कंटाळून संन्यास घेऊन जलसमाधि घेण्याचें त्यांनीं ठरविलें. परशुरामभाऊ व मुलें कोणाचें न ऐकतां त्यांनीं आपणच तयारी

करून औदुंबरानजीक कृष्णेच्या डोहांत जिवंतपणीं जलसमाधि घेतली. आमच्या घराण्यांत ह्या ब्रह्मीभूतांची पुण्यतिथि अद्यापि करण्यांत येते." (गणेश बल्लाळ सोवनी, मिरज)

३० "त्रिकटोपंत गोगटे हे पेशवाईअखेरीला साळशी महाल तालुके देवगड, येथील मामलेदार होते." (गोगटे, मालवण)

३१ "शिवाजीमहाराजांनी सिंधुदुर्ग किल्ला बांधला त्या वेळीं आमचे पूर्वज ग्रामोपाध्ये होते." (रामचन्द्र चिंतामण भट, मालवण)

३२ "आमच्या भाऊबंदांपैकी बडोदें येथील बक्षी येथून जाऊन तेथे अधिकारी झाले." (नारायण दिनकर रानडे, मालवण)

३३ "पेशवे सरकाराकडून आम्हांस वाडें येथे इनाम जमीन होती. तेथून आम्ही कुणकेश्वरीं गेलों, तेथून इळयें येथे आणि तेथून दाभोळ येथे." (पाटणकर)

३४ "आमचे पूर्वज शक १६३५ च्या पूर्वी केव्हा तरी गुहागराहून पहिल्याने पांरडोली,भगूर,देवळाली येथे आले व शके १६६० सालीं नाशकास घर बांधण्यास जागा घेतल्याचा पुरावा आहे. शके १६७१ च्या सुमारास समनेर दुमाला हा गांव बाळाजी विश्वनाथ यास जहागीर मिळाला. शक १७०३ मध्ये केलेलें एक वांटपपत्र आहे त्यावरून आमची जमीन गुहागर, पांरडोली, समनेर, घामणगांव, त्र्यंबकेश्वर, भोगूर, आगासखंड, बोळी व नाशिक इतक्या ठिकाणीं होती. मग पुढे काय झालें त्याची माहिती नाही. शके १६३५चा एक लेख रखमाजी कृष्ण याच्या सहीचा क्षेत्र त्र्यंबकेश्वरीं आहे. त्यांत मूळ राहणार गुहागर हल्ली पांरडोली असा उल्लेख आहे. त्यावरून गुहागराहून पूर्वज आले असें दिसतें." (गणेश हरि पेठे, पारलें)

३५ "पेंडशांचें मूळ गांव जोगाईचें आंबें. तेथील पाटील होते. बाटविण्याच्या भयामुळे पळाले ते संगमेश्वर तालुक्यांत घामापूर येथे आले.

तेथे हल्ली एक घर आहे. तेथून एक पुरुष खेड तालुक्यांत अयनी मेटें येथे आला. तेथून परशुराम भट पेंडसे व त्यांचा भाऊ खेड येथे आले. धामापुराहून एक पुरुष आंजर्लें येथे गेला.

नाशिकच्या पेंडशांपैकी एक नागपुरास स्थायिक झाले. त्यांचें मूळ गांव गोळप पावस असें ते सांगतात. त्यांची कुलस्वामिनी जोगेश्वरी व कुलस्वामी कीर्तिकेशव. खेडच्या पेंडशांची कुलस्वामिनी जोगेश्वरीच आहे." (शंकर दामोदर पेंडसे, नागपूर)

२६ "माझे निपणजे शक १६६४ सालीं व पणजे शके १६७४ सालीं हयात होते. त्रिंबक येथील लेखांत 'उपनांव फाटक गांव वेंगुर्लें प्रांत कुडाळ' असें आढळतें. आमची शाखा शके १६७४ ते शके १७४८ चे दरम्यान केव्हा तरी कर्नाटकांत आली असावी. कारण फाटक 'वेंगुर्लेकर प्रांत कुडाळ हल्ली वस्ती कर्नाटक' असें वरील त्रिंबकच्या लेखांत सापडतें." (गं. मो. फाटक, धारवाड)

२७ नागपूर नीलसिटी हायस्कूलचे पहिले हेडमास्तर कै. श्री. माधवराव हरि पंडित हे मूळचे हरिपूर (सांगलीनजीक) चे राहणारे असून त्यांचें मूळ उपनांव भट असें होतें. त्यांना नागपूरच्या नोकरीवर जाण्यास न्यायमूर्ति रानडे यांनी प्रोत्साहन दिलें. या माधवराव पंडितांची चुलती मोठी साक्षात्कारीण श्रीकृष्णउपासक हरिपूर गांवांत व सांगली वगैरे आसपास राधाबाई भटीण याच नांवानें प्रसिद्ध होती. राधाबाईचें कृष्णमंदिर हरिपुरास आहे. माधवराव पंडितांचा वंश आज नागपूरकडेच वाढत आहे. दुसरें एक पंडित घराणें बडोद्याचें, मूळ उपनांव भट, मूळ गांव शिरगांव वगैरे सर्व एक.

२८ "बनकट्टे, पुराणीक, काशीकरः—मूळ उपनांव भट, राहणार शिरगांव, गोत्र काश्यप, कुलस्वामी श्रीलक्ष्मीकेशव, काशीस वस्ती, सुमारें आठशें वर्षे.

पूर्वजांनी काशींत वनझाडी तोडून वस्तीस योग्य अशी जागा करून राहिले म्हणून वनकट्टे, व पुराण सांगतात म्हणून पुराणिक अशीं आडनांवें पडलीं." (दा. मो. भट, मिरज)

३९ "कासे मुरबाड येथून माळव्यांत गेले. तेथे द्रव्य मिळवून कुलाबा जिल्ह्यांत बोरखाडी गांवीं येऊन राहिले." (गोपाळ चिमणाजी भाटे, रोहें)

४० "आमचे चुलते कै. गोविंद विनायक मराठे यांनी सांगितलेल्या माहितीवरून आम्ही मूळचे कोतवडें, तालुका रत्नागिरी येथील, परंतु आता त्या गांवांत मराठे घराणें पूर्वी कधी असल्याचें कोणासच माहीत नाही व हल्लीहि तेथे मराठे उपनांवाचें घराणें राहत नाही. तीर्थरूप चुलत्यांनी सांगितल्याप्रमाणे आमची कुलदेवता महालक्ष्मी आहे. परंतु ते सांगत की, ती कोल्हापूरची होय. मला वाटतें देशावरील कुलस्वामिनी असणें संभवनीय नाही. कोतवडें हें मूळ ठिकाण धरलें तर तेथे मात्र श्रीमहालक्ष्मीचें प्राचीन देवालय आहे तेंच आमचें कुलदैवत होय. पुढें कोल्हापूर जास्त प्रसिद्ध म्हणून तेथील महालक्ष्मी मानण्यांत आली असावी. तीर्थरूप काकांचे सांगण्याप्रमाणे आम्हांला सावंतवाडी संस्थानांतील मौजे आजगांव येथें जाऊन पांचशे वर्षें झालीं. आमचें घराणें त्या भागांत कांदेरकर या उपनांवाने प्रसिद्ध आहे. त्याचें कारण आमच्या स्थावर मिळकतीचें नांव ठिकाण कांदेरें सरकारकागदीं नमूद आहे हें होय." (वा. ह. मराठे, रत्नागिरी)

४१ "पेशव्यांचे पदरीं आमचे येथील एक विद्वांस होता. तो बिठूर इकडे वारला. दुसरे बाजीराव यांचा खाजगी जमाखर्च त्यांचेकडे असे. पुण्यास विश्रामबागेनजीक विद्वांसघराण्यास विद्वान म्हणून पेशवाईत एक वाडा मिळाला होता. पुण्याचे विद्वांस भांग्यामारुतीजवळील व फीमेल हायस्कूल-समोरील आमचेच दाईज. रामेश्वराचे देवळानजीक विद्वांस याने संन्यास

घेऊन तेथे लहानसें देवालय मार्कंडेयाचें बांधलें आहे." (के. दि. विद्वांस, परतवाडा, इलीचपूर)

४२ "बिना-कटनीकडील जोशी हे बरेलीकडील पेशव्यांचे सावकार." (वैद्य, मिरज)

४३ कोतवडें येथील सहस्रबुद्धे घराण्याची मूळपीठिका:—"मूळपुरुष महादेव भट बिन केशव विश्वनाथ सहस्रबुद्धे हे चतुर्बेटावर प्रथम आले (ते कोठून कसे आले माहीत नाही). त्यांना दोन बायका. वडील बायकोस पुत्र तीन; पैकी मधला मुलगा लागवण येथे वतनास ठेवून मोठा व धाकटा चतुर्बेट येथेच राहिले. पुढे मोठा मुलगा वाडा उंबर येथे राहिला व धाकटा वाडधामेळ येथे राहिला. धाकटीचे पुत्र दोन. पहिला वाडा गावण येथे राहिला व दुसरा केळें येथे राहिला."

४४ "माझे पणजे दादंभट खरे दुवेदी हे सुमारें १२५ वर्षांपूर्वी गुहागराहून अंजनवेलीस किल्ल्याच्या आश्रयास आले. त्या वेळीं पेंढाऱ्यांचा दंगा सुरू होता. दंगा शांत झाल्यावर ते परत गुहागरास जाऊं लागले तेव्हा अंजनवेल येथील खोतांनी त्यांस अंजनवेलीसच राहण्यास सांगितलें. माझे पणजोबा यांनी ऋक्शाखा व हिरण्यकेशी शाखा यांचें अध्ययन केलेलें होतें. त्यांस पुण्यास दोन्ही वेदांची दक्षणा मिळे." (दिनकर नारायण खरे, अंजनवेल)

४५ "आमचा मूळ पुरुष महादेव हे येथे आल्यापासून माझेपर्यंत ८ पुरुष होतात. यांपैकीं १ शाखा मसुरें, २ री आचरें, ३ री मालवण व बाहेर कोल्हापूर, पुणें, नाशिक या बाजूस आहे." (दिवाकर मोरेश्वर वझे, कांदळ, ता. मालवण)

४६ "आमचे कुलाकडे साळशी प्रांताचें धर्माधिकरण होतें. अजून वझे धर्माधिकारी म्हणून ओळखले जातात." (गोविंद विठ्ठल वझे, मालवण)

४७ "सहस्रबुद्धे हें आडनांव २५० वर्षांच्यावर चालू असल्याचा पुरावा आहे. मूळ पुरुष गोविंदभट हे श्रीमंत बाळाजी बाजीराव— थोरले नानासाहेब पेशवे यांच्या कारकीर्दीच्या आधी कोंकणांतून (कोतवडें मूळ गांवाहून) वाईस आले. हे शास्त्री होते. पेशव्यांच्या खाशा मंडळींना शनवारवाड्यांत गणेशमहालांत भारतरामायणांतील वीररसप्रधान पुराण सांगत असत. त्यांना पेशव्यांकडून वर्षासन होतें. ह्यापैकीं वांटण्या होतां होतां अद्यापहि ४५ रु. आमच्या घराण्याच्या शाखेकडे राहिले आहेत." (बा. ना. सहस्रबुद्धे, खरगपूर)

४८ "आमचे पूर्वज कै. त्रिंबकभट बिन हरभट हे देशावर येऊन पायाने श्रीक्षेत्र काशीयात्रेस सहकुटुंब जाऊन तेथे वेदविद्या संपादन करून मिरजेस आले. विद्वान ब्राह्मणांचा मिरजदरबारीं बहुसन्मान झाला. योगक्षेम चालणेसाठी कै. श्रीमंत चिंतामणराव पांडुरंग पटवर्धन यांनी पाऊण चाहूर सवाअकरा बिघे साडेतीन पांड जमीन मौजे सावळी मुक्कामीं देऊन श. १७१९ साली वंशपरंपरेची जात इनामाची सनद करून दिली. सदर यांचे वंशजांकडे सदर जमीन चालू आहे."

४९ "इकडे येऊन १७५ वर्षें झालीं. पटवर्धनांच्या पथकांत आलों. पुढे सन १७९२ नंतर तुंगभद्रातीरीं हावनूर येथे. त्यानंतर येथे (शहापूर, बेळगांव) येऊन ५० वर्षें झालीं." (शहापूरचे जोग)

५० "आगरगुळें व गावडें गुळें अशीं रत्नागिरी तालुक्यांत दोन गुळीं आहेत. गुळ्यांचा गणपति पुळ्यास गेला. गुळ्यास पेशवाईत इनामत जमीन मिळाल्यामुळे वेंगुर्लें सोडून आगरगुळ्यास वसाहत केली." (गोविंद रामचन्द्र देवल, नागपूर)

५१ "पेडणें येथे येऊन चार पिढ्या झाल्या." (महादेव वासुदेव परांजपे, शहापूर बेळगांव)

५२ "गोव्यांत येऊन चार पिढ्या झाल्या." (शहापूर-बेळगांवचे आत्माराम कृष्ण अभ्यंकर)

५३ "वेंगुर्ल्यास येऊन तीन पिढ्या झाल्या." (श्रीधर रामचंद्र भट, बेळगांव, शहापूर)

५४ "आमचे पूर्वज देवीभक्त असून त्यांनी वाघाला मन्त्रसामर्थ्याने बसवून ठेविलें होतें." (वासुदेव गोपाळ भट, बेळगांव)

५५ "नागेशभट्ट भिडे म्हणून आमचा पूर्वज गोव्यांत झाला व सत्रोजी राणे यांचेकडून जमीन वसाहतीकरता घेतली. त्याबद्दल साखळी येथील पांडुरंगाला दरसाल अडीच रुपये द्यावे लागतात." (गणेश सखाराम भिडे, बेळगांव)

५६ "मी पूर्ण नास्तिक असून माझें आयुष्य गेलीं ३३ वर्षें डॉक्टरी धंद्यांत गेलें. तथापि मानसशास्त्राचा व इतर अनेक शास्त्रांचा अभ्यास केल्यामुळे व वडिलांनी साधुवृत्तीने आयुष्य काढल्यामुळे गेल्या ८ वर्षांपासून मला साक्षात्कार झाला आहे असा आत्मविश्वास वाटतो व त्या अनुरोधाने मी हल्ली वागत आहें." (डॉ. केशव भास्कर लेले, पुणें)

५७ "देसाई हा हुद्दा व कामगिरी मिटगांवणें येथील देसायांकडून देणगी म्हणून मिळाली. देसाईपणाचा हक्क आदिलशाहींत मिळाला. थोरले शाहू-महाराज यांजकडून नवीन सनद मिळाली आहे (राज्याभिषेक शके ५९). येथील देसाई हे अणसुरें व सागवें (दुमोजा) या दोन गांवांचे आहेत. अणसुरें गांवांत पूर्वी मुसलमान वस्ती होती; हल्ली नाही. सनदेंत सूत्र आश्वलायन असा उल्लेख आहे. पूर्वीचा हुद्दा महाजन. वेळणेश्वराहून येऊन ४०० वर वर्षे झालीं." (दत्तोपंत देसाई गाडगीळ, अणसुरें.)

५८ "गोठणें येथे श्रीगोवर्धनेश्वराचें स्थान पुरातनचें आहे. नंतर भार्गवरामाची स्थापना श्रीमत् ब्रह्मेंद्रस्वामींनी केली. आमची गोठणें येथील

वस्ती कमींत कमी ३०० वर्षांची आहे हें कागदपत्रावरून निश्चित.'' (आपटे पुराणीक, देवाचें गोठणें)

५९ ''येथे (गोठणें) मूळ पुरुष जानभट आपटे हे कासारवेलीहून (वसणी ता. रत्नागिरी ह्या गांवची वाडी) आले. तेथे त्यांचे पूर्वज मालवण तालुक्यांतील त्रिंबक गांवाहून आले होते.'' (आपटे, देवाचें गोठणें)

६० ''आमचे पूर्वज जयगडचे किल्लेदार होते असें समजतें.'' (जोग, पुणें.)

६१ ''माटे घराणें ४०० वर्षांपूर्वी राजापूर तालुक्यांतील. तेथून तें दुमदेव तर्फ पंचनदी येथे आलें. श. १६०९ सालीं गणोजी भालेराव ह्याच्या बंडामुळे (भालेराई) दुमदेव गांव सोडला. माट्यांचा एक विरक्त साधु जंगलांत हिंडत असतां त्याची व थोरले शाहुमहाराजांची गांठ अवचित पडली. राजांनी प्रश्न केला, झोळींत काय आहे. त्यांनी उत्तर दिलें की, जें तुला पाहिजे तें आहे. ताकपीठ आहे काय!—होय म्हणून काढून दिलें. तें त्याने मोठ्या प्रीतीने इच्छित पदार्थ मिळाला म्हणून खाल्लें. ही त्यांची सिद्धदशा पाहून राजाने साष्टांगप्रणिपात केला व पाहिजे तें मागा म्हणाला. हे म्हणाले मला सर्व इच्छित पदार्थ प्राप्त आहेत; तूंच पाहिजे तर माग. मग त्याला आशीर्वाद दिला. त्याने कांही तरी मागावें अशी इच्छा दर्शविली म्हणून मागणें मागितलें तें हें की, तूं छत्रपति आहेस तर मला पत्रपति असा किताब दे. तसा किताब त्याने दिला.'' (गणेश बाबाजी माटे)

६२ ''बाळाजी विश्वनाथ भट पेशवे यांशीं आप्तपणा असल्याचें नाणकशास्त्री के. रामचंद्र हरि गाडगीळ हे सांगत.'' (दिनकर गोविंद गाडगीळ, राजापूर)

६३ ''आमची आजी स. १९१९ सालीं १०० वर्षांची होऊन निवर्तली.

तिने मराठेशाही पाहिली; मधली बेबंदशाहीहि अनुभविली व आंग्ल राजवटहि भोगली.'' (द. रा. पटवर्धन, मूर्तिजापूर)

६४ ''आमचे पूर्वज भैपाळगड नांवाच्या किल्यावर किल्लेदार होते. सदरहु भैपाळगड कोणत्या बाजूस आहे तें आम्हांस माहीत नाही. सदरहु किल्लेदार केळकर तेथे झालेल्या एका लढाईत मारला गेला. त्यानंतर त्या किल्ल्यावरची सर्व केळकर मंडळी ढोलकर नांवाच्या गांवीं जाऊन राहिली. तेथून कांही मंडळी हलकर्णीस येऊन राहिली. कोरगांव हें पूर्वीचें सावंतवाडी संस्थानच्या हद्दीतील गांव. पण तें सांवतवाडीकरांनी पेडणें महाल पोर्तुगीजांकडे गहाण ठेवला होता तो पोर्तुगीजांनाच पडला. अर्थात् आता हें गांव पोर्तुगीजांच्या हद्दीत आहे. ह्या कोरगांव गांवीं केळकरांचा ब्राह्मण आहे. त्याला फक्त केळकर तेवढेच भजतात. तेथे तो केळकरांचा ब्राह्मण याच नांवाने ओळखिला जातो. या गांवांत चित्पावनांतील गणपुले, बर्वे ह्या उपनांवाच्या ब्राह्मणांचेहि कुलदेव आहेत. कोरगांवची ग्रामदेवता कमलेश्वर. या देवस्थानांत पूर्वी लघुरुद्रास लागणारे ११ ब्राह्मण ठरलेले असत. त्यांपैकी एक केळकर असे. सदरहु कमलेश्वराच्या भांडारातून केळकरांना दरसाल कार्तिक शु। १५ स सवा शेर तांदूळ व कार्तिक वा। ३० म्हणजे थोरल्या दिवाळीस ०॥०१। तेल मिळत असतें. हें केळकरांच्या ब्राह्मणांना म्हणून देण्यांत येतें. ही देणगी फार प्राचीन आहे व ती आताहि सरकारांत नमूद झाली आहे.'' (केळकर, मांद्रे, गोवा)

६५ ''गांवांतील (आंजर्ले) मुख्य देव म्हणजे दुर्गादेवी होय. हिची यात्रा चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून सुरू होऊन वद्य द्वितीयेपर्यंत चालते. ह्या यात्रेत गांवांतील सर्व जातींचे व आजूबाजूचे गांवचे लोक एकत्र आणून लोकसंग्रह करण्याच्या दृष्टीने केलेली व्यवस्था फारच अप्रतिम आहे. त्यां-

तील विशेष म्हणजे रथाचे मिरवणुकीचे वेळीं देवीवर दुरून कां होईना परंतु फुलें वाहण्याचा गांवच्या चांभारांस हक्क दिलेला आहे." (ग. बा. नित्सुरे, आंजर्ले)

६६ "पेशवाईत नित्सुरे घराण्यांतील एका गृहस्थाने दारूचा मक्ता घेतला होता असें कांही लोक सांगतात. शिवराम रामकृष्ण नित्सुरे या नांवाचे एक कवि आमच्या घराण्यांत होऊन गेले. त्यांचें विद्याप्रशंसानामक काव्य प्रसिद्ध आहे. त्यांनी 'कृष्णाकुमारी' काव्यहि केलें होतें. परंतु तें प्रसिद्ध झाल्याचें दिसत नाही. ह्या काव्यास दक्षिणा प्राईझ कमिटीकडून बक्षीस मिळालें होतें." (सदर)

६७ "विजयानगरचें राज्य मुसलमानांनी पादाक्रांत केल्यावर प्रजेचा जो असह्य छळ झाला त्यामुळे कित्येक कुटुंबें देशोधडीस लागलीं. त्यांतील एक कुटुंब कुंभकोणाहून गुजराथेंत जाण्याकरता जहाजांत बसून निघालें. पण वाटेंत वादळ झालें आणि जहाजाला गुहागरच्या किनाऱ्यानजीक भोंक पडून समुद्रांत टिकणें दुरापास्त झालें. खलाशांनी मोठ्या प्रयासाने जहाज तडीला आणलें. तेव्हा सर्व माणसें किनाऱ्यावर उतरून पडलीं. गांवाची वस्ती समुद्रापासून तीन मैलांवर उंच ठिकाणीं होती तेथून हें अडचणींत असलेलें जहाज दिसलें. त्याबरोबर सर्व लोक समुद्रावर आले. गलबतावरील माणसें वाळवंटावर चिंताग्रस्त होऊन बसलीं होतीं. परंतु भाषेच्या अडचणीमुळे त्यांची विचारपूस करतां येईना. पुढे बाहेरून आलेल्या माणसांनी वेदघोष सुरू केला तेव्हा हे खरे ब्राह्मण आहेत असें सर्वांस वाटलें. तेव्हापासूनच खरे नांव पडलें. पूर्वीचें नांव शारंगपाणी होतें." (गणेश रावजी खरे, गुहागर)

६८ "आमचे पणजोबांचे चुलते पुणें येथे भोसल्यांतर्फे वकील होते." (विष्णु काशीनाथ दामले, शिरगांव)

आमच्याकडे नांदगांवच्या (जंजिरा संस्थान) घोटवडेकर (बर्वे) यांच्याकडून माहितीचा तक्ता भरून आला आहे. त्यांत ते आपण गणेश दैवज्ञाचे वंशज असल्याचें सांगतात. त्यांचा कुलस्वामी गणपति आहे. ह्यांचे पूर्वज राजगडचे किल्लेदार होते.

६९ "वासुदेव लाड पंत यांचें मूळ आडनांव बाळ. नंतर पंत असें पडलें. ह्या बाळ यांचें घर ओझरें (सावंतवाडी, पेटा बांदें) येथे आहे. या बाळ घराण्यास पूर्वी श्रीमंत सरदार परमेकर देसाई (मु. परमें) यांच्याकडून एक इनाम जमीन मिळाली असून ती अद्याप त्या बाळ घराण्यांत चालू आहे. या घराण्यांतून पूर्वी एक मुलगा (मुंज झालेला) श्रीमंत परमेकर देसाई यांच्या सांगण्यावरून बळी दिला. म्हणून ही सनद त्यांना मिळाली." (रा. ना. केळकर)

## १२ कोंकणांतील मूळ ठिकाण

आता आपण प्रत्येक गोत्रांतील आडनांवांचा छडा लावीत लावीत एका गोत्राची किती कुटुंबें होतीं हें निश्चित करण्याचा प्रयत्न करूं.

### बाभ्रव्य

प्रथम बाभ्रव्य गोत्र घेऊं. कारण ह्या गोत्रांत दोनच आडनांवें आहेत; आणि तीं बाळ आणि बेहरे हीं होय. सामल हे बाळांतून निघाले. टिळक पंचांगांत तर हें आडनांव दिलेंच नाही. बेहरे हें उपनांव बाभ्रव्यगोत्रियांचें तसेंच शांडिल्यगोत्रियांचें असल्यामुळे बाभ्रव्यगोत्री बेहरे पूर्वी कदाचित् बाळ असतील असा संशय येतो. बाळ ह्यांचा कुलस्वामी भोमेश्वर असून मूळ गांव लाडघर आहे. आञ्याच्या एका बेहऱ्याने आपला कुलस्वामी भोमेश्वरच सांगितला आहे. परंतु पिरंदवण्याचे बेहरे आपला कुलस्वामी अनुक्रमें कोटेश्वर व कालभैरव सांगतात. कालभैरव हा पिरंदवण्याचा देव आहे. तथापि बेहरे व बाळ ह्यांची कुलस्वामिनी एकच आहे; आणि ती म्हणजे कोटेश्वरी होय. ह्यावरून ह्या दोन्ही कुटुंबांचें एकत्र राहणें होतें असें अनुमान करतां येण्यासारखें आहे. कोटेश्वरी देवी दापोलीजवळ शिरदें ह्या गांवीं आहे. बाळ-बेहरे हीं कुटुंबें गुहागरच्या यादींत आढळत नाहीत.

सारांश, बाभ्रव्य गोत्राचें मूळ एकच कुटुंब असावें ह्यांत संशय नाही. तथापि तें गुहागरास होतें असें मानण्यास साधन नाही.

### जामदग्न्य

बाभ्रव्याप्रमाणे जामदग्न्य गोत्रांतहि कुंटे व पेंडसे ह्यांव्यतिरिक्त तिसरें कुटुंब नाही. भागवत व अग्निहोत्री हे ह्यांचेच पर्याय होत. कुंटे ह्यांचें

मूलस्थान पंचनदी हेंच बहुतेकांनी सांगितलें आहे. पेंडसे धामापूरचे असावे. प्रो. शंकर दामोदर पेंडसे ह्यांनी मिळविलेल्या माहितीवरून असें दिसतें की, धामापुराहून खेड, अयनी-मेटें व आंजर्लें-मुर्डी येथे पेंडश्यांचीं कुटुंबें जाऊन स्थायिक झालीं. ठाण्याचे हरि कृष्ण पेंडसे हे महाडचे; परंतु मूळ गांव धामापूर सांगतात. धामापूरची वस्ती २०० वर्षांपूर्वीची आहे. नाशीक-नागपूरचे पेंडसे आपलें मूळ ठिकाण पावस सांगतात. जंजिरा-मुरूड येथील पेंडसे गोळपाहून तेथे गेले म्हणतात. ह्या निरनिराळ्या वसाहतींप्रमाणे कुलस्वामी बदललेले दिसतात. पावस व गोळप येथील पेंडश्यांचा कुलस्वामी केशवराज आहे. आंजर्ल्या-मुर्डीचे पेंडसे आदित्यनाथ आपला कुलस्वामी मानतात. तथापि धामापूरच्या पेंडश्यांचा कुलस्वामि वाडेश्वर आहे. ह्यावरून गुहागराहून पेंडसे धामापुरास गेले असा तर्क करतां येईल. जोगाईच्या अंब्याहून धामापुरास आल्याचा तर्क निराधार दिसतो. ह्या तर्काचें कारण जोगेश्वरी कुलस्वामिनी होय. कुलस्वामी-शिवाय नुसती कुलस्वामिनी एकाहि पेंडशाने सांगितली नाही.

कुंटे आणि पेंडसे ह्यांत आदित्यनाथ हा सामान्य देव दिसतो. चार निरनिराळ्या कुटुंबांपैकी तिघांत हा देव आदित्येश्वर, आदित्यनाथ, आद्य-नाथ ह्या रूपांनी वावरतांना आढळतो. केळशीचे महाजन हे जांभूळवाड्याहून तेथे गेले त्यामुळे त्यांचा कुलस्वामी कालभैरव नसला तरी त्यांच्या नैवे-द्यांत आदित्यनाथ आहे. महाजन म्हणजे पेंडसे. केळशीस दुसरें वर्तक कुटुंब आहे. ह्यांचें मूळ आडनांव कुंटे. ह्यांचा कुलस्वामी आदित्यनाथच होय. जोगेश्वरी ही सर्वांचीच कुलस्वामिनी आहे. आदित्यनाथ आगर-गुळ्यास व नेवऱ्यास आहे. पेंडसे घराण्याचा इतिहास एक पेंडसे लिहीत आहेत. त्यांनी जमवलेली माहिती आम्हांला वाचावयास मिळाली त्या-वरून गोळप, पंचनदी, गुहागर, नेवरें, हेदवी येथील पेंडसे आपला कुल-

स्वामी वाडेश्वर सांगतात असें समजलें. गोळप, नेवरें, संगमेश्वर, सडे पिरंदवणें हीं पेंडशांचीं मूळ ठिकाणें होत. ह्या सर्व पुराव्यावरून पेंडशांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर आहे असें आम्ही ठरवितों.

केळशीचे कुंटे एकजात आदित्यनाथ सांगतात. पंचनदीकर कुंट्यांचे कुलस्वामी हरिहरेश्वर, कोळेश्वर व आदित्यनाथ असे आहेत. कांही पंच-नदीकर कुंट्यांनी आदित्यनाथ ज्या अर्थी जतन करून ठेवला आहे त्या अर्थी सर्व कुंट्यांचा कुलस्वामी आदित्यनाथ असावा असें म्हणणें भाग आहे. पंचनदीच्या शेजारीं असलेला कोळेश्वर कित्येकांनी कुलस्वामी स्वीकारणें शक्य व स्वाभाविक आहे. केळशीचे कुंटे आदित्यनाथ सांगतात त्याप्रमाणे मुर्डी-आंजरलें, केळशी येथील पेंडसेहि आदित्यनाथ सांगतात. हें साम्य डोळ्यांत भरण्यासारखें आहे. पेंडसें हें नांव टाकून कित्येकांनी कुंटे नांव धारण केलें असावें असें वाटतें. दापोली तालुक्याच्या बाहेर दक्षिणेकडे कुंट्यांची वस्ती नसावी. ह्या कुटुंबाचा फैलाव उत्तरेकडे झाला. कुलस्वामींवरून कुंटे व पेंडसे हें मूलतः एकच कुटुंब असावें असें आम्हांस वाटतें. पेंडसे हें नांव जुनें असून कुंटे हें मागाहूनचें असण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें गुहागर हें ह्या कुटुंबाचें मूळ ठिकाण होय. परंतु हें कुटुंब गुहागरला असल्याचें कोणास माहीत नाही.

## विष्णुवृद्ध

विष्णुवृद्ध गोत्रांत परांजपे व मेहेंदळे हीं दोनच कुटुंबें स्वतंत्र अशीं दिसतात. मंडलिक, देव, वाकळकर, ओळकर हीं परांजप्यांचींच दुसरीं नांवें होत.[1] किडमिड्यांचें जुनें आडनांव मेहेंदळे होतें असें त्या कुटुंबांतली मंडळी सांगते. वेंडे म्हणून ह्या गोत्रांतील आडनांव आहे. हें कुटुंब मेहें-दळ्यांपैकीच असावें. सारांश, विष्णुवर्धन गोत्राचीं परांजपे व मेहेंदळे हीं दोनच कुटुंबें दिसतात. परांजपे ऋग्वेदी असून मेहेंदळे कृष्णयजुर्वेदी आहेत.

परांजपे गांवखडीचे तर मेहेंदळे डोंगर व मालगुंड येथील. दोघांचा वैष्णव संप्रदाय पूर्वीचा असावा. लक्ष्मीनारायण हें कुलदैवत परांजप्यांचें; केशवराज लक्ष्मीकेशव हें मेहेंदळ्यांचें. लक्ष्मीकेशव कोळिसऱ्याचा. गांवखडीस लक्ष्मीनारायणाचें देऊळ होतें. मेहेंदळ्यांची मुसलादेवी एकाहि परांजप्यांच्या देवतांत आढळत नाही.[1]

परांजप्यांसबंधाने विशेष म्हणजे सांप्रत जेवढे परांजपे ठिकठिकाणीं आढळतात त्या सर्वांचें मूळ ठिकाण आडिवरें होय. ह्याविषयी शंका नाही. त्याचप्रमाणे आडिवऱ्यास जाण्यापूर्वी शेजारच्या गांवखडीस त्यांची वस्ती होती असें ह्या घराण्याच्या इतिहासावरून दिसतें. गुहागरास सध्या तरी परांजपे अथवा मेहेंदळे ह्या आडनांवाचीं कुटुंबें कधीकाळीं असल्याचा पुरावा उपलब्ध नाही. परांजप्यांची वस्ती आडिवऱ्याहून इतरत्र फाकली. परंतु कोणीहि परांजपे गुहागरचा राहणारा असें म्हणत नाही. असें असून पांच परांजपे घराण्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे[1]. ह्यावरून परांजप्यांचा संबंध गुहागराशीं लावण्यास आधार सांपडतो. वेळणेश्वर मूळ गांव सांगणारे परांजपे आहेत. अर्थात् गुहागराच्या जवळ हें घराणें जाऊं शकतें.

मेहेंदळे बहुतेक मालगुंडचे दिसतात. कांही मेहेंदळे हिंदळ्याचे व डोंगरचे आहेत. मुर्डी येथील विष्णु कृष्णाजी मेहेंदळे आपला कुलस्वामी काळभैरव सांगतात व हा कालभैरव गुहागरचा म्हणून लिहून देतात. कांही मेहेंदळ्यांचा कुलस्वामी हरिहरेश्वर आहे हें आम्हांस माहीत आहे. परंतु कालभैरव सांगणारे हे एकटेच मेहेंदळे असावे. ह्या एका कुलस्वामीवरून मेहेंदळेहि फार प्राचीन काळीं गुहागरास राहत असावे असें दिसतें. मालगुंड गुहागरच्या खाली व रत्नागिरीच्या वर आहे. वैष्णव दैवत परांजपे व मेहेंदळे ह्यांनी स्वीकारिलें त्यावरून हें पूर्वी एक घराणें असण्याचा

१ परांजपे घराण्याचा इतिहास.

तुरळक संभव दिसतो. तथापि परांजपे व मेहेंदळे हीं तूर्त दोन स्वतंत्र कुटुंबें होतीं असेंच मानणें सुरक्षित होईल. त्यांचा गांव गुहागर असें मानण्यास हरकत नाही. आता गुहागरांत एका गोत्राचीं दोन स्वतंत्र घराणीं आलीं असें मानणेंहि कठिणच.

## नित्युंदन

नित्युंदन गोत्रांत प्रमुख कुटुंब भिडयांचें दिसतें. भाडभोके हेच पुढे भिडे झाले म्हणतात. आगलावे, पिंपळखरे, साडमानी, सहस्रबुद्धे, वैशंपायन हे सर्व एकच. वैशंपायनांचे सहस्रबुद्धे झाले[1] आणि सहस्रबुद्धयांतून आगलावे व साडमानी निघाले असा प्रवाद आहे. भिडे ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. सहस्रबुद्धे, पिंपळखरे व वैशंपायन ह्यांचा कुलस्वामी व्याघ्रेश्वर आहे. वैशंपायन व पिंपळखरे अनुक्रमें मुरूड व पंचनदीचे; सहस्रबुद्धे वायंगणीचे व भिडे आडिवरें, मालगुंड, निवेंडी येथील. वैशंपायन-पिंपळखरे हीं कुटुंबें फारच थोडीं आहेत. भिडे–सहस्रबुद्धे ह्यांचा विस्तार अधिक. कांही सहस्रबुद्धयांचा कुलस्वामी व्याघ्रेश्वर असला तरी त्यांपैकी तिघांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. सहस्रबुद्धयांचें मूळ आडनांव वैशंपायन होतें असें म्हणतात. आणि कुलस्वामीवरून ह्या म्हणण्यास आधार मिळतो. पंचनदी सोडून वायंगणीस गेल्यावर सहस्रबुद्धे हें नांव पडलें असावें. वैशंपायन मूळचे पंचनदीचेच असावेत. पिंपळखरे, वैशंपायन, सहस्रबुद्धे ह्यांपैकी सहस्रबुद्धे कुटुंबांत वाडेश्वर राहिला आणि बाकीच्या कुटुंबांतून त्याचा लोप होत गेला असें दिसतें. नवीन देवाच्या मागे लागलें म्हणजे जुना मागे पडणें स्वाभाविक आहे. स्थानपालट झाला की कुलस्वामीपालट होतो. असे पालट फारच झाले आहेत. भिड्यांनी मात्र आपला कुलस्वामी कायम ठेवला हें विशेष आहे. ह्या सर्व विवेचनावरून नित्युंदन गोत्राचें मूळ एकच

१ श्री. कृष्णाजी सखाराम सहस्रबुद्धे म्हणतात आमचें पूर्वीचें नांव पिंपळखरे होतें.

कुटुंब असावें असें वाटतें आणि तें भाडभोके हें होय. वैशंपायन दाक्षणस आढळत नाहीत. ह्यावरून भाडभोके आडनांवाच्या नंतर वैशंपायन आड-नांव प्रचारांत आलें असावें आणि तें कांही तरी निमित्ताने पडलें असण्याचा संभव आहे. भिडे गुहागरच्या दक्षिणेस गेले. आगलावे आपण मूळचे गुहागरचे सांगतात हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

## भारद्वाज

ह्या गोत्रांत २० आडनांवें आहेत. पैकी कण्याचे, गांधारे, गांगल, चोळकर, टेणे, नेकणे, बेलेकर, लागू, सोहोनी ह्या ९ आडनांवांची माहिती आम्हांस मिळाली नाही. बाकीच्या ११ मध्ये आखवे, रानडे व मनोहर ह्यांचें पूर्वीचें एक कुटुंब होतें. मनोहर व आखवे ह्यांचें मूळ आड-नांव रानडे होतें म्हणतात. मनोहरांतून फफे निघाले. टिळक-पंचांगांत हें नांव नाही. आमच्याकडे फफ्यांची माहिती आली आहे. कांही ठिकाणीं अधिकारपरत्वें रानडे ह्यांस बक्षी हें नांव पडलें आहे. ह्यानंतर आचवल, रहाळकर व जोशी असा एक गट पडतो. मूळ आचवल असून रहाळकर व जोशी हीं पाठीमागचीं नांवें होत. तेव्हा आता मुख्य नांवें म्हणजे रानडे, आचवल, गोळे, घांघुरडे, दर्वे, घैसास हीं होत. कारण वैद्य घैसासांत मोडतात. मनोहरांपैकीसुद्धा एकाने वैद्य आडनांव धारण केलें आहे. उपाध्ये हें आणखी एक घैसासांचें नांव आहे. घैसास, रानडे, मनोहर, आचवल, रहाळकर, घांघुरडे हे सर्व केळशी, हर्णै, मुरूड, करजगांव ह्या गांवचे म्हणजे दापोली तालुक्यांतले. रानडे जयगड खाडींत परंतु चिपळूण तालुक्यांत असलेल्या मोभार गांवचे म्हणून सांगतात. तथापि ज्या अर्थी बहुतेक रानड्यांचा कुलस्वामी व्याघ्रेश्वर आहे त्या अर्थी ते मुरूडच्या बाजूचेच पूर्वी असावयास पाहिजेत. हा व्याघ्रेश्वर आसूदचा आहे हें मोभाऱ्यास राहणाऱ्या रानड्यांनाहि मान्य आहे. गुहागरच्या उत्तरेची म्हणजे दापोली

तालुक्यांतील वस्ती नवीन आहे ही गोष्ट निःसंशय आहे. गुहागरच्या दक्षिणेस ह्या आडनांवाच्या लोकांची फारशी वस्ती नाही. त्यामुळे हे सर्व मूळ गुहागरचे असें मानल्याशिवाय गत्यंतर नाही.

गोळे हे मूळ गुहागरचे. त्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे.[१] कांहीकांचा कुलस्वामीहि वाडेश्वर आहे. त्याचप्रमाणे कांही आमचा मूळ गांव गुहागर असें सांगणारे आहेत. गुहागरास पूर्वी गोळे घराणें होतें असें गुहागरचे लोकहि सांगतात. घांघुरड्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहेच. आता रानडे व गोळे हे मूळचे एक असतील काय! गोळ्यांच्या नैवेद्यांत जलदेवतेला नैवेद्य आहे. मोभाऱ्याच्या रानड्यांच्या नैवेद्यांत पाणबुडी ही एक स्थानिक देवता आहे. ह्या दोन देवतांत कांही साम्य आहे कीं काय ह्याचा शोध केला पाहिजे. मोभाऱ्यास व्याघ्रांबरी देवीचें देऊळ आहे. ही देवी गुहागरच्या व्याघ्रांबरीची नक्कल असण्याचा संभव आहे. म्हणजे रानड्यांनी ही देवी स्थापून गुहागरची आठवण ठेविली असें म्हणतां येईल. गोळ्यांची करंजेश्वरी रानड्यांच्या देवतांत नाही ह्याचें कारण ह्या देवी बायकांनी माहेराहून आणल्या असाव्या. ह्याशिवाय गोळे आश्वलायन असून रानडे हिरण्यकेशी आहेत.

दर्वे नांदिवड्याचे. त्या कारणाने तेथील स्थानिक देव कऱ्हाटेश्वर हा त्यांचा कुलस्वामी झाला. एकाच दर्व्यांची माहिती आल्यामुळे कोणतेंच अनुमान काढतां येत नाही. परंतु दर्वे ह्या आडनांवांतून दुसरीं आडनांवें निघाल्याचें कोणी सांगत नाही व दर्वे नांवाचीं कुटुंबें तर विरळा आढळतात. ह्याचें कारण शोधण्यासारखें आहे.

सारांश, भारद्वाज गोत्राचें एक कुटुंब असण्याचा संभव बराच दिसतो. गुहागर हेंच ह्या गोत्राचें मूळ ठिकाण.

---

१ गोळे कुलवृत्तान्त, शाखा ३,४,५ पाहा.

## कपि

कपि गोत्रांत मराठे, लिमये, करंदीकर हीं प्रमुख घराणीं होत. लिमयांतून करंदीकर निघाले. म्हणून मराठे व लिमये हींच दोन घराणीं राहतात. मराठ्यांना पुढे चक्रदेव व जाईल हे फाटे फुटले. त्यांच्याचपैकी एका कुटुंबाने विद्वांस नांव धारण केलें. खांबेट्यांचें पहिलें नांव मराठेच होतें. आणि खांबेट्यांपैकी कांही जण पुढे साने व काळे झाले. हें कसेंहि असो; हीं कुटुंबे जेथे गेलीं तेथील कुलस्वामी त्यांनी घेतला. कल्याला लक्ष्मीकेशवाचें देऊळ आहे. लिमये कल्यांचे. तेव्हा त्यांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव झाला. विद्वांसांनी केळशीस वास्तव्य केल्यामुळे नजीकच्या आसूदचा व्याघ्रेश्वर आपलें कुलदैवत बनविलें. आंजर्ल्याच्या खांबेट्यांचें कुलदैवत केशवराज हें आहे.[1] मराठे मूळचा चित्पावनांचा प्रांत सोडून दूर आजगांवाला (सावंतवाडी) जाऊन राहिले त्यामुळे त्यांच्या कुलस्वामींची कुतरओढ झालेली दिसते. आजगांवीं वेताळाचें देऊळ असल्यामुळे तिकडील मंडळी वेतोबाची उपासक बनली आहे. तथापि ह्या सर्व घोटाळ्यांत कपिगोत्री अनेक कुटुंबांत वाडेश्वर डोकावतो आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. धारपांचा कुलस्वामी वाडेश्वर. मराठ्यांपैकी जाईल दुमदेवाला राहिले त्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. पुण्याचे व भिवंडीचे मराठे आपला कुलस्वामी वाडेश्वर म्हणून लिहून देतात. एका सान्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. रत्नागिरीच्या बाळाजी हरि मराठ्यांच्या माहितीप्रमाणे मराठे हे मूळचे कोतवड्याचे. तेथून ते ५०० वर्षांपूर्वी आजगांवास गेले. तेथे ते कांदेरकर ह्या उपनांवाने ओळखले जातात. हें नांव त्यांस शेतावरून पडलें. त्यांच्या एका स्थावर मिळकतीचें नांव कागदोपत्रीं "ठिकाण कांदेरें" असें

---

१ आंजर्ल्याजवळच्या तुरडे गांवीं लक्ष्मीकेशव (लक्ष्मीनारायण) ह्या देवाचें देऊळ आहे.

लागलेलें आहे. कांही मराठे आपली कुलस्वामिनी महालक्ष्मी सांगतात त्याचें कारण कोतवड्यास महालक्ष्मीचें देऊळ आहे. मात्र कोतवड्यास मराठे पूर्वी कधीकाळीं होते हें आता कोणास माहीत नाही. एका लिमयांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. गुहागराशीं संबंध नसतांना वाडेश्वर कुलस्वामी असेल तर कपिगोत्री लोकांचें प्रथम वास्तव्य गुहागर येथेच झालें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. वाडेश्वर सांगणारे लिमये मूळचे कल्यांचे; हल्ली त्यांचें वास्तव्य कोंकणांतच मालगुंड गांवीं आहे. एका घराण्याने आपला मूळ कुलस्वामी रक्षण करून ठेविला आहे. कल्यांचा लक्ष्मीकेशव हा आम्ही ग्रामदेव समजतों असें नानासाहेब खासगीवाले ह्यांनी आम्हांस सांगितलें. ह्यावरून लिमये पूर्वीचे गुहागरचे असून त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असावा असें वाटतें. मराठे मूळ साठांपैकी नाहीत; जाईल आहेत. जाइलांनी वाडेश्वर सोडला नाही. तेव्हां मराठ्यांचा वाडेश्वर हाच कुलस्वामी असला पाहिजे. लिमये व जाईल अगर मराठे हीं दोन मूळचीं नांवें.

कपि गोत्रांतील २६ आडनांवांपैकी काळे, कामाठी, जोगदेव, जोशी, दलाल, नाईक, माईल, भट, भागवत, भाटे, राणे, बांठे व शेवडे ह्या १३ आडनांवांची माहिती आमच्याकडे आली नाही. मराठे, लिमये व घारप ह्यांचा वाडेश्वराशीं संबंध असल्याचें आम्हीं वर दाखविलें आहे. मराठ्यांत चक्रदेव, रटाटे, जाईल, खांबेटे, विद्वांस ह्यांचा समावेश होतो. लिमयांत करंदीकर, खासगीवाले येतात. कापरेकर ह्यांचें पूर्वीचें नांव भागवत होतें. त्यांचा व मायदेवांचा कुलस्वामी अपुऱ्या माहितीमुळे निश्चित करतां येत नाही. साने देवरूखचे. रघुपति कुलस्वामी सांगणारे साने आपल्या खऱ्या स्वामीला विसरले आहेत. तथापि जनार्दन भालचन्द्र साने आमचें मूळ गांव कोटळूक होतें, तेथून आम्ही कापज्यास आलों असें म्हणतात. कोटळूक हें गुहागर पेठ्यांत आहे. कापरें चिपळूणजवळ

आहे. कापरेकर ह्याच गांवचे. ह्यावरून साने गुहागरच्या आसपास पूर्वी होते हें निर्विवाद. म्हणून गुहागराशीं त्यांचा संबंध जोडण्यास हरकत नाही. कांही सान्यांना राजापूरच्या गंगेवर वृत्ति आहे. तेव्हा साने गुहागर कोटळूक–कापरें–देवरूख–राजापूर असे पसरले असें वाटतें.

## कौंडिण्य

ह्या गोत्रांत पटवर्धन हेंच एक मुख्य घराणें दिसतें. आचारी, कटके हे पटवर्धनांचे भेद पूर्वीपासून मानले जात आहेत. काकेतकर व आचार्य, हे पटवर्धनांतूनच निघाले असले पाहिजेत. फणशांची कुलस्वामिनी एकजात करंजेश्वरी आहे. ह्यावरून फणशे मूळचे पटवर्धन असावेत ह्याविषयी संशय राहत नाही. पटवर्धनांनी आपला कुलस्वामी घालवला आहे. करंजेश्वरी ही कुलस्वामीची जागा घेऊं शकत नाही. दीक्षित धरून १८ पटवर्धनांनी माहिती दिली. त्यांच्या कुलदैवतांत ८ करंजेश्वरी, ६ गणपति, २ वाडेश्वर, १ अंजनेश्वर, व १ वाडेश्वर-गणपति ह्याप्रमाणे कुलस्वामी व कुलस्वामिनी आहेत. आता गणपति हें कुलदैवत मागूनचें आहे हें उघड आहे. वाडेश्वर-गणपति ह्या जोड कुलस्वामींत गणपतीबरोबर वाडेश्वर आहे हें ध्यानांत ठेवलें म्हणजे बाकीच्यांचा वाडेश्वर कुलस्वामी कसा सुटत गेला असेल ह्याची कल्पना करतां येईल.

करंजेश्वरी हें एकच कुलदैवत सांगणारे आठ आहेत हें खरें; परंतु पटवर्धन घराणें देखील देवीभक्त नाही हें सिद्ध करण्यास दुसऱ्यांनी गणपति-करंजेश्वरी हें जोडकुलदैवत सांगितलें आहे ही गोष्ट विचारांत घेतली पाहिजे. चित्पावन शैव आहेत. त्यांचा कोणता तरी शंकर हा कुलस्वामी असतो. तथापि तो एकटा नसतो. त्याच्याबरोबर एखादी देवी असते. तेव्हा केवळ देवी कुलदैवत सांगणाऱ्यांनी आपला कुलस्वामी गमावला आहे असें मानावें लागतें. हा गमावलेला कुलस्वामी वाडेश्वरच असला पाहिजे.

दोघांनी वाडेश्वर सांगितला आहेच. ह्यांपैकी एक पोमेंडीचे आहेत. आता गणपति सांगणारे दुसरे पोमेंडीकर पटवर्धन ह्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. तसेंच आगरगुळ्याच्या पटवर्धनांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. हेहि आपला कुलस्वामी गणपति सांगतात. दक्षिण कानडाच्या पटवर्धनांनी करंजाईसहित वाडेश्वर हें आपलें कुलदैवत असल्याचें लिहून पाठविलें आहे. ह्यावरून पटवर्धनांचा कुलस्वामी वाडेश्वर असें आम्ही ठरवितों. तोच फणशांचा असला पाहिजे. आम्हांला आचार्य, आचारी, काकेतकर कटके ह्या कुटुंबांची माहिती मिळाली नाही. काकतकर ह्यांची मिळाली, पण ते वत्सगोत्री आहेत. मुंडाजी येथे काकतकर आहेत. परंतु ते कऱ्हाडे असावे असें त्र्यंबकेश्वरच्या माहितीवरून दिसतें. सारांश, कौंडिण्य गोत्रांत पटवर्धन हेंच मूळ कुटुंब व त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर.

## गार्ग्य

गार्ग्य गोत्राचें मोठें वैशिष्टय म्हणजे गाडगीळ हें एकच मुख्य कुटुंब होय. पंचांगांत दिलेल्या सर्व आडनांवांचें मातृस्थान गाडगीळ हें होय. एका गाडगीळ ह्या आडनांवांतून ३० दुसरीं आडनांवें निघालीं इतकें मोठें श्रेय दुसऱ्या कोणत्याहि एका आडनांवाला मिळालें असेल असें वाटत नाही. ह्याशिवाय, दुसरी लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे गाडगीळ ह्यांचें मूलस्थान वेळणेश्वर व कुलस्वामी वेळणेश्वर हें निरपवाद किंवा निःसंशय म्हणतां येतें. परंतु दुसरी तितकीच विचार करण्यासारखी गोष्ट ही की, आम्ही पूर्वीचे गाडगीळ म्हणविणारे पण भिन्न भिन्न आडनांवें धारण करणारे वेळणेश्वर कुलस्वामी अथवा मूळ गांव सांगत नाहीत. कर्वे, केतकर, वैद्य, वझे, थोरात, जोशी हे सर्व हरेश्वरवाले आहेत. ह्यांपैकी कर्वे हे गाडगिळांपासून निघाले असें कोणी म्हणत नाही हें खरें. तेव्हा कर्वे घराणें जर स्वतंत्र मानलें तर केतकर, वैद्य, जोशी, वझे व थोरात हे गाडगिळांत

न मोडतां कर्व्यांत मोडतील. परंतु दंतकथा खणखणीत आहे ह्यांत संशय नाही. मूळ गांवावरून विचार केला तरी सुद्धा वरील घराण्यांचें कर्व्यांशींच अधिक जुळण्यासारखें आहे. कर्वे आणि गाडगीळ हीं दोन ह्या गोत्रांतील मूळ आडनांवें असावीं असें वाटतें. गार्ग्य गोत्राचा गुहागराशीं संबंध लावतां येत नसला तरी गुहागराला गाडगिळांचें घराणें आहे.

## अत्रि गोत्र

चितळे, चिपळोणकर, चोळकर, चापेकर, जोगळेकर, फडके, मोने व आठवले एवढींच नांवें ह्या गोत्रांत आहेत.

चितळे— चितळे हे सामान्यतः चिपळूणचे व त्यांचा कुलस्वामी वीरेश्वर असें म्हणण्यास हरकत नाही. परंतु चितळे घराण्याच्या इतिहासावरून चिपळूणचे चितळे हे चिपळूणला नेवऱ्याहून आले असें म्हणावें लागतें. हें ४, १८, २१, २३ ह्या घराण्यांची हकीकत वाचली असतां समजून येईल. ह्यामुळे वीरेश्वर हा चितळ्यांचा मूळ कुलस्वामी नव्हे हें स्पष्ट होतें. चिपळूण येथे वस्ती केल्यानंतरचा तो कुलस्वामी आहे. नेवऱ्याचे म्हणविऱ्या चितळ्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. त्याचप्रमाणे नरवणहून चिपळूणला गेलेल्या चितळ्यांचाहि कुलस्वामी वाडेश्वरच आहे (घराणीं १२ व १८). गुहागरच्या चितळयांचा कुलस्वामी वाडेश्वर असणें स्वाभाविकच आहे. ह्यावरून चितळ्यांचा मूळ कुलस्वामी व मूळ गांव अनुक्रमें वाडेश्वर व गुहागर होत असें अनुमान करणें भाग आहे. कारण नेवऱ्याला अगर नरवणला वाडेश्वराचें देऊळ नाही.

मोने ह्यांचें पूर्वीचें नांव चितळे ह्याविषयी शंका नाही. मोने आपण कोतवड्याचे म्हणतात आणि तेथील देवी महालक्ष्मी ही कुलस्वामीच्या ठिकाणीं मानतात. ह्यावरूनहि चितळे चिपळूणचे नव्हत ही गोष्ट सिद्ध होते.

आठवले—गुहागर मूळ ठिकाण सांगणारे एक आठवले आहेत. परंतु त्यांना आपला कुलस्वामी माहीत नाही. ह्यावरून आठवले हें आडनांव पडलें तेव्हा हें घराणें गुहागरला होतें असा तर्क करतां येण्यासारखा आहे. फडक्यांप्रमाणे सोमेश्वर हें मूळ गांव सांगणारे आठवले आहेत. सोमेश्वर, रवळनाथ हे स्थानिक देव अशा आठवल्यांनी आपले कुलस्वामी बनवले. नाचणें व दांडे अडोम येथील आठवले आपला कुलस्वामी विसरले आहेत. मुंढ्र्जे येथील आठवल्यांचा कुलस्वामी वीरेश्वर आहे. चिपळूणचा हा वीरेश्वर असल्यास अत्रि गोत्रांत कोठेना कोठेतरी तो डोकावतांना दिसतो. आमणेश्वर कुलस्वामी मानणारे दोन आठवले आहेत. एकंदर १४ आठवल्यांची माहिती मिळाली; परंतु ती अत्यंत असमाधानकारक आहे. ३ सोमेश्वर, ३ जोगेश्वरी, ४ माहीत नाही, २ आम्नायेश्वर, १ रवळनाथ, १ वीरेश्वर अशी आठवल्यांच्या कुलस्वामीची केविलवाणी स्थिति आहे. सध्या सोमेश्वर आठवल्यांचा कुलस्वामी मानावा हें बरें दिसतें.

चिपळूणकर—चिपळोणकरांचा कुलस्वामी एक वीरेश्वर आहेच. कुर्लेकरांचें आडनांव चिपळोणकर. ते आपण मूळचे नेवऱ्याचे असल्याचें सांगतात. दुसरे एक चिपळूणकर आपला मूळगांव फणसोप म्हणून म्हणतात. म्हणजे नेवऱ्याच्या बाजूला अत्रिगोत्र एकवटलेलें दिसतें. एक चितळे—चिपळूणकर नेवऱ्याचे असून कुलस्वामी वाडेश्वर असल्याचें एका सनदेंत नमूद आहे.[1] चितळे व चिपळूणकर एकच असल्याने दोघांचा कुलस्वामी वाडेश्वरच असावा.

जोगळेकर—जोगळेकर हे हेदवी गांव सांगतात. ह्याशिवाय कोतवडें, नेवरें-वाडा ढोकंबळें व अडूर सांगणारेहि जोगळेकर आहेत. ह्या ठिकाणच्या लोकांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. हेदवीचे कांही इसम वीरेश्वर सांगतात.

१ सातारचे बाळकृष्ण महिपत चिपळूणकर ह्यांचें खासगी पत्र.

पण हा देव महाडचा आहे म्हणून त्याचा विचार करण्याचें कारण नाही. कांही हेदवीवाले वाडेश्वर सांगणारे आहेतच. मिटगांवण्याचे जोगळेकर अंजनेश्वर सांगतात ह्यांत आश्चर्य नाही. कारण तो मिठगांवण्याचा स्थानिक देव आहे. नेवऱ्याला अथवा वाडा ढोकंबळ्यास वाडेश्वर आहे ही गोष्ट खरी. परंतु हा वाडेश्वर फारसा प्रसिद्ध नाही. गुहागरच्या वाडेश्वरची ही नक्कल असावी. नेवऱ्यास गेल्यावर आपल्या कुलस्वामीचें देऊळ तेथे कोणींतरी बांधलें असावें. कोतवड्यास वाडेश्वर नाही. तसाच हेदवीसहि नाही. तथापि तेथील जोगळेकरांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. या सर्व कारणांमुळे जोगळेकरांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे असें समजणें युक्त आहे.

**चापेकर**— चापेकरांचा कुलस्वामी हरेश्वर असावा असा निर्णय देणें योग्य आहे. वेळणेश्वरचे चापेकर हरेश्वर हा आपला कुलस्वामी सांगतात. रत्नागिरीस किंवा कल्यास गेलेल्या चापेकरांचा कुलस्वामी वेळणेश्वर आहे. हे वेळणेश्वराहून कल्यास गेले. ज्यांनी आपली कुलस्वामिनी भवानी केली आहे त्यांच्या नैवेद्यांत वेळणेश्वर व हरेश्वर हे दोन्ही देव येतात. हरेश्वर व हरिहरेश्वर एकच. देव हरेश्वर असला तरी सर्व चापेकरांचें मूळ गांव वेळणेश्वर ह्यांत संशय नाही. हा हरेश्वर कोणत्या गांवचा ह्याविषयी मात्र वाद आहे. श्रीवर्धनजवळील हरेश्वर असें कित्येक मानतात. परंतु ह्या हरेश्वरीं चापेकरांची कधीकाळीं वस्ती होती असें मानण्यास थोडेंसेंहि प्रमाण नाही. गोळप, नेवरें वगैरे ठिकाणीं हरेश्वराचें देऊळ आहे. तेथील हरेश्वर कुलस्वामी असणें अशक्य नाही. तथापि चापेकरांचा कुलस्वामी हरेश्वर व गांव वेळणेश्वर असें सध्या मानणें भाग आहे.

दावक हे आम्ही पूर्वी चापेकर होतों असें म्हणतात; परंतु श्रीवर्धनाच्या पलीकडे ते जाऊं शकत नाहीत. त्यांचा कुलस्वामीहि टिकून राहिला नाही.

चोळकर— हर्णे-मुरडाच्या पलीकडे म्हणजे दक्षिणेस चोळकर आडनांव आढळत नाही. हे मुरुडच्या आसपास राहणारे. कुलस्वामी वीरेश्वर सांगतात. ह्या वीरेश्वर चिपळूणचा असें श्री. वामन कृष्ण चोळकर म्हणतात. परंतु दुसरे मुरुडचे चोळकर महाडचा वीरेश्वर समजतात. आमच्या मतें अंब्याची जोगेश्वरी, काशीचा कालभैरव, हरेश्वरचा हरिहरेश्वर ह्यांप्रमाणेच महाडचा वीरेश्वर हा भ्रम आहे. चिपळूणचा वीरेश्वर मागे पडून महाडचा वीरेश्वर पुढे आला इतकेंच ह्यावरून समजावयाचें आणि त्याचें कारणहि उघड आहे. उत्तरेच्या बाजूला लोक सरकत चालले तसे दक्षिणेकडील देव त्यांच्या दृष्टिआड होऊं लागले. तशांत महाडास वीरेश्वर नसता तर कदाचित् चिपळूणचा वीरेश्वर स्मृतिच्युत होता ना. असो. चोळकरांचा कुलस्वामी वीरेश्वर एवढें निश्चित. त्यांचा व जोगळेकरांचा कांही संबंध दिसत नाही.

फडके— फडक्यांचे सामान्यतः दोन भाग पडतात. कुर्ध्यांच्या फडक्यांचा कुलस्वामी लक्ष्मीनारायण किंवा महाविष्णु असून सोमेश्वरच्या फडक्यांचा वाडेश्वर आहे. कुर्ध्यास लक्ष्मीनारायणाचें देऊळ आहे त्यामुळे ह्या कुलस्वामीचा विचार करण्याचें कारण नाही. सोमेश्वरच्या फडक्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे ह्यावरून सर्व फडक्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे असें अनुमान करणें अवश्य आहे. महाडचा वीरेश्वर आमचा कुलस्वामी आहे असें दोघांनी लिहून दिलें आहे. मुंडुज्याच्या एका फडक्याने वीरेश्वर व दुसऱ्याने सोमेश्वर सांगितला. ह्यांचा हा वीरेश्वर चिपळूणचा कीं काय हें समजण्यास साधन नाही. महाडचा असेल तर महाडाहून हें फडके घराणें दक्षिण कानड्याला गेलें असें म्हणावें लागेल. महाडचा वीरेश्वर कुलस्वामी मानण्यास तरी कितपत आधार आहे ह्याची शंका येते. अत्रिगोत्राचे लोक चिपळूण, नेवरें, सोमेश्वर, हेदवी वगैरे ठिकाणीं

फाकले असें दिसतें. महाड हें त्यांच्या प्राचीन स्थित्यंतरांपैकी ठिकाण दिसत नाही.

सारांश, फडक्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर होय.

आता सर्व अत्रि गोत्राच्या कुटुंबांचा साकल्याने विचार करूं.

| आडनांव | गांव | कुलस्वामी |
|---|---|---|
| चापेकर | वेळणेश्वर | हरिहरेश्वर |
| चोळकर | मुरूड | वीरेश्वर |
| चितळे | गुहागर | वाडेश्वर |
| आठवले | | सोमेश्वर |
| फडके | गुहागर | वाडेश्वर |
| जोगळेकर | गुहागर | वाडेश्वर |

हे आम्हीं ठरवलेले कुलस्वामी आहेत. ह्यांत सहांपैकी तिघांचा कुलस्वामी वाडेश्वर सांगतां येतो. वीरेश्वरवाले चोळकर हे चितळ्यांपैकी होत.

## वत्स गोत्र

वत्स गोत्राचीं २१ आडनांवें आहेत. त्यांपैकी नेवरे, हिरे, मायले, शीवडे, हेर, घाटे, गांगल, गारगेकर, गोवित्रीकर, दाभोळकर, होळे, गांगलेकर, ह्या १२ घराण्यांची माहिती आम्हांस मिळाली नाही. कांही आडनांवें लुप्त झालेलीं आहेत. त्या आडनांवांचीं कुटुंबें नष्ट झालीं कीं काय समजत नाही. होळे, गोवित्रीकर, दाभोळकर ह्या आडनांवांचीं कुटुंबें आहेत. ह्या सर्वांचें मूळ आडनांव जोशी असें होतें. घांगरेकर व गांगरेकर–गांगले-कर हे सर्व मूलतः एकच असून त्यांचें पूर्वीचें नांव मालशे.

बाकी ९ आडनांवें उरलीं. त्यांत सोवनी, काळे, गोरे, उकिडवे व जोशी हीं प्रमुख आडनांवें आहेत. बाकी ४ पैकी काकतकर काळ्यांत जमा; सुगवेकर जोशांत मोडतात व घांघरेकर हे कोणी म्हणतात जोशी, कोणी

म्हणतात मालशे. आमच्याकडे घांगरेकर ह्यांनी दुसरें उपनांव जोशी म्हणून लिहून दिलें आहे. परंतु नाशीक त्र्यंबकेश्वरच्या क्षेत्रोपाध्यांकडून मिळालेल्या माहितींत घांघरेकर हें मालशांचें दुसरें नांव असें समजलें. दोनहि गोष्टी खऱ्या असतील तर मालसे व घांघरेकर दोनहि मूळचे जोशी असें म्हणतां येईल. परंतु ६० आडनांवांत वत्स गोत्रांत मालसे हें एकच नांव आहे. वत्सगोत्री काळे, गोरे हीं दोन आडनांवें एकाच कुटुंबाचीं होतीं हें मुंद्र्जें येथील चित्पावनांच्या हकीकतीवरून दिसून येतें. ह्यानंतर काळे आणि जोशी एकच. उकिडवे, सोवनी ह्यांचेंहि आडनांव काळे होतें असें क्षेत्रोपाध्याय सांगतात. तेव्हां वत्स गोत्रांत काळे एवढेंच आडनांव शिल्लक राहतें.

परंतु आपण सोवनी, उकिडवे, काळे ह्यांचा स्वतंत्र रीतीने विचार करूं; सोवनी हे बहुतेक निरपवाद सोमेश्वर कुलस्वामीवाले असून सोमेश्वरचेच राहणारे आहेत. गुहागरच्या सोवन्यांचा सुद्धा कुलस्वामी सोमेश्वर आहे. एक सोवनी मात्र आम्ही हिंदळ्याचे असें म्हणतो. नागपूरचे दोन सोवनी आपलें गांव पोमेंडी म्हणून सांगतात. तथापि त्यांच्या नैवेद्यांत सोमेश्वर आहे. सारांश, सोवनी सोमेश्वरचे असें सध्या गृहीत धरून चाललें पाहिजे. सोमेश्वरला भारद्वाजगोत्रीहि सोवनी आहेत. सोमेश्वरला गेल्यानंतर ह्या घराण्याला सोवनी नांव पडलें असण्याचा संभव आहे.

काळ्यांचा कुलस्वामी कालभैरव आहे. हा कालभैरव हिंदळ्याचा असें एक जण स्पष्ट सांगतो. गुहागरच्या काळ्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. त्यांच्या नैवेद्यांत कालभैरव किंवा सोमेश्वर नाही.

हिंदळ्याला रामेश्वर आहे. म्हणून तोहि कित्येकांनी आपला कुलस्वामी बनविला आहे. आंजर्ल्याच्या काळ्यांचा कुलस्वामी रामेश्वर आहे. "आमचें कुलदैवत हिंदळ्याचा कालभैरव आहे. मुख्य दैवतें रामेश्वर आणि रवळनाथ"

असें बेळगांवचे श्री. रा. कृ. काळे लिहितात. आडिवऱ्याच्या गोऱ्यांचाहि कुलस्वामी कालभैरव आहे. एक जण खेरीज करून सर्व उकिडवे कालभैरव सांगतात. ह्या इसमाचें कुलदैवत मुसलादेवी आहे. ह्यावरून उकिडवे, काळे व गोरे हे सर्व कालभैरववाले असून मूळचे हिंदळ्याचे असले पाहिजेत. उकिडवे सर्व सांवतवाडी संस्थानांतील माणगांवचे. काळे आडिवरें, गोळप, नरवण, उपळें, सातर्डे ह्या ठिकाणीं पसरले. हिंदळें हें देवगड तालुक्यांतील मूळ गांव मानलें तर काळे, गोरे वर उत्तरेकडे गेले; उकिडवे खालीं दक्षिणेला वळले असें दिसतें.

सारांश, सध्या सोवनी सोमेश्वरचे व बाकीचे बहुतेक वत्सगोत्री चित्पावन हिंदळ्याचे असें ठरतें. तथापि गुहागरचे काळे मूळपासून तेथील असल्यास सर्व वत्सगोत्री चित्पावन गुहागरचे असा तात्पुरता तर्क करून पुढील संशोधन करणें इष्ट होईल. कारण मालशांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे व हेंच वत्सगोत्रियांचें आदिनांव. ह्या एका नांवांतून बाकीचीं नांवें निघालीं असावीं.

## काश्यप

काश्यप गोत्रांत गोखले घराणें प्रमुख दिसतें. गाडगिळांप्रमाणे गोखले मूळचे वेळणेश्वरचे व त्यांचा कुलस्वामीहि वेळणेश्वरच. बडे हे गोखल्यांतून निघाले म्हणतात; परंतु त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असून ते कोळथरचे राहणारे. त्यामुळे बडे=गोखले हें समीकरण साधार असल्याची शंका येते. खाडीलकर प्रायः मूळचे गुहागरचे असल्याने त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असणें स्वाभाविक आहे. बिवलकर, भट, दारशेतकर, गानू हे विष्णुदेवती आहेत, दारशेतकर व फाळके हे भटांत मोडतात. लक्ष्मीनारायण, लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनृसिंह हे त्यांचे कुलस्वामी. जोग सर्व नांदिवड्याचे व तेथील कऱ्हाटेश्वर हा त्यांचा कुलस्वामी. काश्यपगोत्री जोशी बहुधा मुरूडचे असून त्यांचा

कुलस्वामी व्याघ्रेश्वर आहे. करमरकर व लेले ह्यांच्यांत कुलस्वामीचा धरबंध नाही. वाडेश्वर, वेळणेश्वर, हरेश्वर हे निरनिराळ्या लेल्यांचे कुलस्वामी आहेत. करमरकरांना आपला कुलस्वामी माहीत नसावा असें दिसतें. ११ करमरकरांत १ गणपति, १ जोगेश्वरी, १ अंबाबाई, १ नवलाई, १ आदिष्टादेवी, १ केळाई, १ कालभैरव व ४ हरिहरेश्वर ह्याप्रमाणे कुलदैवतें आहेत. ह्यांत हरिहरेश्वरावांचून बाकीचे कुलस्वामी चुकीचे आहेत ह्यांत संशय नाही. तेव्हा राहिला एक हरिहरेश्वर; परंतु एका नेवऱ्याच्या करमरकरांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. हा वाडेश्वर तेथे येण्याचें कांही कारण दिसत नाही. ह्यावरून करमरकर मूळचे वाडेश्वरवाले असावे असें अनुमान करणें अनुचित होणार नाही.

करमरकर हे सोमेश्वर, नाचणें, नेवरें, मिरजोळें ह्या गांवचे राहणारे. हीं सर्व गांवें रत्नागिरी तालुक्यांत आहेत. गुहागरच्या उत्तरेस ह्यांचा संबंध दिसत नाही; आणि ह्यांचा कुलस्वामी हरेश्वर दिसतो. तेव्हा हा हरेश्वर रत्नागिरी तालुक्यांतील गोळपचा हरेश्वर असावा असें वाटतें. गुहागराहून दक्षिणेस गोळपला जाऊन पुनः उत्तरेस ह्या कुटुंबाचा मोर्चा फिरलेला दिसतो.

कुलस्वामी कसे बदलतात हें लेल्यांचा उदाहरणावरून समजण्यासारखें आहे. बसणी व गोळप येथील लेल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. परंतु गोळपचे लेले हे मूळचे वेळणेश्वरचे असें म्हणतात. म्हणून कांही लेल्यांत वेळणेश्वर व हरेश्वर हे कुलस्वामी येऊन बसले. डोंगरच्या व मुटाटच्या लेल्यांना पूर्वीच्या कुलस्वामीची आठवण राहिली नाही. त्यांनी स्थानिक देव कुलस्वामी केला. गुहागरशीं संबंध नसतांना ज्या अर्थी कित्येक लेल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे त्या अर्थी सर्व लेल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असण्याचा संभव आहे. गोखल्यांप्रमाणे बरेचसे लेले वेळणेश्वरचे असावे.

गुहागर, वेळणेश्वर, बसणी, गोळप, डोंगर, मुटाट असें हें लेल्यांचें संक्रमण दक्षिणेकडे झालेलें दिसतें.

गोखल्यांपैकी एकहि चुकून सुद्धा वाडेश्वर सांगत नाही. तसेंच त्यांच्या-पैकी कोणाच्या नैवेद्यांतहि वाडेश्वर असलेला आढळत नाही. गोखले तेच रास्ते.

आचार्य, कातरणे, कापशे, किणकिणे, खानविलकर, जामदार, दातार, दामोदर, पणदेव, पागे, बर्वे, भेंडे, मारवलकर, मेढेकर, राणे, लेणे, वेहळे-कर, व्यास, शिवणेकर, सुकाडकर, सुकुले, सुनाके, गोगटे इतक्यांची माहिती आम्हांस मिळाली नाही.

ओगले व लवाटे एकच म्हणतात. म्हणजे ओगल्यांचें पूर्वीचें नांव लवाटे असें होतें. आणि तें खरें असण्याचा संभव आहे. एका चिपळूणच्या ओगल्यांनी आपला मूळ गांव गोळप लिहून दिला आहे. डोंबिवलीचे केशवराव ओगले ह्यांचा कुलस्वामी रवळनाथ आहे. रवळनाथ गोळपला आहे. आता लवाट्यांचा मूळ गांव गोळप आहे असें श्री. वामन रामचंद्र लवाटे कळवितात. ह्या लवाट्यांचाहि कुलस्वामी रवळनाथ आहे. परंतु मावळंग्याचे लवाटे ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ह्यांच्या नैवेद्यांत जाखाई आहे. ही देवी गोळप येथे आहे. शिवाय गोळप व मावळंगें ह्यांत फार अंतर नाही. ह्यावरून मावळंगचे लवाटे सुद्धा मूळचे गोळपचे असावेत. गोळपच्या लवाटयांनी वाडेश्वर सोडून स्थानिक रवळनाथ स्वीकारला. परंतु मावळंगच्या लवाटयांनी तो कायम ठेवला. मावळंग्याला विमलेश्वर आहे तो हळू हळू कुलस्वामीच्या योग्यतेला पोचणार असें दिसतें. असो. आमच्या मतें गोळपहून ओगले बाहेर पडले ते देवगड वेंगुर्ल्याकडे गेले. लवाटे व ओगले एकच व दोघांचा अतिप्राचीन कुलस्वामी वाडेश्वर असें आम्हांस वाटतें.

काश्यपगोत्री वेलणकर आपला मूळ गांव वेळणेश्वर सांगतात. परंतु तिहींपैकी दोघांनी आपला कुलस्वामी वाडेश्वर सांगितला आहे. ज्यांनी वेळणेश्वर सांगितला ते नाडणचे. तथापि दुसऱ्या नाडणच्या वेलणकरांनी वाडेश्वर सांगितला असल्यामुळे वेलणकरांचा कुलस्वामी वाडेश्वर असें आम्ही ठरवितों.

शिंत्रे दापोली तालुक्यांतील कोंगळ्याचे. त्यांनी पंचनदीचा सप्तेश्वर आपला कुलस्वामी केला. त्यांचा पूर्वीचा संबंध गुहागराशीं जोडण्यास कांही साधन नाही. दातीर व शिंत्रे एकच. कान्हेरे खेड तालुक्यांतील आयनी गांवचे. ह्यांचा कुळस्वामी सोमेश्वर घेऊन चाललें पाहिजे. कारण पलीकडे थांग लागत नाही.

गोखल्यांतून ९ आडनांवें निघालीं असें म्हणतात; उ. कातरणे, शिवणेकर, रास्ते, जामदार, पणदेव, बडिये (बडे), मारवलकर, पाळकर व बेहळेकर हे गोखल्यांचे भेद होत. ह्यापैकी बऱ्याच जणांनी हीं दत्तक नांवें सोडून मूळ नांवाचें पुनर्ग्रहण केलें असावें. टिळक–पंचांगांत मारवलकर असें नांव आहे तें मारवेलकर असें पाहिजे. धाऊलवल्ली व देवाचें गोठणें ह्यांच्यामध्ये वाडा मारवेल नांवाचा एक लहान गांव आहे तेथील गोखल्यांना मारवेलकर गोखले म्हणत.[१] असो. हे सर्व गोखले असून ते वेळणेश्वरचे ह्यांत शंका नाही. परंतु बडयांना गोखले म्हणावयास पुरावा नाही असें आपटेहि आपल्या गोखले घराण्याच्या इतिहासांत लिहितात.[२] बडे हे मुरूडचे व गोखले वेळणेश्वरचे. दोघांचा कुलस्वामीहि निराळा. परंतु ही दंतकथा जर खरी असेल तर असें म्हणावें लागेल की, एका कुटुंबाची कांही माणसें गुहागराहून वेळणेश्वरास गेलीं. तेथे त्यांना गोखले आडनांव लाभलें. दुसरीं माणसें मुरूडला उत्तरेस आलीं. तेथे त्यांस बडे हें नांव

१ गोखले घराण्याचा इतिहास पान ९८. २ पृ.१०३-१०४.

मिळालें. ह्या कल्पनेंत गोखल्यांतून वडे निघाले असें होणार नाही. वड्यांचें पूर्वीचें आडनांव गोखले होतें असा अर्थ दंतकथेंतून निघतो. ही गोष्ट निर्विवाद असल्यास गोखल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असला पाहिजे असें म्हणावें लागेल.

खाडीलकर हे गुहागरचे असल्या कारणाने वाडेश्वरच त्यांचा कुलस्वामी असला पाहिजे. धुळ्याचे खाडीलकर गुहागरचे; परंतु त्यांनी वाडेश्वराला नैवेद्यांत टाकून जोगेश्वरीलाच कवटाळली. जे खाडीलकर देवगड तालुक्यांतील इळें दाभोळें ह्या गांवीं गेले त्यांनी तेथील लिंगेश्वर उचलला. आंजर्ल्याच्या खाडीलकरांनी वर्तक नांव धारण केलें व शेजारील केशवराज आपला कुलस्वामी बनवला. आंजर्ल्याच्या ह्या खाडीलकरांना आपण दक्षिणेकडून आलों ह्याची अद्यापि पुसट स्मृति आहे. श्री. पुरुषोत्तम नारायण वर्तक म्हणतातः–"आजोबांच्या वेळीं (१८८०) महत्त्वाच्या कागदांतून खाडीलकर वर्तक असें उपनांव लावीत असत. आंजर्लें गांवीं महाजन व वर्तक असे दोन मानकरी असून त्यांजकडे खोती असे. त्यावरून वर्तक हें उपनांव चालू झालें."

खाडीलकरांचा कुलस्वामी वाडेश्वर.

एकाच गानूची माहिती मिळाली. त्यांचा कुलस्वामी लक्ष्मीनृसिंह आहे.

काश्यपगोत्री जोशी सर्व मुरूडचे असावे. आमच्याकडे आलेल्या चारी जणांनी आपला मूळ गांव मुरूड म्हणून सांगितला आहे. तेव्हा ह्यांनी शेजारचा व्याघ्रेश्वर कुलस्वामी पतकरला ह्यांत आश्चर्य नाही. तथापि एकाच्या नैवेद्यांत आम्हांस व्याघ्रांबरी आढळली. ह्यावरून हे जोशी मूळचे गुहागरचे असावे. कारण व्याघ्रांबरी ही गुहागरची ग्रामदेवता आहे.

जोगांचा गुहागराशीं संबंध लावण्यास काहीच सुद्धा आधार दिसत नाही.

वीरेश्वर, काळभैरव, जोगेश्वरी व नुसती देवी सांगणारे छत्रे असल्यामुळे त्यांचा कुलस्वामी निश्चित करतां येत नाही. अशाच तऱ्हेची घरसोड भानूंच्या व ठोसरांच्या संबंधाने झाली आहे. भानू हें आडनांव वेळासच्या बाजूला ह्या कुटुंबाची वस्ती झाल्यानंतर पडलें असावें.

वरील चर्चेचा सारांश असा:—

एकंदर आडनांवें ४६. ह्यांत कोणाचा कुलस्वामी कोणता ह्याचा हिशेब बसतो तो:—

वेळणेश्वर—गोखले, रास्ते, पाळकर

वाडेश्वर—बडे, खाडीलकर, जोशी, करमरकर, वेलणकर, लवाटे, ओगले, लेले

करह्राटेश्वर—जोग

सोमेश्वर—कान्हेरे

सप्तेश्वर—शिंत्रे, दातीर

लक्ष्मीनारायण, लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनृसिंह—भट, बिवलकर, दारशेतकर, गानू, फाळके

| | |
|---|---|
| एकूण | =२० |
| सांगतां येत नाही | = ३ |
| माहिती मिळाली नाही | = २३ |
| | ४६ |

## वासिष्ठ

ह्या गोत्राचीं आडनांवें टिळक-पंचांगांत ६१ दिलीं आहेत. त्यांत करंजे, काळे, कुटुंबे, कोन्हे, गांगल, गानू, तिरडे, श्रीखंडे, शारंगपाणी, शिवडे, हरबुडे, दोणेकर, धारू, पायेकर, भट, भवाने, भस्मे, मधुमते, राणे, वर्तक,

वेलवडकर व ओंकार ह्या २२ आडनांवांची माहिती आम्हांकडे आली नाही. बाकी आडनांवांचा आता आपण विचार करूं. गोगटे व गोकटे हीं दोन निराळीं नांवें नाहीत. पेठे, विंझे, कोपरकर, ओक, बापट, साठे, अभ्यंकर, सावरकर हे निखालस वाडेश्वरवाले आहेत. अभ्यंकरांत नगरकर, काशीकर, महाबळ ह्यांचा अंतर्भाव होतो. ओकांत ओंकार आले. दातारांचा कुलस्वामी वाडेश्वर ह्यात शंका नाहीं. कोळथऱ्याच्या व मुरूडच्या दातारांनी केशवराज—लक्ष्मीकेशव हे स्थानिक कुलस्वामी मानले आहेत हें खरें पण तें चुकीचें आहे. दुसऱ्या अनेक मुरूडकरांनी वाडेश्वर लिहून दिला आहे. लोक कुलस्वामी विसरतात. गांव साधारणपणें लक्ष्यांत असतो. त्या गांवास कोंकणांत जाऊन आलें म्हणजे तेथील प्रमुख देवता हीच आपली कुलस्वामी असली पाहिजे अशी आपली समजूत करून घेतात. लक्ष्मीकेशव मुरूडचा असून केशवराज आसूदचा आहे. कोळथरच्या पुष्कळ लोकांचा कुलस्वामी आसूदचा आहे.

गोगट्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर असें आम्ही ठरवतों. १२ गोगट्यांपैकी ३ वाडेश्वर, ४ वेळणेश्वर, १ माहेश्वरी, २ कान्होकृष्ण, १ रामेश्वर व १ माहीत नाही ह्याप्रमाणे कुलस्वामींची स्थिति आहे. ह्यांत कान्होकृष्ण हा गोगट्यांचा मूळ पुरुष. ह्याला प्रथम नैवेद्यांत स्थान मिळून नंतर तो कुलस्वामी बनला. म्हणजे कान्होकृष्णवाले 'माहीत नाही' ह्या सदरांत पडले. ह्यांतच माहेश्वरीवाल्यांचा समावेश केला पाहिजे. रामेश्वर हा स्थानिक देव आहे. एक मावळंगकर रामेश्वर सांगतो, दुसरा कान्होकृष्ण सांगतो तर तिसरा मावळंगें मूळगांव सांगणारा वाडेश्वर सांगतो. गोगटे हे मूळ पावसचे असावे. कारण पावसचे देव मावळंगकरांच्या नैवेद्यांत आढळतात. गांवखडीचा इसम माहेश्वरी सांगतो तर दुसरा गांवखडीचाच वाडेश्वर सांगत आहे. तीच गोष्ट वेळणेश्वर-

वाल्यांची. तीन वेळणेश्वरवाले वेळणेश्वरकुलस्वामीव्यतिरिक्त कांही एक सांगत नाहीत. त्यांना कोंकणांतलें गांव किंवा नैवेद्य ह्यांचें स्मरण नाही. आता चौथे वेळणेश्वर सांगणारे पालगडचे गृहस्थ आपला मूळ गांव मावळंगें सांगतात.

ह्या वेळणेश्वरवाल्या पालगडकरांच्या नैवेद्यांत कान्होकृष्ण आहे. ह्यावरून पावसचें व हें कुटुंब एक आहे हें निर्विवाद. आणि पावसचे गोगटे वाडेश्वर सांगतात ह्या कारणास्तव गोगट्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असला पाहिजे असें आम्हीं वर म्हटलें आहे.

घारपुरे म्हणजे बापट ह्यांचाहि कुलस्वामी वाडेश्वर. कोतवड्यास गेल्यावर ह्यांना हें नांव मिळालें. एकाच घाऱ्यांनी आपलें कुलदैवत अंबा-भवानी म्हणून कळविलें. ह्यांना आपला कुलस्वामी माहीत नाही हें स्पष्ट दिसतें. परंतु बापट हेच पुढे घारे झाल्यामुळे बापटांचा कुलस्वामी तोच ह्यांचा म्हणावयास हरकत नाही.

दाते हे सर्व कनकेश्वर सांगतात. अलीबागेजवळील हा कनकेश्वर अशी सर्व दात्यांची समजूत आहे. परंतु आम्हांला वाटतें कुणकेश्वर हा दात्यांचा कुलस्वामी असावा. कासारवेलीचे श्री. हरि विष्णु दात्ये ह्यांच्या नैवेद्यांत कुणकेश्वर देव आहे. तो येण्याचें कारण नाही. ह्यावरून पूर्वी कुणकेश्वर कुलस्वामी असावा ह्या अनुमानास बळकटी येते. कुणकेश्वर देवगड तालुक्यांत असून कासारवेली रत्नागिरी तालुक्यांत आहे. कांही केलें तरी वाडेश्वराशीं दात्यांचा संबंध जुळविण्यास कांही आधार मिळत नाही.

नातू-दिवेकर हे अभ्यंकरांचे भेद आहेत. ह्यांपैकी एकाहि आडनांवाचें कुटुंब गुहागरास सध्या नाही. हीं तीनहि आडनांवें गुहागरच्या दक्षिणेस आढळतात. अभ्यंकर, नातू हे मालवण, वेंगुर्लें, गोवें ह्या दिशेने गेले. दिवेकर हे रत्नागिरी तालुक्यांतच ठरले असावे. गुहागरला असतांना

ह्यांना आडनांव नव्हतें कीं काय ? अभ्यंकर सर्व वाडेश्वरवाले आहेत हें पूर्वी सांगितलें आहे. तेव्हा ह्यांचे भेद नातू व दिवेकर हेहि वाडेश्वरवाले असावयास पाहिजेत. परंतु ह्यांचा वाडेश्वर अज्ञानांधकारांत मध्येच चमकतो. एका दिवेकरांची कुलस्वामिनी वाडेश्वरी आहे. ही अर्थात् चूक असून वाडेश्वर कुलस्वामी असें समजावयास हरकत नाही. बाकीच्यांनी आपला कुलस्वामी घालविला आहे. एका नातूच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. हे सालवणचे नातू व वाऋूळचे नातू एक असावेत. कारण त्यांच्या नैवेद्यांत साम्य आहे. ह्या कारणांवरून दिवेकर व नातू ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आम्ही ठरवितों. कालेकर हा आणखी एक अभ्यंकरांचा भेद आहे. दोन कालेकर वाडें-पडेलचे. वाड्याचा स्थानिक देव विमलेश्वर हा एकाने आपला कुलस्वामी केला. परंतु दुसऱ्याने जुना वाडेश्वर कायम ठेवला आहे. मात्र वाडेश्वराचें वाडेश्वरींत त्याने रूपान्तर केलें आहे. नातू-अभ्यंकरांप्रमाणे हेंहि घराणें आपणांस गुहागरच्या दक्षिणेस आढळतें. कालेकरांचा कुलस्वामी वाडेश्वर.

चार बोडसांपैकी तीन वाडें-पडेलचे आहेत. शंकरेश्वर हा विमलेश्वराप्रमाणे वाडेंपडेलचा देव असल्याकारणाने तो दोघांनी कुलस्वामी बनविला; परंतु वाडयाहून पालगडला गेलेल्या एका बोडसाने आपला मूळचा वाडेश्वर जतन करून ठेवला. द. कानव्यांतील बोडसांचा कुलस्वामी वेळणेश्वर आहे. हा वाडेश्वरच्या जवळ आहे. एकंदरींत बोडसांचा कुलस्वामी वाडेश्वर मानणें अनुचित होणार नाही.

भाभे नांदिवडयाचे. गुहागरला हें कुटुंब नाही. तेव्हा भाभे गुहागरच्या दक्षिणेस गेले असें दिसतें. ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर पूर्वीच ठरविला आहे. आमच्या माहितीप्रमाणे भातखंडे, वैद्य, पोंक्षे, वाटवे, कोकणे हे सर्व दांडेकर होत. गोत्रमालिकाकारांचें मात्र हें म्हणणें नाही. दांडेकर मूळचे

दांडे आडोमचे असले तरी हर्णै, मुरूड, कोळथरें, आंजर्ले ह्या गांवींच दांडे-करांचीं कुटुंबें आढळतात. कदाचित् इकडे आल्यावर त्यांस दांडेकर म्हणूं लागले असावे. ह्या सर्वांचा कुलस्वामी केशवराज. हा आसूदचा असणें स्वाभाविक आहे. म्हणजे हे मूळचा कुलस्वामी विसरले ह्यांत शंका नाही. कोकणेहि आंजर्ल्यांचे. हे रामेश्वर सांगतात. भातखंडे वेळणेश्वरचे म्हणून त्यांचा कुलस्वामी वेळणेश्वर झाला. पोंक्ष्यांपैकीं एकजण वाडेश्वर सांगतो. पोंक्षे आडनांव जुनें आहे. गुहागरला ह्यांपैकीं कोणाची वस्ती दिसत नाही. वैद्य-दांडेकरहि आंजर्ल्यांचे. एकंदरींत ह्या कुटुंबाची वस्ती उत्तरेकडे झाली.

पर्वते हे मूळचे दांडेकर म्हणतात. ह्यांचा कुलस्वामी हरिहरेश्वर आहे. हे आंजर्ल्यांचे असल्यामुळे हरिहरेश्वर हा त्यांच्या कुलस्वामींत आला.

इतकें असूनहि ह्या दांडेकरांना आपण मूळचे गुहागरचे ही स्मृति आहे. गोव्याकडील दोन दांडेकरांनी आपला मूळगांव गुहागर असल्याचें लिहून दिलें आहे. ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर नाही हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. कोकण्यांचा रामेश्वर कुलस्वामी आहे. हा रामेश्वर गुहागरासहि आहे. दांडेकर, पोंक्षे, भातखंडे, कोकणे, पर्वते, वैद्य हें मूळ एक कुटुंब होय. दोन दांडेकर मूळगांव गुहागर सांगतात. एक पोंक्षे वाडेश्वर कुल-स्वामी मानतात. कोकण्यांचा रामेश्वर गुहागरास आहे. ह्या पुराव्यावरून हें कुटुंब मूळ गुहागरचें असें समजण्यास हरकत नाही.

गोव्याच्या बाजूला जें दांडेकरकुटुंब गेलें त्यांतून वाटवे उत्पन्न झाले. अशा एका वाटव्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. वाटवे उत्तरेस नाहीत.

साठे व साठ्ये किंवा साठय्ये हे एकच. साठे घराण्याचा इतिहास लिहिणाऱ्या गृहस्थांनी ह्या दोन्ही आडनांवांच्या कुटुंबांची माहिती दिली आहे. गोंधळेकर ह्यांचें उपनांव साठ्ये होतें ह्यांत शंका नाही. साठ्यांचा कुलस्वामी वाडेश्वर

ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हा साठ्ये अगर साठय्ये व गोंधळेकर ह्यांचाहि तोच कुलस्वामी असला पाहिजे. आमच्याकडील माहितीप्रमाणे काळभैरव हा कुलस्वामी बऱ्याच साठय्यांचा आहे. गोंधळेकरांचा सुद्धा तोच आहे. साठे व साठय्ये दोनहि एक समजण्यास काय आधार आहे समजत नाही. एका गोत्रावांचून दोघांत कांही साम्य दिसत नाही. साठे हिरण्यकेशी तर साठ्ये व गोंधळेकर आश्वलायन. साठ्ये व गोंधळेकर ह्यांचा मूळगांव सडे-पिरंदवणें आणि साठे मालगुंड, कासारवेली, पावस ह्या गांवचे. तथापि पिरंदवणें वाडी टोळवाड येथे साठ्यांचीं घरें आहेत. ३५० वर्षांची ही वस्ती आहे असें एक पिरंदवण्याचे साठे लिहितात व दुसऱ्या साठ्यांच्या म्हणण्याप्रमाणे साठे हे पिरंदवण्याचे धर्माधिकारी आहेत. ह्यावरून साठे व साठ्ये एकच असें म्हणतां येईल. हें अनुमान बरोबर असेल तर एकाच कुटुंबांत दोन वेद शिरले आहेत ह्या गोष्टीकडे लक्ष वेधणें जरूर आहे.

ह्यावरून साठे, साठ्ये व गोंधळेकर हे मूळ गुहागरचे असें म्हणतां येतें.

मोडक ओकांतून निघाल्या कारणाने त्यांचा कुलस्वामी कोळेश्वर पाठीमागचा आहे हें उघड आहे. पंचनदीस आल्यावर त्यांना मोडक नांव प्राप्त झालें असावें. एका पंचनदीकर मोडकांच्या नैवेद्यांत व्याघ्रांबरी देवी आहे व मूळ गांव गुहागर असेंच त्यांनी लिहून दिलें आहे.

मोडकांचें अपत्य विनोद. तेव्हा ह्या तिघांचें उगमस्थान एकच मानणें भाग आहे.

आगरकर सर्व कोळथऱ्याचे असें असून त्यांचा कुलस्वामी कोळेश्वर नाही. त्यांच्या नैवेद्यांत ग्रामदेवता म्हणून कोळेश्वराला स्थान आहे इतकेंच. त्यांचा कुळस्वामी केशवराज आहे. हा आसूदचा देव. आगरकर ह्यांचें पूर्वीचें नांव दातार. आघारी गांवाची खोती मिळाल्यामुळे आघारकर आगरकर बनले. गुहागरच्या दक्षिणेस हें कुटुंब मिळणार नाही. दातार

घराणें पूर्वी गुहागरला होतें. दातारांची वस्ती मुरूड, कोळथरें ह्या गांवीं विशेष. त्यामुळे मुरूडचा लक्ष्मीकेशव कित्येक मुरूडकर दातारांचा कुलस्वामी झाला. त्याचप्रमाणे कोळथरकर दातारांचा कुलस्वामी आगरकरांचा केशवराज आहे. पण हे अपवाद सोडले तर दातारांचा कुलस्वामी निःसंशय वाडेश्वर होय. दातारांचे आगरकर झाल्यामुळे आगरकरांचाहि तोच कुलस्वामी समजला पाहिजे.

बागुलांचा कुलस्वामी वाडेश्वर मागे ठरविला आहे. बागूल हे मुरूडचे. गुहागरला हें नांव आढळत नाही. गुहागरच्या दक्षिणेस ह्यांची वस्ती नाही.

पुरेशी माहिती न मिळाल्यामुळे ज्यांचा कुलस्वामी ठरवितां येत नाही असे गोवंडे, गोडसे हे होत.

ह्या सर्व विवेचनाचें सार येणेंप्रमाणेः—

वाडेश्वर कुलस्वामी असणारे अथवा गुहागर मूळ गांव सांगणारे १ अभ्यंकर, २ आगरकर, ३ ओक, ४ ओंकार, ५ कापरेकर, ६ कालेंकर, ७ काशीकर, ८ गोगटे, ९ गोंधळेकर, १० घारपुरे, ११ घारे, १२ दांडेकर, १३ दातार, १४ दिवेकर, १५ नगरकर, १६ नातू, १७ पर्वते, १८ पोंक्षे, १९ बागूल, २० बापट, २१ भातखंडे, २२ भाभे, २३ महाबळ, २४ मोडक, २५ विंझे, २६ वैद्य, २७ साठे, २८ साठये, २९ सावरकर.

## कौशिक

ह्या गोत्रांत ४२ आडनांवें आहेत. त्यांतलीं अग्निहोत्री, आचार्य, खुळे, तिरूके, पेठकर, गोरे, जोशी, जोगदंड, फणसूकर, फफे, बोरकर, भागवत, भासे, लेलगे, लोणकर, वर्तक, वेलणकर, शारंगपाणी, शिवडे, शेवडे, शौचे, सटकर, सासते, स्वयंपाकी, हुंबे इतकीं आडनांवें प्रायः लुप्त झाल्यामुळे आम्हांस मिळालीं नाहीत. सासते ह्याच्या ठिकाणीं रास्ते आडनांव

पाहिजे, असें वाटतें.

बाकीच्यांत आपटे, गद्रे, गोडबोले ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे ह्यांत शंका नाही. कौशिक गोत्रात विशेष भरणा आपटे, कोल्हटकर, खरे, गद्रे, कानिटकर, आगाशे, गोडबोले, देवधर ह्यांचा आहे.

आगाशे हे रत्नागिरी व कोळंब्याचे राहणारे. कोळंबें हा गांव रत्नागिरी-जवळ दक्षिणेस आहे. रत्नागिरी व कोळंबे ह्यांच्यामध्ये बाग आगाशे नांवाचा गांव आहे. रत्नागिरीचे दोन आगाशे वाडेश्वर सांगतात. तेव्हा तिसरा तृणबिंदुकेश्वर सांगतो तो आपणांस सोडून दिला पाहिजे. कोळंब्याची त्रिमुखी दुसऱ्या आगाशांनी घेतली ह्यांत आश्चर्य नाही. मिरजेच्या आगाशांनी तर त्रिमुखीला नैवेद्यांत ढकलून गणपति कुलस्वामी-च्या ठिकाणीं आणला. तेव्हा आगाशे वाडेश्वरवाले असें म्हणण्यास विरोधी प्रमाण नाही.

फाटक आगाशांतून निघाले ही गोष्ट सर्वमान्य आहे. अर्थात् त्यांचा कुलस्वामी हाताला लागण्यासारखा नसला तरी तो मुळचा वाडेश्वर असला पाहिजे असें मानणें अवश्य आहे. शिवाय फाटकांत वाडेश्वराचा मागमूस नाही असें नाही. रत्नागिरी खेडें (रत्नागिरीला पूर्वी खेडें म्हणत) मूळ गांव सांगणारा फाटक वाडेश्वर कुलस्वामी सांगत आहे; आणि नाचणें मूळ गांव सांगणाऱ्या काशीविश्वेश्वर कुलस्वामीवाल्यांच्या नैवेद्यांत वाडेश्वर आहे. एकं-दरींत आगाशे-फाटक कुटुंब गुहागरच्या दक्षिणेकडे आढळतें. आगाशां-तून फाटक फुटले ते आणखी खाली वेंगुर्ल्याकडे गेले. हीं दोन्ही आड-नांवें गुहागर गांवांत नाहीत. ह्यावरून बाहेर पडल्यावर तीं संपादन केलेलीं दिसतात. खुळे, वर्तक हे फाटकांप्रमाणे आगाशांचे भेद आहेत. आगाशांना ह्या नांव पडल्याचें गोत्रमालिकेवरून दिसतें.

छेडे (कौशिकगोत्री) ह्यांचेंहि पूर्वीचें नांव आगाशे असें ते म्हणतात.

त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे.

कानिटकरांचें आडनांव प्रथम सटकर होतें असें म्हणतात. परंतु सांप्रत कानिटकरघराणें गुहागरास आहे. पांच कानिटकरांपैकी २ वाडेश्वर, २ रवळनाथ व १ गणपति असे कुलस्वामी सांगतात. रवळनाथ हा चित्पावनांचा कुलस्वामी नसणार त्याप्रमाणे गणपतीहि नाही. म्हणून कानिटकरांचा कुलस्वामी वाडेश्वरच मानणें भाग आहे. बसणीच्या पलीकडे कानिटकर कोंकणांत सरकले असें दिसत नाही. बसणीस रवळनाथाचें देऊळ आहे म्हणतात तें खरें असल्यास बसणीच्या कानिटकरांनी वाडेश्वर सोडून रवळनाथाचा स्वीकार करणें स्वाभाविक आहे.

कोल्हटकर ह्यांचा कुलस्वामी कोळथऱ्याचा कोळेश्वर. हे मूळचे कोळथरचे. तेथून नेवऱ्याला गेले. नेवऱ्याला गेले तेव्हा त्यांचें नांव बाम होतें. कोळथऱ्यास बामांचीं घराणीं पुष्कळ होतीं. नेवऱ्यास गेल्यावर वाडेश्वर सुटून कोळथऱ्याचा कोळेश्वर स्थिर झाला. तेव्हा बामांचा कुलस्वामी तपासला पाहिजे. बाम आडनांवाचें कुटुंब गुहागरला आढळत नाही. कोळथरची वस्ती बामांची असल्यामुळे चार बामांपैकी एका बामांचा कुलस्वामी कोळेश्वर आहे तें योग्यच आहे. एकाची जोगेश्वरी आहे. ती सोडून दिली पाहिजे. ह्या गृहस्थाला कुलस्वामी माहीत नाही. तिसऱ्याचा हरिहरेश्वर कुलस्वामी कसा झाला ह्याविषयी तर्क करणें अशक्य आहे. परंतु एका बामांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. हा मनुष्य मूळचा कोळथऱ्याचा आहे. असें असून त्याचा कुलस्वामी वाडेश्वर आहे ही फार महत्त्वाची बाब आहे. ह्यावरून बामांचा कुलस्वामी वाडेश्वर आम्ही निश्चित करतों. कोल्हटकरांनी बामांना बहुतेक खाऊन टाकलें आहे. त्यामुळे बामांचीं कुटुंबें फार नाहीत. बाम व कोल्हटकर हे कोळथरें, आंजर्लें, केळशी व नेवरें ह्या ठिकाणींच आढळतात. इतरत्र ह्यांचा विस्तार

फारसा दिसत नाही. कांही वाम वर्तक आडनांव सांगतात.

वामांचा कुलस्वामी वाडेश्वर ठरल्यानंतर कोल्हटकरांचाहि तोच कुलस्वामी ठरविणें प्राप्त आहे.

सर्व खरे मूळचे राहणारे गुहागरचे. तसेंच त्यांची शाखा हिरण्यकेशी आहे. परंतु नाशीकचे श्री. विष्णु धोंडो खरे ह्यांनी आपली शाखा शाकल म्हणून लिहून दिली आहे. ही चूक आहे की काय समजत नाही. बाकी श्री. दिनकर नारायण खरे ह्यांनी "माझे पणजोबा ऋक्शाखा व हिरण्यकेशी शाखा ह्यांचें अध्ययन केलेले होते" असें लिहून दिलें आहे. तेव्हा ह्या घराण्यांत दोनहि शाखा चालत असाव्या असें दिसतें. खरे गुहागरचे; त्यामुळे सर्व खऱ्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असला पाहिजे हें अनुमान होणें स्वाभाविक आहे. परंतु वस्तुस्थिति अशी आहे की, एकदोन अपवाद सोडले तर बहुतेक खऱ्यांचा कुलस्वामी गणपति आहे. गुहागरच्या एका खरे गृहस्थांनी खरेकुलवृत्तान्त लिहिला आहे. हा हस्तलेख आम्हांस वाचावयास मिळाला. त्यांतहि खऱ्यांचा कुलस्वामी गणपति असल्याचें स्पष्ट लिहिलें आहे. ह्यावरून खरे बाहेरून म्हणजे द्राविड प्रांतांतून दुर्गादेवीच्या दुष्काळांत इकडे आले ह्या दंतकथेस दुजोरा मिळतो. गणपति दैवत आर्यलोकांचें नसून द्राविडांचें आहे. खरे द्राविड असतील असें मानण्यास त्यांच्या शाखेचेंहि प्रमाण पुढे करतां येईल. ह्यांचें मूळचें आपस्तंब सूत्र असल्यास चित्पावनांत आपस्तंब सूत्राचें नांव शिरण्यास खरे कारणीभूत झाले कीं काय हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. तथापि हेंहि विसरतां कामा नये की, आजमितीस आपस्तंब म्हटल्या जाणाऱ्या कोणत्याहि चित्पावनाचें धर्मकृत्य आपस्तंबसूत्राप्रमाणे होत नाही. बोधायनसूत्र ज्यांच्यांत घेतात असे चित्पावन मात्र कांही आहेत.

दुसरा प्रश्न असा की, हे द्राविड चित्पावनांत कसे सामील झाले?

चित्पावन ही जात त्या वेळीं बनली नव्हती काय ? कऱ्हाडे चित्पावनांत समाविष्ट कां झाले नाहीत ? चित्पावन जात बनल्यानंतर कऱ्हाडे कोंकणांत आले असें म्हणावयाचें कीं काय ? दुर्गा देवीच्या दुष्काळांत हे द्राविड ब्राह्मण गुहागरच्या किनाऱ्याला लागले असें दंतकथा म्हणते. परंतु हा दुष्काळ अलीकडचा म्हणजे १४ व्या शतकांतला. त्याच्या पूर्वी स. ६५० मध्ये सर्व देशभर दुष्काळ पडला होता म्हणतात. परंतु हाहि काल अर्वाचीन असा वाटतो.

वाडें-पडेलच्या देवधरांखेरीज बाकीच्या सर्व देवधरांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनारायण, किंवा केशवराज आहे. वाडेंपडेलच्यांचा कुलस्वामी तेथील शंकरेश्वर आहे. विष्णुदैवतवाले सर्व चिपळूण व दापोली तालुक्यांतील आहेत. देवधर नांवाचा गांव नकाशांत चिपळूण तालुक्यांत दाखवलेला आहे. शंकरेश्वर मानणाऱ्यांच्या नैवेद्यांत लक्ष्मीकेशव आहे. एवंच देवधर हे विष्णूचे उपासक दिसतात. हीराभूषण दीक्षित (देवधर) म्हणतातः— पडेलचा शंकरेश्वर हें त्र्यंबकेश्वराप्रमाणे मोठें कडकडीत स्थान आहे. कुलस्वामी बदलण्याचें अशा प्रकारचा समज हें एक कारण असतें. देवधरांचा गुहागराशीं संबंध दाखवितां येत नाही. ढमढेरे ह्यांचें आडनांव देवधर.

पाळंदे सर्व आडिवऱ्याचे. परांजप्यांपासून पाळंदे निघाले असें म्हणतात. परंतु परांजपे आश्वलायनी असून पाळंदे हिरण्यकेशी आहेत. आडिवऱ्याची महाकाली, महालक्ष्मी पाळंदे आपली कुलस्वामिनी समजतात हें योग्यच आहे. आज आडिवऱ्यास पाळंद्यांचीं घरें नाहीत असें समजतें. परांजपे व पाळंदे एक असल्यास पाळंदे हिरण्यकेशी कां व केव्हा झाले हें समजण्यास साधन नाही. गुहागराशीं पाळंद्यांचा संबंध लावतां येण्यासारखा पुरावा नाही. परांजपे विष्णुवृद्धगोत्री व पाळंदे कौशिकगोत्री.

बर्वे ह्यांचा कुलस्वामी कोळेश्वर. बर्व्यांचें अगोदरचें आडनांव वाड. ह्यांचाहि कुलस्वामी कोळेश्वर. कोळेश्वर हा जरी बर्व्यांचा कुलस्वामी असला तरी कोल्हटकरांप्रमाणे कोळथऱ्याहून बर्वे नेवऱ्याला गेले. म्हणून बरेच बर्वे आपला मूळ गांव नेवरें सांगतात. आमच्याजवळील वहींत बापये, बर्वे व कोल्हटकर हे वाडांचे भेद सांगितले आहेत. बर्वे व कोल्हटकर ह्यांच्या-तील साम्य पाहतां वाडांतून बर्वे निघाले असण्याचा संभव अधिक दिसतो. वाड कमी झाले व बर्वे विस्तार पावले. बर्वे कुटुंब गुहागरला होतें म्हण-तात; सांप्रत नाही. बर्व्यांतून जोगदेव निर्माण झाले. तेव्हां वाड, बर्वे व जोगदेव ह्यांचा संबंध गुहागराशीं सध्या लागत नाही. बापये हें आडनांव वाडांतून निघालें म्हणतात. आमच्याकडे एकाच बापयांची माहिती आली आहे. तींत ते आपला कुलस्वामी हरेश्वर देतात. टिळक-पंचांगांत कौशिक गोत्री जोगदेव दिले नाहीत.

देवल सोमेश्वराजवळील वेंगुर्लें ह्या गांवचे. तेथून ते पेशवाईत कांही इनाम मिळाल्यामुळे आगरगुळ्यास आले. लक्ष्मीनारायण, जोगेश्वरी व सोमेश्वर असे तीन कुलस्वामी तिघांनी निरनिराळे सांगितले आहेत. आगरगुळ्याला लक्ष्मीनारायण आहे असें म्हणतात. तेव्हा तो कुलस्वामी होणें स्वाभाविक आहे. तसेंच वेंगुर्ल्यानजीक सोमेश्वर असल्याने एका कुटुंबाचा तो कुलस्वामी झाला. परंतु जोगेश्वरी सांगणाऱ्या आगरगुळ्याच्या देवलांच्या नैवेद्यांत वाडेश्वर एक आहे. हा वाडेश्वर कोठचा ? गुहागराशिवाय नेवऱ्याच्या मुरुगवाड्यांत लहानसा वाडेश्वर आहे. परंतु नागपूरचे श्री. गोविंद रामचंद्र देवल म्हणतात आमचा वाडेश्वर गावडेगुळें येथील आहे. आमच्या मतें हा वाडेश्वर गुहागरचा असावा. गुहागराहून बाहेर पडणाऱ्या कित्ये-कांनी वाडेश्वराचीं देवळें नेवऱ्यास व गावडेगुळ्यास बांधलीं असतील. गुळ्याचा गणपति पुढे पुळ्याला गेला अशी दंतकथा आहे. त्यामुळे

गुळ्याच्या देवलांत गणपतीस थोडेंसें महत्त्व आलें आहे. देवल आडनांवाचें कुटुंब गुहागरांत नाही. देवलांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर असें आम्हांस वाटतें.

तात्पर्य, ४२ पैकी २५ आडनांवें आम्हांस मिळालीं नाहीत. बाकीच्या १७ मध्ये आगाशे, आपटे, कानिटकर, कोल्हटकर, गद्रे, गोडबोले, फाटक, बाम व शेंडे ही कौशिकगोत्री मंडळी गुहागरची असें म्हणतां येईल. खरे, देवधर, देवल, ढमढेरे, पाळंदे, बर्वे, बापये, वाड ह्यांच्या संबंधानें ते गुहागरचे असें म्हणण्यास आमच्याजवळ पुरावा नाही.

## शांडिल्य

जोशी— ह्या गोत्राच्या जोशांपैकी एकंदर ४० जणांची माहिती मिळाली. त्यांच्या कुलस्वामींप्रमाणे त्यांची संख्या येणेंप्रमाणेः—

| लक्ष्मीकेशव | लक्ष्मीनृसिंह | वाडेश्वर | विश्वेश्वर | वेळणेश्वर |
|---|---|---|---|---|
| १४ | १३ | ४ | २ | २ |
| केशवराज | हरिहरेश्वर | काळभैरव | महालक्ष्मी | माहीत नाही |
| १ | १ | १ | १ | १ |

ह्यांपैकी कोणत्या गांवची कोणती स्थानिक देवता हें पुढें देतोंः—

| देवता | गांव | देवता | गांव |
|---|---|---|---|
| लक्ष्मीकेशव | कोळीसरें | लक्ष्मीनृसिंह | संगमेश्वर |
| वेळणेश्वर | वेळणेश्वर | वाडेश्वर | गुहागर |
| केशवराज | आसूद | विश्वेश्वर | पावस |

कालभैरव व महालक्ष्मी ह्यांचें निश्चित स्थान नाही. बहिरी=भैरव=काल-भैरव ह्या देवाचीं देवळें पुष्कळ ठिकाणीं आहेत. हरिहरेश्वरासंबंधानं अधिक विवरण इतरत्र केलें आहे. हा देव गोळपचा असावा असें आम्हांस

वाटतें. ह्यानंतर कोणत्या कुलस्वामीचे लोक मूळचे कोणत्या गांवचे राहणारे ह्याचा विचार करूं:—

| | |
|---|---|
| लक्ष्मीकेशव— वरवडें | केशवराज— कोळथरें |
| लक्ष्मीनृसिंह— संगमेश्वर | वेळणेश्वर— गुहागर |
| वाडेश्वर— वेळणेश्वर | विश्वेश्वर— पावस |

संगमेश्वरचे लोक वायंगणी, बसणी, गोळप, देवाचें गोठणें ह्या ठिकाणीं पसरले.

वरवडेकरांनी कोतवडें, दाभोळ वगैरे ठिकाणीं प्रयाण केलें. लक्ष्मीकेशववाले जोशी पंचनदी, टाळसूर, हर्णै, केळशी, गुहागर, आंजर्ले इ. ठिकाणीं आढळतात. म्हणजे संगमेश्वरचे लोक देवरूख तालुक्यांतून रत्नागिरी तालुक्यांत पूर्वेकडून पश्चिमेस आले व वरवड्याचे लोक रत्नागिरी तालुक्यांतून चिपळूण तालुका टाकून एकदम दापोली तालुक्यांत—दक्षिणेकडून उत्तरेकडे गेले.

वरवड्यास लक्ष्मीकेशवाचें देऊळ नाही. तें शेजारीं कोळिसऱ्यास आहे. परंतु संगमेश्वरला लक्ष्मीनृसिंहाचें स्थान आहे. अर्थात् हा स्थानिक देव झाला. ज्या गांवांत लोक राहतात त्या गांवचा प्रमुख देव त्या लोकांचा कुलस्वामी होणें स्वाभाविक आहे. तेव्हा प्रश्न असा उद्भवतो की, हे लक्ष्मीनृसिंहवाले जोशी मूळचे संगमेश्वरचे काय ! कां तेथें ते दुसरीकडून आले ! ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यास कांही आधार मिळतो कीं काय तें पाहिलें पाहिजे. देवाच्या गोठण्याच्या जोशांनी आपला कुलस्वामी वेळणेश्वर सांगितला आहे. ह्यांचें मूळ ठिकाण संगमेश्वर. ह्यावरून असा तर्क करतां येतो की, संगमेश्वरास जोशीकुटुंब वेळणेश्वराहून आलें असावें. आणि दुसरें, ह्या जोशांचा मूळ कुलस्वामी लक्ष्मीनृसिंह नसून वेळणेश्वर होता.

कांही पावसकर जोशी आपला कुलस्वामी वेळणेश्वर सांगतात.[१] वस्तुतः पावसचा देव विश्वेश्वर; आणि तोच कुलस्वामी मानणारे पावसकर जोशी आहेतहि. तेव्हा दोन अनुमानें संभवतात. वेळणेश्वर सांगणारे जोशी तेवढेच वेळणेश्वराहून पावसला येऊन स्थायिक झाले; किंवा सर्व पावसकर जोशी मूळचे वेळणेश्वरचे. ते पावसला आल्यावर कित्येकांनी आपला मूळचा कुलस्वामी कायम राखला; कित्येकांच्यावर स्थानदेवतेचा प्रभाव होऊन त्यांनी नवीन कुलस्वामी स्वीकारला. आपण घराण्याचा अथवा गोत्राचा कुलस्वामी एकच असावा असें गृहीत धरून चाललों आहों. चित्पावनांचीं १४ ते ६० कुटुंबें कोंकणांत बाहेरून आलीं. कोंकणांत त्या वेळेला वस्ती नव्हती. एकेक कुटुंब निरनिराळया वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं येऊन राहिलें ही संभवनीय गोष्ट नाही वगैरे ऊहापोह अन्यत्र केला आहेच. ह्याला अनुसरून शांडिल्यगोत्री जोशी हे मूळचे वेळणेश्वरचे असावे हें म्हणणें अधिक सयुक्तिक होईल. सोमेश्वरचे जोशीहि मूळचे वेळणेश्वरचे म्हणतात.[१] परंतु प्रत्यक्ष वेळणेश्वरला राहणारे जोशी आपला कुलस्वामी वाडेश्वर सांगतात.

ह्यावरून आम्हांस असें वाटतें की, जोशी हे प्रथमचे गुहागरचेच असावे आणि त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर हाच होय. चित्पावन शैव आहेत ह्या मताला वरील अनुमान जुळणारेंच आहे. आता ह्याच्यावर असा आक्षेप घेतां येईल की, गुहागरचें एक जोशीकुटुंब वेळणेश्वरला जाऊन राहिलें असेल व म्हणून त्या कुटुंबाचा कुलस्वामी वाडेश्वर असेल. ह्या आक्षेपाचें निरसन असें की, गुहागरला जोशी मूळचे होते हें तरी ह्यावरून मान्य करणें भाग पडतें, मग सर्व जोशी गुहागरचे कां मानू नये ! वाडेश्वर हा कुलस्वामी बहुतेक सर्व गोत्रांत व आडनांवांत आहे. त्यावरून गुहागर हें

१ श्री. ना. ग. जोशी ह्यांनी जमविलेली माहिती.

चित्पावनांचें मूळ ठिकाण असें आम्हीं सिद्ध केलें आहे असें म्हणत नाही, पण—दाखविलें आहे.

**बेहरे**— बेहरे ह्यांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव आहे. मूळ गांव नेवरें. ह्यावरून वरवडेकर जोशांपैकीच बेहरे असावे असें वाटतें.

**गानू**— एकाच गानूंची माहिती आली. ह्यांचा कुलस्वामी हरिहरेश्वर आहे.

**पाटणकर**— कुवेशी, वेळास, रहाटागर, अरवली इत्यादि रत्नागिरी जिल्ह्यांतीलच परंतु दूरदूरच्या गांवीं राहणाऱ्या लोकांच्या कुलस्वामीवरून पाटणकर ह्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वरच असें आम्ही ठरवितों. एकंदर आठांपैकी चारांनी वाडेश्वर कुलस्वामी लिहून दिला आहे. एकाला आपला कुलस्वामी माहीतच नाही. दोघांनी जोगेश्वरी सांगितली. ह्यांचा समावेश वाडेश्वर वाल्यांत करावयास हरकत नाही. देवगड तालुक्यांतील बाभोळयाला जाऊन राहणारे पाटणकर तेथील विमलेश्वर कुलस्वामी म्हणून सांगूं लागले. वाडें, कुणकेश्वर, इळयें इत्यादि ठिकाणीं भ्रमण झाल्यामुळें ह्या कुटुंबाचा वाडेश्वर सुटला असावा.

वाडेश्वर कुलस्वामी ठरला की गुहागर मूलभूमि ठरलीच. पाटणकर उत्तरेकडे न जातां दक्षिणेकडे वळले असें दिसतें.

**काणे**— ह्यांचें वैशिष्ट्य हें की, त्यांच्या गांवासंबंधाने एकवाक्यता आहे. सर्व काणे मूळचे केसपुरी येथील. केसपुरी वरवड्याजवळ आहे. दुसरें वैशिष्ट्य म्हणजे सर्वांची कुलस्वामिनी माटलादेवी आहे. ह्या बाबतींत काण्यांचें साम्य बंदीमातावाल्या केळकरांशीं आहे. माटलादेवी बंदीमातेप्रमाणे कोठे आहे तें कोणासच ठाऊक नाही. लक्ष वेधण्यासारखी तिसरी गोष्ट म्हणजे मंगलकार्यांत काण्यांकडे कुणबीण सवाशीण सांगावी लागते. ह्यावरून काण्यांचें घराणें अद्यापि सुबद्ध असल्याचें दिसतें. आठांपैकी जवळ

जवळ अध्यांनी लक्ष्मीकेशव कुलस्वामी सांगितला आहे. दोन इसम हरि-हरेश्वर सांगतात. भगवती सांगणारे व माहीत नसणारे वगळले तर लक्ष्मी-केशववाले बहुसंख्य आहेत असें म्हटलें पाहिजे. काण्यांत हरेश्वर कसा घुसला सांगतां येत नाही. परंतु वरवड्याच्या सांनिध्यामुळे लक्ष्मीकेशवच काण्यांचा कुलस्वामी असावा असें वाटतें. ह्यावरून वरवडेकर जोश्यांतून काणे फुटून निघाले असें म्हणण्याकडे मन कलतें.

दामले— एकंदर चौदा दामल्यांचीं माहितिपत्रकें आमच्याकडे आलीं. त्यांत सात जणांनी आपला कुलस्वामी वाडेश्वर लिहून दिला आहे. दोघांना कुलस्वामी माहीतच नाही. आजगांवचे दामले ह्यांनी तिकडील वेताळ हा कुलस्वामी उचलला. त्यांच्याचप्रमाणे सोमेश्वर गांव सांगणाऱ्यांनी सोमे-श्वराला कुलस्वामी केलें. दुसरा एकजण सिद्धिविनायक सांगतो. ह्या गृह-स्थांनी आपल्या मूळच्या कुलस्वामीला सोडचिठ्ठी दिली असल्याचें उघड दिसतें. एकाने जोगेश्वरीच कुलस्वामिनी म्हणून समजूत करून घेतली आहे. वाडेश्वर सांगणारे जोगेश्वरी सांगतातच. ह्यावरून वाडेश्वर जोगे-श्वरी ह्या दुकलींतील वाडेश्वर निसटून जोगेश्वरीच ह्या घराण्यांत कायम राहिली असें दिसतें. सारांश, दामल्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वरच असला पाहिजे ह्याविषयी शंका बाळगण्याचें कारण नाही.

आता दामल्यांचा मूळ गांव कोणता तें पाहूं. वाडेश्वर कुलस्वामी असल्यामुळे गुहागर हेंच त्यांचें मूळ ठिकाण असें मानणें भाग आहे. शिरगांवचे दामले तर आपण गुहागरचे असल्याचें सांगतातच.

गुहागराहून रत्नागिरीकडे दामल्यांचीं बरींच कुटुंबें गेलीं असावीं. कासारवेल, कोळंबें, नांदिवडें, शिरगांव, सोमेश्वर हीं निरनिराळ्या दाम-ल्यांचीं मूळ गांवें रत्नागिरी तालुक्यांत आहेत. आजगांवास गेलेल्या दाम-ल्यांनी आपला पूर्वसंबंध पूर्णपणें तोडलेला दिसतो. वेताळ, रवळनाथ,

आदित्यनाथ, भुवनेश्वरी, सोमेश्वर ह्या आजगांवच्या देवांव्यतिरिक्त ते कोणास ओळखीत नाहीत. कांही दामले पडेल व गोठणें येथे गेले. म्हणजे दक्षिणेकडे दामले मंडळी अधिक गेली. उत्तरेकडे मुरडास एक दामल्यांचें कुटुंब आहे. परंतु तेथे तें कोठून आलें समजत नाही. मेट्याचे दामले पूर्वीचे कोळंब्याचे.

तात्पर्य, दामल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असून गुहागर हेंच त्यांचें मूलवसतिस्थान असलें पाहिजे. एरव्ही वेगवेगळ्या ठिकाणच्या दामल्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असण्याचें कारण नाही.

नित्सुरे— नित्सुरे हे पूर्वीचे केळकर असें सांगतात. परंतु ह्या त्यांच्या म्हणण्याव्यतिरिक्त त्यास दुसरा कांही आधार दिसत नाही. नित्सुऱ्यांचीं कुटुंबें पुष्कळ नाहीत. आमच्याकडेहि चौघांनीच माहिती पाठविली आहे. परंतु त्यावरून असें दिसतें कीं, आंजर्लें, वेळास ह्या बाजूलाच त्यांची वस्ती आहे. हर्णैच्या दक्षिणेस त्यांची वस्ती नसावी. आंजर्ल्यास वास्तव्य झाल्यामुळे आंजर्ल्याशेजारील केशवराज हा नित्सुऱ्यांचा कुलस्वामी बनला. ह्या केशवराजालाच कोणी लक्ष्मीकेशव समजतात कीं काय अशी शंका येते. कारण आंजर्ल्याच्याच एका नित्सुऱ्यांनी आपला कुलस्वामी लक्ष्मीकेशव सांगितला आहे. केळकरांचा कुलस्वामी सोमेश्वर तर नित्सुऱ्यांचा लक्ष्मीकेशव अथवा केशवराज. आंजर्ल्याचे नित्सुरे कोतवड्याहून आले असें एकाने सांगितलें आहे. हें खरें असल्यास नित्सुऱ्यांचा केळकरांपेक्षां वरवड्याच्या जोशांशींच अधिक संबंध जडेल. कारण कोतवडेकर जोशी हे मूळचे वरवड्याचे व त्यांचा कुलस्वामीहि लक्ष्मीकेशव आहे. आंजर्ल्याजवळील तिरवड्याचा केशवराज किंवा लक्ष्मीकेशव हा जवळ अथवा खोत ह्यांचा देव असावा. कारण त्याचा पुजारी एक खोत जातीचा ब्राह्मण आहे.[1]

१ असूदच्या केशवराजाचाहि पुजारी खोत आहे. कोळथरें येथील लक्ष्मीकेशवाचा पुजारी दवरुखा ब्राह्मण आहे.

असें असून नित्सुऱ्यांनी त्यालाच आपला कुलस्वामी मानला ह्यावरून आपल्या मूळच्या कुलस्वामीला ते विसरले नाहीत हें स्पष्ट दिसतें. नित्सुरे नांव किती जुनें आहे तें समजत नाही. परंतु असा तर्क वाहतो की, आंजर्ल्यांस आल्यानंतरच त्यांनी हें नांव संपादन केलें असावें. लक्ष्मीकेशव कुलस्वामी असलेले जोशी आंजर्ल्यास आहेतच. त्यांच्याशीं आपलें कांही नातें जडतें कीं काय ह्याचा विचार नित्सुऱ्यांनी करणें इष्ट होईल.

उपाध्ये हे नित्सुऱ्यांपैकीच असल्याने त्यांचा निराळा विचार करण्याचें कारण नाही.

**केळकर**— सर्व केळकर शांडिल्यगोत्री. ह्यांच्या कुलदेवतासंबंधाने विशेष घरसोड झालेली दिसत नाही. कुलस्वामी सोमेश्वर व कुलस्वामिनी बंदीजाई. तसेंच बहुतेक केळकर ढोकंबळें येथील मूळचे असें सांगतात. ढोकंबळें हा नेवरें गांवचा एक वाडा आहे. तेथून मालगुंड, गणपतिपुळें, गांवडें-आंबेरें, निवेंडी, अडूर वगैरे ठिकाणीं अनेक घराणीं गेलीं. हीं सर्व गांवें समुद्रकिनाऱ्यावर आहेत. सोमेश्वरचें देऊळ मालगुंड येथे आहे. मालगुंडचे श्री. गोविंद विनायक केळकर हे आपला कुलस्वामी मालगुंडचा सोमेश्वरच समजतात. कित्येक लोक सोमेश्वर गांवचा सोमेश्वर कुलस्वामी मानून मूळचे केळकर सोमेश्वरचे असेंहि म्हणतात. आम्हांला श्री. गोविंदराव केळकर ह्यांचें म्हणणें बरोबर वाटतें. एकंदर २३ इसमांनी माहिती पाठविली त्यांपैकी एकाचाहि कुलस्वामी वाडेश्वर नाही किंवा कोणाच्या नेवेद्यांतहि नाही.

**कोझरेकर**— ह्या आडनांवाचे तीनच तक्ते भरून आमच्याकडे आले. ह्यांचें पूर्वीचें आडनांव केळकर सांगतात. नाशीकत्र्यंबकेश्वरच्या वह्यांत ह्या प्रवादाचा प्रतिध्वनि उमटलेला आहे. परंतु आम्हांस हा प्रवाद खरा आहे असें म्हणण्यास कांही प्रमाण सापडत नाही. केळकर ढोकंबळ्याचे तर कोझरेकर

कुर्ध्याचे. केळकर शैव तर कोझरेकर विष्णुभक्त. कुर्ध्यास विष्णूचें देऊळ आहे; तोच आमचा कुलस्वामी असें ह्या कोझरेकरांचें म्हणणें आहे. ह्या विष्णूला लक्ष्मीनारायण, श्रीनारायण असेंहि म्हणतात. निष्कर्ष असा की, कोझरेकर हे कुर्धें गांवचे असून लक्ष्मीनारायण हा त्यांचा कुलस्वामी होय. अधिक पुराव्याच्या अभावीं हेंच अनुमान स्वीकारणें प्राप्त आहे.

**सहस्रबुद्धे**— शांडिल्यगोत्री सहस्रबुद्धे हे एकजात कोतवड्याचे. कोतवड्याचा मुख्य देव कुसुमेश्वर असल्यामुळे कित्येकांनी तोच आपला कुलस्वामी केल्यास आश्चर्य मानण्याचें कारण नाही. मिरज, खडगपूर येथील मंडळी आपल्या कुलस्वामीस विसरली हेंहि आश्चर्यावह नाही. परंतु कोतवड्याचे मुंबई येथे असणारे सहस्रबुद्धे वाडेश्वर कुलस्वामी सांगतात. त्याचप्रमाणे कोतवड्याहून चिपळूण, नागांव येथे जाऊन स्थायिक झालेल्या सहस्रबुद्ध्यांचा कुलस्वामी वाडेश्वर कायम राहिला आहे. सरंजामे नांव धारण करणाऱ्या बडोदें येथील सहस्रबुद्ध्यांच्या नैवेद्यांत व्याघ्रांबरी देवी आहे. ही व्याघ्रांबरी गुहागरची. ह्यावरून शांडिल्यगोत्री सहस्रबुद्ध्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे असें आम्ही ठरवितों. त्यामुळे त्यांचें मूळगांवहि गुहागरच असलें पाहिजे.

**सोमण**— नवांपैकी एकच सोमण वाडेश्वर कुलस्वामी म्हणून म्हणतो. हा इसम लवेलचा राहणारा आहे. बरेचसे सोमण आदित्यनाथ सांगतात. हे सांगणारे चिपळूण, मुरूड, केळशी, कोळथरें येथील राहणारे होत. आता आदित्यनाथाचें देऊळ आगरगुळें, आजगांव, नेवरें, मुरूड व सावर्डें इतक्या ठिकाणीं आहे. तेव्हा आजगांवचे व सावर्ड्याचे सोमण आदित्यनाथ कुलस्वामी सांगतात हें बरोबरच आहे. एकंदरींत आमच्यापाशीं आहे त्या पुरव्यावरून सोमणांचा कुलस्वामी व मूळ ठिकाण ह्याविषयी निश्चित निदान, सयुक्तिक अनुमान कांहीच करतां येत नाही. गुहागर हाच जर सोमणांचा

मूळ गांव असेल तर तो सोडून त्यांस शेंकडो वर्षें झालीं असतील.

तथापि नरवणे ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. हे मूळचे राहणारे नाख-र्‍याचे. सोमण आडनांवांतून नरवणें आडनांव निघालें असें म्हणतात. हें खरें असेल तर सोमणांचा कुलस्वामी वाडेश्वर असला पाहिजे. ह्या घरा-ण्याने आपला मूळ कुलस्वामी कायम ठेवला आणि सोमणांनी घालविला.

मायले आणि सोमण एकच. आंजर्ल्यास मायले कुटुंब होतें.

**गोडसे**— तीन गोडशांनी माहिती पाठविली. त्यांत दोन मालवण-वेंगुर्ला-गोवा ह्या बाजूचे. त्यांनी नवीन कुलस्वामी घेतले. तिसरे वसईचे गोडसे हरिहरेश्वर सांगतात. एकंदरींत ह्यांच्याविषयी निर्णायक कांही सांगतां येत नाही हें खरें.

**दातार**— दातार हे हर्णै-मुरुडच्या दक्षिणेस फारसे आढळणार नाहीत. वासिष्ठ व शांडिल्य दोनहि गोत्रांचे दातार मुरडास आहेत. ह्यावरून मुरडास आल्यावर ह्या कुटुंबांना दातार हें नांव पडलें असावें. वासिष्ठगोत्री दातार हिरण्यकेशी असून शांडिल्यगोत्री दातार आश्वलायन आहेत. अर्थात् हीं दोन निरनिराळीं कुटुंबें होत. केशवराज व माटलादेवी हीं ह्यांचीं कुल-दैवतें. ह्यामुळे काण्यांशीं ह्या घराण्याचें साम्य फार आहे. काण्यांप्रमाणे ह्या घराण्यांतहि कुणबीण सवाशिण सांगण्याचा प्रघात आहे. आम्हांला तर असें वाटतें की, काणे आणि शांडिल्यगोत्री दातार ह्यांचें एका काळीं एकच कुटुंब असलें पाहिजे.

**घनवटकर-घुले**— ह्यांचें मूळचें आडनांव जोशी हें होय. दोघांचाहि कुलस्वामी लक्ष्मीकेशव आहे. तेव्हा हे वरवडेकर जोशांपैकी होत ह्यांत शंका नाही. घनवटकर वेळंबचे. वेळंब गांव गुहागराजवळ आहे. आणि गणपति-पुळ्याच्या घनवटकरांनी आपला कुलस्वामी लक्ष्मीकेशव सांगतांना त्याच्या जोडीला वाडेश्वरहि सांगितला आहे. ह्यावरून जोशी मूळचे गुहागरचे ह्या

म्हणण्यास बळकटी येते. घुले नेवरें-कोतवडें येथील दिसतात. वरवडेकर जोशी ह्यांचें एक घराणें कोतवडयास असल्याचें मागे सांगितलें आहे. सारांश, धनवटकर व घुले वरवडेकर जोशांपैकी हें निःसंदेह दिसतें.

**भाटे**— शांडिल्यगोत्री भाटे सध्या ग्वाल्हेरकडे आहेत; त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. त्यांचें मूळ गांव गुहागर. ग्वाल्हेर-इंदूरकडे माळव्यांत कासेबुरवाडहून भाटे गेले असें श्री. गोपाळ चिमणाजी भाटे लिहितात. ह्या भाट्यांचें गांव कासेबुरवाडच आहे. ह्यावरून भाटे ह्यांचा कुलस्वामी वाडेश्वर व मूळ गांव गुहागर असें आम्ही ठरवितों. भाटे ह्यांचें पूर्वीचें नांव जोशी असें होतें.

**मटंगे**— हे शांडिल्यगोत्री जोशी. लक्ष्मीनृसिंह कुलस्वामी.

**भोगले**— हे मिटगांवण्याला स्थायिक झाल्यामुळे शेजारचा अंजनेश्वर त्यांनी कुलस्वामी केला. ह्या घराण्याची पूर्वीची माहिती नाही.

**शेंडे**— शेंडे कौशिकगोत्री आहेत त्याप्रमाणे शांडिल्यगोत्रीहि आहेत. परंतु दोघेहि कासारी, तालुके रत्नागिरी, हाच आपला मूळगांव सांगतात. वसईचे शेंडे शांडिल्यगोत्री असून गणपतिपुळ्याचे कौशिकगोत्री आहेत. वसईचे शेंडे गोलांबिका देवी आपली कुलस्वामी मानतात. ही देवी रत्नागिरी जिल्ह्यांत असल्याचें माहीत नाही. तेव्हा ह्या शेंड्यांना आपला कुलस्वामी माहीत नाही असेंच म्हणावें लागतें.

**राजवाडे**— ह्यांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव (जोगेश्वरी). निव्याची मूळ वस्ती. केशवराज जोश्यांत हे मिसळून जाण्यासारखे आहेत. राजवाडे ह्यांचें पूर्वीचें नांव जोशी.

**काळे**— शांडिल्यगोत्री काळे आडिवऱ्यास आहेत. तेथून कांही काळे आंजर्ल्यास जाऊन स्थायिक झाले. त्यामुळे आडिवऱ्याच्या देवतांना ते चिकटून आहेत. एकाच शांडिल्यगोत्री काळ्यांची माहिती मिळाली आहे.

आडिवऱ्यास वत्सगोत्री काळे आहेत. शांडिल्यगोत्री काळे आडिवऱ्याची महांकाली आपलें कुलदैवत समजतात. अर्थात् त्यांना आपल्या मूलस्थानदेवतांचा विसर पडला. आडिवऱ्याच्या व आंजर्ल्यांच्या देवतांना फक्त त्यांनी अद्यापि संभाळून ठेविलें आहे.

शांडिल्यगोत्रांतील परचुरे, गांगल, भाटे व रिसबूड हे मूळ गुहागरचे असून त्यांचा कुलस्वामी वाडेश्वर असावा असें जी कांही थोडीशी माहिती ह्या कुटुंबांची आमच्याकडे आली आहे तिच्यावरून म्हणतां येण्यासारखें आहे.

शांडिल्यगोत्री कर्वे, नेहरे, पावशे, टकले ह्यांची माहिती आमच्याकडे आली नाहीं.

गांगल, पळणीटकर, पावगी ह्या डोंगऱ्यांच्या शाखा मानल्या जातात. परंतु डोंगऱ्यांच्या भवानी-भूतेश्वराचा बाकीच्या कुटुंबांत मुळीच पत्ता नाही. एक रोह्याचे गांगल आपला कुलस्वामी वाडेश्वर सांगतात. वरील सर्व आडनांवांचे पूर्वी एक कुटुंब होतें असें मानलें तर ह्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर असावा असें मानणें अयुक्तिक होणार नाही. परंतु वरील आडनांवांच्या लोकांची मिळावी तितकी माहिती मिळाली नाही हें खरें. आपण मूळचे पालशेतचे असें एका डोंगऱ्याने लिहून दिले आहे. त्यावरून गुहागरच्या जवळ डोंगऱ्यांनी आपलें मूळ ठिकाण आणून भिडवलें हें उघड आहे. पालशेतनंतर डोंगऱ्यांचें कोतवडें गांव असावें. पळणीटकर सडे-पिरंदवण्याचे सांगतात. गांगल दक्षिणेस हरेश्वराच्या बाजूस वळले असें दिसतें. पावग्यांचा कुलस्वामी हरिहरेश्वर म्हणतात.

**ताम्हणकर**— कुवेशी, देवाचें गोठणें, तेंडुली (कुडाळ प्रांत), आजरें, कोचरें ह्या गांवीं ताम्हणकरांची वस्ती पसरलेली आहे. चिपळूण तालुक्याशीं ताम्हणकरांचा संबंध दिसत नाही. ह्यांचा कुलस्वामी कालभैरव असावा. सहांपैकी चौघांनी

कालभैरव लिहून दिला आहे. हा कालभैरव कोठचा हें कोणीं लिहून दिलेलें नाही. ग्रामदेवतांना हें घराणें विसरलें असल्यामुळे राजापूर तालुक्याच्या पूर्वी हें घराणें कोठे होतें हें समजण्यास मार्ग उरला नाही. नवीन घ्यावयाचें आणि पूर्वीचें सोडावयाचें असा ह्या घराण्याचा संप्रदाय दिसतो. ह्यामुळे ताम्हण-करांचा मूळ कुलस्वामी व मूळ गांव निश्चित करण्यास साधन नाही. तथापि कालभैरव हा कुलस्वामी होऊं शकत नाही. तरीसुद्धा सध्या कालभैरव हाच कुलस्वामी असें आम्ही धरून चालतों. गांवाविषयी घरसोडपणाचेंहि बोलणें बोलतां येत नाही. केळकरांनून ताम्हणकर फुटले असें म्हणण्यास आधार नाही.

ताम्हणकरांप्रमाणे तुळपुळ्यांविषयीहि कांही सांगतां येत नाही. मालवण तालुक्यांतील आडवलीचे हे राहणारे. पूर्वीची ह्यांना कांही माहिती नाही. वोवडेश्वर हा एकाचा कुलस्वामी तर विष्णुपंचायतन हा दुसऱ्याचा. कुलस्वामीचा अर्थहि समजत नाहीसा झाला. त्यामुळे विष्णुपंचायतन हा कुलस्वामी म्हणून सांगण्याची वेळ आली !

**थत्ते**-- शांडिल्यगोत्री थत्त्यांचाच येथे विचार करावयाचा आहे. थत्ते घराण्याच्या इतिहासावरून पाहतां केतकी-बिवलीचे थत्ते मूळचे राहणारे. ह्यांच्या निरनिराळ्या कुटुंबांचे कुलस्वामी लक्ष्मीकेशव, हरिहरेश्वर व वाडेश्वर असे आहेत. ज्यांनी नुसती जोगेश्वरी सांगितली आहे त्यांचा विचार केला नाही. लक्ष्मीकेशव हा बिवलीचा देव असल्याने थत्त्यांचा तो कुलस्वामी असणें स्वाभाविक आहे. परंतु एका थत्ते कुटुंबाचा कुलस्वामी हरिहरेश्वर असून लक्ष्मीकेशव ह्या कुटुंबांत ग्रामदेवता समजतात. ह्यांचेंहि मूळ ठिकाण केतकी बिवली[1]. ह्यांच्याच चौथ्या घराण्यांत लक्ष्मीकेशव हा कुलस्वामी असला तरी नैवेद्यांत वाडेश्वर व जोगेश्वरी आहेत.[2] ह्यावरून थत्त्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर असावा असा तर्क करण्यास प्रत्यवाय नाही. ६ ह्या

१ थत्ते कुलवृत्तान्त १०२. २ ११३.

घराण्याच्या नैवेद्यांत व्याघ्रांबरी आहे.[1] ही देवी गुहागरलाच आहे. ७ त्या घराण्याचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव असून नैवेद्यांत हरिहरेश्वर आहे.[2] अर्थात् लक्ष्मी केशवाच्या अगोदरचा कुलस्वामी हरिहरेश्वर असला पाहिजे. १३ त्या घराण्याचा कुलस्वामी वाडेश्वर आहे. ह्यावरून प्रथम वाडेश्वर, नंतर हरिहरेश्वर आणि शेवटीं लक्ष्मीकेशव असे कुलस्वामी थत्त्यांचे पालटत गेले हें स्पष्ट आहे. सारांश, थत्त्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर असें आम्ही ठरवितों. आणि म्हणून त्यांचें मूळ ठिकाण गुहागर हेंच असलें पाहिजे. ३ ऱ्या घराण्यांत केतकी-बिवलीस मुरुडाहून थत्ते आले ही समजूत अद्यापि आहेच. थत्ते दक्षिणेस न वळतां उत्तरेस वळले असें दिसतें.

थत्त्यांपैकी कांही विद्वांस झाले तेहि मूळचे बिवलीचे असून त्यांचा कुलस्वामी लक्ष्मीकेशव आहे. तेव्हा थत्त्यांचा निर्णय त्यांनाहि लागू आहे.

निष्कर्ष— आता शांडिल्य गोत्रासंबंधाने निष्कर्ष निघतो तो हाः—

आंबेकर, कर्वे, करवीर, टकले, पांवशे, भागणे, मध्ये, मन्ये, माईल, लचई, लावेकर, व्यास, शिधोरे, शेगले, शेरकर ह्यांची माहिती आम्हांस मिळाली नाही.

काळे, ताम्हणकर, तुळपुळे, गोडसे, नित्सुरे, पळणीटकर, पावगी, डोंगरे, सोमण, भोगले, शेंडे ह्यांच्याविषयी निश्चित विधान करतां येत नाही.

दामले, परचुरे, भाटे, गांगल, नरवणे, नामजोशी, आमडेकर, रिसबूड, थत्ते, सहस्रबुद्धे, गणपुले, शिधये, पाटणकर हे निःसंशय वाडेश्वर कुलस्वामी असणारे आहेत.

केळकर हे सोमेश्वरवादी आहेत. त्यांचा गुहागराशीं संबंध जोडण्यास प्रमाण मिळत नाही.

जोशी ह्यांचे कुलस्वामी लक्ष्मीकेशव, लक्ष्मीनृसिंह, केशवराज, वाडेश्वर

---

१ १३७. २ १४४. ३ १६७.

असे आहेत. काणे, घनवटकर, घुले हे लक्ष्मीकेशववाल्यांपैकी; मटंगे लक्ष्मीनृसिंहवाल्यापैकी; राजवाडे यांचा केशवराज, आणि कोझरेकर यांचा लक्ष्मीनारायण. ह्या सर्वांचा विस्तार जोशांतून झाला आहे. आणि जोशी ह्यांचा मूळ कुलस्वामी वाडेश्वर व मूळ गांव गुहागर असें आम्हीं ठरविलें आहे.

ह्यावरून शांडिल्यगोत्राचे लोक प्रथम गुहागर येथेच आले असें म्हणतां कां येऊं नये !

## १३ कोठून आले असावे

परशुरामाचें मूळ नांव नुसतें राम असून परशु हें जें त्याचें आयुध त्यावरून त्यास परशुराम म्हणूं लागले असें दिसतें. परशु म्हणजे कुऱ्हाड. मुसळ हें जसें यादवांचें आयुध त्याप्रमाणे परशु (कुऱ्हाड) हें इराणांतील पर्शु जातीच्या लोकांचें आयुध असावें. इराणांत पर्शु नांवाची एक जात होती. ऋग्वेदांत या पर्शूंचा उल्लेख आहे. भार्गव हे अग्नि–उपासक होते. असुरांशीं त्यांचा संबंध होता. शुक्र हा असुरांचा गुरु म्हणून प्रसिद्ध आहेच. तो भृगु व हिरण्यकशिपु याची कन्या दिव्या यांचा पुत्र होता. ह्याचें राहणेंहि बर्बर देशांत म्हणजे हिंदुस्थानाबाहेर होतें. ह्याला बर्बरदेशीय असें गणेशपुराणांत म्हटलें आहे. हा युद्धांत मेलेल्या असुरांना जिवंत करतो हें पाहून देवीने त्याला बर्बर देशांत नेऊन टाकलें, अशी कथा ह्याच गणेशपुराणांत आहे. तात्पर्य, हे भार्गव इराणांतून इकडे भरतखंडांत येण्याचा संभव आहे. आपल्याच जातीचा एक महापुरुष कोंकणांत येऊन राहिला आहे हें ऐकून ते इकडे आले असावे. "त्रेतायां कुणपोत्पन्ना भूताः परशुरामतः। विप्रा भुवनसंख्याश्च तद्व्याख्या सह्यखंडके[1]॥" त्रेतायुगामध्ये परशुरामाने प्रेतापासून १४ ब्राह्मणांना उत्पन्न केलें ही दंतकथा साधार असली तर तिच्यावरून एवढें दिसतें की, १४ ब्राह्मण मरणोन्मुखस्थितींत समुद्राकिनाऱ्याला लागले. हे ब्राह्मण गलबतांतून आले असले पाहिजेत ह्यांत शंका नाही. अर्थात् ते लांबून आले असावे. इराणी आखातांतूनहि येण्याचा संभव आहे. इतका लांबचा प्रवास गलबताने करावयाचा असल्यामुळे अन्नपाण्याचा तुटवडा पडून ह्या ब्राह्मणी प्रवाश्यांची स्थिति व्याकुल झाली असल्यास

१ भा. मा. पृ. ३२४ श्लो. ३६.

नवल नाही. जमिनीला लागल्यावर परशुरामाने त्याना अन्नपाणी देऊन थारा दिला इतकीच गोष्ट आपणांस वरील कथेवरून घेण्यासारखी आहे.

दुसरी एक दंतकथा ब्राह्मणोत्पत्तिमार्तंडांत उल्लेखलेली आहे[1]. तिच्यावरून असें दिसतें की, हे चौदा ब्राह्मण सह्याद्रीच्या पश्चिमेस आपल्या धर्माप्रमाणे सकुटुंब राहत असतांना समुद्रांतून येणाऱ्या बर्बरादि म्लेच्छांनी त्यांना पकडून नेलें (एवं निवासं कुर्वत्सु अकस्माद्दैवयोगतः । नीत्वा सागरमध्यस्थैर्म्लेच्छैर्बर्बरकादिभिः॥). अनेक वर्षेपर्यंत ह्या लोकांबरोबर त्यांचा सहवास झाला, तेथे त्यांना प्रजा झाली वगैरे कारणांमुळे ते पतित झाले. तेव्हा रामाने त्यांना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतलें. ह्या कथेंत सुद्धा चित्पावनांचा संबंध बर्बर देशाशीं लावलेला आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. शुक्राचार्याला देवीने बर्बर देशांत नेऊन सोडलें हें गणेशपुराणांतील उपरोक्त उताऱ्यावरून समजून आलेंच आहे.

तिसऱ्या कपोलकथेप्रमाणे परशुराम स्नानासाठी समुद्रावर गेला असतां चितास्थानीं कांही कोळी त्याला आढळले त्यांना त्याने ब्राह्मण करून घेतलें. ह्याहि कथेंत चित्पावनांचा समुद्राशीं संबंध जोडलेला आहे.[2]

ह्यावरून चित्पावन समुद्रांतून कोंकणपट्टीवर आले ह्याविषयी आम्हांस संशय वाटत नाही. परशुराम ह्या शब्दावरून चित्पावनांचा इराणाशीं संबंध लावावासा वाटतो. परंतु इराणांत परशुरामाच्या आख्यायिका आहेत असें वाटत नाही. परशुरामाचा किंवा जमदग्नीचा आश्रम नर्मदाकांठीं म्हणजे हिंदुस्थानांत होता. त्याने पराक्रमहि ह्याच देशांत केले. ह्यावरून इराणच्या आखाताची कल्पना मनाला पटत नाही. भृगुवंशज इराणांतून

१ पृ.३१९ श्लो.५६.

२ सूर्योदये तु स्नानार्थं गतः सागरदर्शने । चितास्थाने तु सहसा आगतांश्च ददर्शसः॥ ब्रा. मा. पृ.३१४ श्लो.१३.

प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत आले असतील पण तेवढ्यावरून चित्पावन ब्राह्मण तिकडून आले असें म्हणणें तर मुळीच सयुक्तिक होणार नाही.

दक्षिण आफ्रिकेच्या पूर्वकिनाऱ्यावरून चित्पावन कोंकणांत आले असावे असा रा. सा. मण्डलिक यांनी तर्क केला आहे. ह्या तर्काला त्यांनी कांही प्रमाणेंहि दिलीं आहेत. कोंकणांतील ज्या भागांत चित्पावन येऊन राहिले त्याला बर्बरकोंकण म्हणतात. पश्चिमसमुद्रावरील देशांत बर्बर देशाचा अंतर्भाव सह्याद्रिखंडांत केला आहे. तो श्लोक असाः—

केरलाश्च तुलिङ्गाश्च तथा गोराष्ट्र (सौराष्ट्र) वासिनः ।
कोंकणाश्च कुडालाश्च वरालाटाश्च बर्बराः[१] ॥

बर्बरलोक उंच, गोरे, घाऱ्या डोळ्यांचे व सरळ नाकाचे असल्याचें गुंजीकर सरस्वतीमंडळांत सांगतात.[२] कोंकणस्थ ब्राह्मण व बर्बर ह्यांच्या चेहऱ्यांत साम्य असल्याचें आपणांस तज्ज्ञ सांगतात. मंडलिकांच्या मतें हे अवैदिक लोक आफ्रिकेंतून येऊन कोंकणांत राहिले तेव्हा द्राविडांत समाविष्ट झाले. पण अब्राह्मण ब्राह्मण होणें जरा कठीण दिसतें. शिवाय कोंकणस्थांत प्रारंभापासून वैदिक आचार रूढ असावे असें वाटतें. त्यांची परंपरा वैदिक दिसते, अवैदिक नाही. आता आफ्रिकेंत म्हणजे बर्बरी देशांतहि वैदिक परंपरेचे लोक नसतील असें आमच्याने म्हणवत नाही. शुक्राचार्य बर्बरीचा असल्याचा उल्लेख गणेशपुराणांत केलाच आहे.

मुडुबिद्री येथील जैन लोक आपण पूर्वी क्षत्रिय असून अरबस्थानांत होतों, २५०० वर्षांपूर्वी परशुराम भट्टारक ह्याच्या छळामुळे आम्हांस तो देश सोडून इकडे यावें लागलें असें मानीत असल्याचा उल्लेख बुचा-

---

१ श्री.इरावती कर्वे— Journal of the University of Bombay, Vol. II, Part I, July 1933, Page 132.

२ पृ. १४७-१५०.

ननने आपल्या प्रवासांत केला आहे. परशुराम भट्टारक हा मुसलमानी धर्माचा संस्थापक अशी त्यांची समजूत होती.[१] परशुरामाच्या कथेची ही अशुद्ध, कल्पनामिश्रित, बिघडवलेली आवृत्ति आहे हें उघड आहे. तथापि हिंदु म्हणविणारे लोक अरबस्थानांतून आले ही समजूत कांही लोकांत वसत होती एवढ्यापुरतें महत्त्व ह्या दंतकथेस देण्यास हरकत नाही.

डॉ. भांडारकर नॉर्डिक लोकांशीं कोंकणस्थांचा संबंध जोडतात. बर्बर आणि नॉर्डिक हे एकाच वंशांतील मानले जातात. म्हणजे भांडारकर व मंडलिक ह्यांचीं मतें जुळतीं आहेत.

एन्थोव्हनने चित्पावनांसंबंधाने दोन गोष्टी विशेष सांगितल्या आहेत. आम्ही देशस्थ असून अंब्याकडून आलों असें चित्पावनांचें म्हणणें म्हणून त्याने नमूद केलें आहे. आमच्या मतें चित्पावनांना जेव्हा देशस्थ ब्राह्मण कमी लेखूं लागले व ते आपल्या पंक्तीस हि घेतना तेव्हा कुलस्वामिनी जोगेश्वरी हिचा आधार घेऊन आम्ही अंब्याकडून आल्यामुळे देशस्थच आहों, अशी बतावणी एन्थोव्हनसाहेबांजवळ कोणीं केली असेल. बाकी आम्ही देशस्थ असून मूळचे अंब्याचे अशी समजूत कोंकणस्थांत असल्याचें आम्हांस माहीत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे आपल्या जातीबाहेरील माणसास चित्पावन आपल्या जातींत घेतात; मात्र जन्म झाल्याबरोबर नाळ कापण्याच्या पूर्वी ही गोष्ट व्हावी लागते. पण हाहि प्रकार आमच्या कानावर नाही. शोध करतांहि कोणी सांगत नाही. एखादे वेळेस परजातींतील मूल अशा रीतीने घेतलें असेल; परंतु अशीं उदाहरणें क्वचितच घडलीं असतील.

आमच्या इकडे अशी एक चाल आहे की, मूळ नक्षत्रावर जन्मलेलें मूल आईबापांस मृत्युकारक असल्यामुळे तें नाळ कापण्यापूर्वी पिंपळाच्या

१ Ancient Karnatak 409.

पारावर ठेवतात. असें ठेवलेलें मूल कोणीहि मनुष्य उचलून घेऊन जातो व त्याचा सांभाळ करतो. ह्या चालीचाच उल्लेख एन्थोव्हनसाहेब बहुधा करीत असावा. परंतु ही चाल केवळ चित्पावनांत नसून सर्व जातींत आहे. अशा पारावर टाकलेल्या मुलाची तें कोणत्या जातीचें आहे, ही चौकशी कोणी करीत नाही. "जन्मना जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्यते।" हें शास्त्रवचन ह्या ठिकाणीं अक्षरशः खरें ठरतें. ही चाल अलीकडे बंद झाली आहे. तथापि अशी वहिवाट पूर्वी असल्याचें लोक सांगतात. अनाथ-आश्रम निघण्याच्या पूर्वी व्यभिचारज संतति नाशकासारख्या क्षेत्रीं पारावर टाकून दिल्याचे प्रकार पुष्कळांच्या माहितींतले असतील. अशीं मुलें कोणीहि पोषणार्थ घेऊन जाई.

केस, नाक, तोंड ह्यांच्या स्वरूपावरून व मापांवरून चित्पावन हे महाराष्ट्रांतील इतर जातींहून भिन्न नाहीत. ह्यावरून ते बाहेरून आले नाहीत असें गुह ह्यांचें म्हणणें आहे. आमच्या मतें गुह ह्यांनी दिलेल्या प्रमाणांवरून निर्णायक मत देतां येणें कठीण आहे. संकरामुळे शेजारीं राहणाऱ्या लोकांत शारीरिक चिन्हांची सदृशता असणें संभवनीय आहे. तथापि शारीरिक प्रमाणांवरून चित्पावनांची जात निर्भेळ नाही इतकेंच फार तर म्हणतां येईल. परंतु त्रेतायुगांत ते कोंकणांत कोठून आले हें ठरविण्यास त्या प्रमाणांचा तादृश उपयोग नाही. चित्पावनांचें मानववंशशास्त्रदृष्टया औदिच्य ब्राह्मण, रजपूत, मालवे ब्राह्मण, कानडा ब्राह्मण ह्यांच्याशीं विशेष साम्य आहे. ह्यावरून चित्पावनांचें निर्गमस्थान निश्चित करणें अवघड आहे. भडोचकडून आले असें मानलें तर नर्मदाकांठीं किंवा हिंदुस्थानांत ते कोठून आले, हें समजण्यास अनाक्षेपार्ह असें प्रमाण नाही. औदिच्य ब्राह्मण गुजराथेंत प्रथम आले व ते उत्तरेकडून आले म्हणून त्यांस औदिच्य म्हणतात. ह्या ब्राह्मणांशीं चित्पावनांचा संबंध लावण्यास

अधिक संशोधनाची आवश्यकता आहे.

चित्पावन गौरवर्णांचे, पिंगट केसांचे आणि घाऱ्या डोळ्यांचे असें त्यांचें वर्णन आहे आणि हें शास्त्रीय कसोटीस उतरलें आहे. गुह ह्यांच्या मतें आशिया-मायनर मधले लोक कृष्णवर्णी असून वंशशास्त्रदृष्ट्या निराळ्याच वर्गांत मोडतात. म्हणून आशिया-मायनरकडून चित्पावन आले नाहीत. कास्पियन समुद्र व कश्यप ऋषि ह्यांचें शब्दसादृश्यावरून नातें जोडण्यांत येतें. श्री. इरावती कर्वे म्हणतात की, चित्पावनांत द्रविड आणि आर्य ह्यांची भेसळ आहे. ज्यू आणि पारशी ह्यांच्या नाकांशीं चित्पावनांचें नाक बऱ्याच प्रमाणांत जुळतें असलें तरी दोघांत थोडा फरक आहे. पारशी हे आर्यच आहेत. तेव्हा दोघांत एकवंशतेची कांही चिन्हें आढळणें अस्वाभाविक नाही. चित्पावनांनी द्रविड जातीच्या बायका केल्या कारणाने द्राविडी चिन्हेंहि त्यांच्यांत सांपडतात. जोगाईच्या आंब्याहून परशुरामाने चित्पावनांना बायका आणून दिल्या असें मानण्यास यत्किंचितहि पुरावा नाही. जोगेश्वरी चित्पावनांचें कुलदैवत आहे ह्या कल्पनेवरच बायका आणून दिल्याचा तर्क उभारला आहे. परंतु पायाच निराधार असल्यामुळे वरील इमारत कोसळून पडणार हें उघड आहे. चित्पावन ब्राह्मण कोठूनहि येवोत; पण जेथून ते आले तेथून भीतीने पळून आले असें मानलें तरी, बायका सोडून आले असतील असें आम्हांस वाटत नाही. कांही बायका बरोबर त्यांनी आणल्याच असतील. कांहीकांना बायका नसतील, कांहीकांच्या इकडे आल्यानंतर अगर मार्गांत मेल्या असतील; अशा पुरुषांना इकडील बायका करणें भाग होतें. चित्पावनांच्या बायका गौरवर्णाच्या होत्या असें प्रथमपासून प्रसिद्ध आहे. अंब्याकडील स्त्रिया गौरवर्णाकरिता प्रसिद्ध आहेत असें वाटत नाहीं. गोकर्णापासून खाली गौरवर्णाच्या स्त्रिया आढळतात. अथवा बरोबर आलेल्या स्त्रिया गौरवर्णी असल्या पाहिजेत.

आंब्यास साठये उपनांवाचें एक कुटुंब आहे. साठये हें उपनांव चित्पावनांतच आहे असें म्हणतात. ह्यावरून आंबें हेंच चित्पावनांचें मूळ ठिकाण असा एक समज पसरत चालला आहे. अधिक विचाराअंतीं हा भ्रम आहे असेंच आढळून येईल. आंब्यास किंवा आसपास चित्पावनांचें एकहि कायम वस्तीचें मूळचें कुटुंब नाहीं. साठये आंडनांवाचें जें आंब्यास कुटुंब आहे त्याचें गोत्र भारद्वाज आहे. आपल्याकडील साठये यांचें गोत्र वासिष्ठ आहे. ही गोत्रभिन्नता लक्ष्यांत घेतली पाहिजे. आंब्याच्या साठये-घराण्यांत चित्पावनांची कोणतीच परंपरा नाहीं. ह्या कारणास्तव साठये ह्या उपनांवावरून चित्पावन मूळचे आंब्याचे हें अनुमान करणें अयोग्य होईल. देवरुख्यांतील मराठे उपनांवाप्रमाणेच देशस्थांतील साठये उपनांव अपवादात्मक आहे, इतकेंच म्हणून स्वस्थ बसणें भाग आहे.

आतां रा. ब. बांबर्डेकरांचें मत काय आहे तें पाहूं. ते म्हणतात:— "इतर ब्राह्मणांपेक्षा चित्पावन गौरवर्णाचे (शुद्ध गौरवर्णी नव्हेत असे) असतात. अगदी थोडे अपवाद सोडल्यास त्यांचे डोळे घारे, बांधा प्रायः उंच, मान उंच व नाक सरळ असतें. स्त्रियांचे डोळे किंचित् पिचके, केस (विशेषतः दक्षिण कोंकणांतील) इतर ब्राह्मणांप्रमाणे काळेभोर नसून लालट, पिंगट वर्णाचे असतात. यांच्याशीं साम्य दर्शविणारा एक ब्राह्मणवर्ग असून तो तुर्की ब्राह्मणें या नांवाने सोरटी सोमनाथ येथें प्रसिद्ध आहे. त्यांच्याप्रमाणे चित्पावन हेहि कदाचित् त्याच प्रदेशांतून—प्रायः असुर-देशांतून जलमार्गानें कोंकणांत आले असावे.........तुर्की ब्राह्मणांप्रमाणे चित्पावन सिरियामधून अथवा इराणामधून आले असें मानलें तरी त्या

---

१ देवाच्या आळंदीस एका ब्राह्मण कुटुंबाचें आडनांव तुर्की असें आहे. तसेंच आडिवऱ्यास तुरकी व तुरकीण ह्या नांवाचे स्त्रीपुरुष असल्याचें दीक्षितांच्या जवळील एका यादीवरून दिसतें. सं.

ठिकाणीं त्याच कालीं वैदिक चातुर्वर्ण्य होतें हें सिद्ध करणें बरेंच कठीण खरें; तरी पण प्राचीन यवन, असुर यांची संस्कृति जवळ जवळ वैदिक संस्कृतीसारखीच होती. मग नांवाचे ब्राह्मण आज राजपुतान्यांत आहेत ते अक्यामेनियन् इराणी राजांनी सिंधु प्रदेश (हप्त हिंदु) जिंकून घेतला त्या वेळीं २८०० वर्षांपूर्वी इकडे आले आहेत. शक, पल्लव आणि बॅक्ट्रियन ग्रीकवंशीय क्षत्रिय हे भारतीय हिंदु समाजांत मिळून गेले आहेत. त्यांचें मिश्रण आजहि शास्त्राधारें दाखवितां येते."

आणखी पुढे "चितवन ह्या नांवाची एक गढवाल किंवा पर्वती ब्राह्मण-जाति आहे व चितवन हें त्यांचें ग्रामनाम आहे. चित्पावन हें नांव-सुद्धा असेंच ग्रामवाचक किंवा प्रांतवाचक असावें. इराणांतून आले असें मानल्यास अन्, मन्, तन्, इत्यादि प्रत्ययान्त नांवें इराणांत आहेत. त्यांत चित्पावन हें नांव कदाचित् इराणी संस्काराचें असून त्यावर हिंदुस्थानांत आणखी संस्कार होऊन बनलें नसेल कशावरून ? हा नुसता तर्क आहे."[2]

आमच्या मतें यवन व म्लेंच्छ देशांत वैदिक ब्राह्मणांची वस्ती होती. यजुर्वेदाच्या योगकठ व हसलकठ ह्या शाखा यवनदेशांत असल्याचें शाखाग्रंथांत सांगितलें आहे.[3] अंदमानांत ब्राह्मणांचीं ५।६ घरें आहेत; ब्रह्मदेशांत तर शेंपन्नास आहेत. श्री. द. ल. जोशी ह्यांनी प्राचीन भारत-वर्षाचा नकाशा छापला आहे त्यांत यवनदेशांत कठ, प्राच्यकठ, पिलकठ, चुचुकठ, योगकठ, हंसलकठ हे कठब्राह्मण त्याचप्रमाणे चारायणीय

१ ग्रामनामाविषयी परशिअन कॉन्सलकडे चौकशी केली पण कांही माहिती मिळाली नाही. सं.

२ खासगी पत्र.

३ Vedic Journal 10. तसेंच पान १६ वर आणखीशाखा यवन-देशांत असल्याचें दिसून येईल.

शाखेचे ब्राह्मण राहतात असें दाखविलें आहे. ह्याशिवाय "यावनाः सांभर-देशे" असा निर्देश करून यवनब्राह्मणांचें अस्तित्वहि सांगितलें आहे.

ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांचा उदय होण्यापूर्वी आशिया, मध्ययुरोप व आफ्रिका ह्या खंडांतील लोकांची संस्कृति जवळजवळ सारखीच होती. एवढेंच नव्हे तर वैदिक धर्माचे लोक हिंदुस्थानाबाहेरच्या प्रांतांत राहत असावेत हें वेदशाखांची माहिती दिली आहे तिच्यावरून दिसून येतेंच. ह्या-शिवाय किरकोळ गोष्टी एकत्र केल्या तर त्यांचीहि प्रमाणानुकूलता आप-णांस मिळते. इजिप्तला मिसरदेश म्हणजे मिश्रदेश म्हणत असत, हें नांव देव, असुर, मानव, पितर ह्या निरनिराळ्या समाजांची वसती तेथे अस-ल्याचें सुचवितें. पर्शु लोक व परशुराम ह्यांचा जर कांही संबंध असेल तर परशियाला (सध्याच्या इराणाला) परशुरामाच्या लोकांवरून नांव पडलें असें म्हणतां येईल. युफ्रेटीज नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर परशुपूर नांवाचे गांव होतें म्हणतात. मध्यआफ्रिकेंत शहरें, नद्या, सरोवरें इत्यादींचीं नांवें मूळचीं संस्कृत असावीं असा तर्क करतां येण्यासारखा आहे; उदा. भार्गो (भार्गव) हें एका सरोवराचें नांव आहे. ह्या पुराव्यावरून मध्यआफ्रिकेंत ब्राह्मणांची वस्ती असावी असें अनुमान केलें जातें.

चालीरीतींतहि साम्य आढळतें; उदा. इजिप्त व पॅलस्टाईन ह्या देशांत शिव व सूर्य ह्या देवांची उपासना प्रचलित होती. तेथे दर अमावास्येला बैल व वासरूं बळी देण्यांत येई. सौरपंथी लोक नंदीची पूजा करीत. सिथिक लोकांत एका बायकोला अनेक पति करण्याची चाल होती. सर बुइल्यम जोन्सच्या म्हणण्याप्रमाणे हिंदूंचा प्राचीन परशिअन, एथिओपिअन, इजिप्शन, फिनीशियन, ग्रीक, टस्कन, सिथियन, सेल्ट, चिनी, जपानी व पेरुनियन ह्या लोकांशीं निकट संबंध होता.[1]

---

१ ह्या परिच्छेदांतील माहिती 'इंडिया इन ग्रीस' व 'ओरिएंटल् फ्रॅग्मेंटस्' ह्या पुस्तकांतून घेतली आहे.

"कोंकणस्थ चित्पावन कोठून आले अशाबद्दल माझें मत असें आहे की, ते बहुधा सिंध–काठेवाड–गुजराथ या मार्गाने समुद्रकांठाने कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांत स्थायिक झाले. कारणें:—कोंकणस्थांची बहुतेक वस्ती समुद्रकिनाऱ्यालगतच आहे. भाषेच्या दृष्टीने विचार केला तर कोंकणस्थांची जुनी भाषा व गुजराथी भाषा यांत पुष्कळच साम्य आहे; उदा. कैं से! (कोठे आहे!) क्यां छे! (गु.); घोडो, कुत्रो (जुनी चित्पावनी) इ. शब्द गुजराथेतील घोडो, कुत्तियां इ. सारखेच आहेत. शब्दांचा उच्चार सिंधमधील हिंदु लोक जसे अनुस्वारयुक्त शब्दांचा नाकांतून ठासून उच्चार करतात तसा आजहि जुनी चित्पावनी मंडळी करतात. भाषा व उच्चार सहसा बदलत नाहीत. चित्पावनांची जूट कमीच. कारण त्यांच्या टोळ्या हळू हळू उत्तरेकडून दक्षिणेकडे उतरल्या व एकएका टोळीमध्ये पुष्कळ काळ गेल्यामुळे पहिल्याने आलेल्या टोळीशीं ते पूर्ण एकोप्याने वागत नाहीसे झाले." (कृ. रा. जोशी, जळगांव)

आमच्या मतें श्री. जोशी म्हणतात त्याप्रमाणे वरतून हे लोक समुद्रकिनाऱ्याने आले असते तर त्यांची प्रथम वस्ती वसई, मुंबई, अलीबाग, चौल वगैरे अष्टागरप्रांतांत झाली असती. परंतु सर्व चित्पावन मूळचे रत्नागिरी जिल्ह्यांतील ह्याविषयी शंका नाही. शिवाय ज्या दंतकथांचा उल्लेख पूर्वी केला आहे त्या दंतकथा निर्माण झाल्या नसत्या. पारशी लोक संजानला लागले, यहुदी लोक अलीबागेस आले व चित्पावन खाली गुहागराजवळ येऊन थडकले असें आम्हांस वाटतें. समुद्रकिनाऱ्यावर ह्या तीन जाती बाहेरून म्हणजे जलमार्गाने येऊन स्थायिक झाल्या. चौल व्यापारी शहर असल्या कारणाने यहुदी लोकांनी तेथे मुक्काम करणें स्वाभाविक आहे. खालील किनारा विरळ लोकवस्तीचा होता. आणि त्यामुळेच चांचे लोकांपासून त्या भागाला उपद्रव होत असे. सारांश, सिंधकडून आले हें म्हणणें

दंतकथांच्या विरुद्ध आहे. त्याचप्रमाणे वसई, सोपारा, अष्टागर इत्यादि प्रांतांतील मूळ ब्राह्मणांची वस्ती विचारांत घेतली तर तें म्हणणें सयुक्तिक दिसत नाही.

"रेणुका ही माहूरची. हिलाच एकवीरा, येल्लम्मा, यमाई अशीं नांवें आहेत. धारवाडजवळची येळम्मा ( येलु=सात+अम्मा. सप्तमातृका ? )— हिचें रूप यळम्मा आई–यम्मा आई–यमाई असें झालें असावें. ही रेणुका-एकवीरादेवी एकनाथांची कुलस्वामिनी होती. तिच्या स्तवनपर भागवतांत ओव्या आहेत.[१] 'ते एकरूपें एकवीरा । प्रसवली बोधपरशुधरा।' असा परशुरामाचाहि तेथे उल्लेख आहे. ह्या माहुरास एक डोंगर आहे, त्यास सिंह्याचळ, सैह्याचळ, सिंहाद्रि अशींहि नांवें आहेत. परशुराम आणि सह्याद्रि यांचा संबंध येथेहि आहे. महानुभावांच्या दत्ताचें माहूर हें मुख्य स्थान आहे. त्यांच्या ग्रंथांतून या सिंहाद्रीचे उल्लेख आहेत. तेव्हा कोंकणस्थांच्या आद्यदैवतेचा देशस्थमाता हा संबंध उलगडला पाहिजे. रेणुका देवी सर्वत्र सांपडते व तिचीं वेगवेगळीं रूपें आहेत. रेणुराजाशीं तिचें नांव मागाहून जोडलें काय ?" (चिं. ग. कर्वे, पुणें)

रेणुकेसंबंधी श्री. कर्वे जें म्हणतात तें गस्टाव ऑपर्ट ह्यानेहि म्हटलें आहे.[२] रेणुकेचें मस्तक एका परिया स्त्रीच्या मस्तकावर परशुरामाने ठेविलें; त्यामुळे रेणुका अनार्य (aboriginal) झाली अशी दंतकथाहि आहे. तुळु देशांत कालीला एलम्मा म्हणतात व बहुतेक कालीमंदिरांत परशुरामाची मूर्ति असते. ह्या तुळु लोकांसंबंधानेहि चित्पावनांसारखीच आख्यायिका आहे. ते पूर्वी कोळी होते. परशुरामाने त्यांच्या जाळ्यांचें जानवें करून त्यांना घातलें व ब्राह्मण बनविलें. केरळपुराणावरून अम्मा म्हणजे पार्वती असें दिसतें.

---

१ ६९-७९. २ Original Inhabitants of India पृ.४६७.

ह्या सर्व दंतकथांवरून–निदान रेणुकेच्या व परशुरामाच्या संबंधांवरून–असें म्हणतां येईल की, रेणुकेचा परशुराम ही अगदी निराळी व्यक्ति असावी; अथवा द्रविड लोकांनी परशुरामाला आपल्याकडील बायको देऊन आत्मसात् केला असावा. द्रविड देशांतून चित्पावन वर आले हें जर ह्या कथांवरून सुचित करावयाचें असेल तर तें पटण्याइतका पुरावा नाही हें निश्चित.

सह्याद्रिखंडांत एके ठिकाणीं आर्यावर्ताहून चित्पावन परशुरामक्षेत्राला आल्याचा उल्लेख आहे; उदा.

अल्पदानसंतुष्टाश्चित्तपूता इति श्रुताः ।
आर्यावर्त्ता इति ख्याता आर्यावर्त्तादुपागताः ॥

सह्याद्रिखंडांत परस्परविरुद्ध अनेक गोष्टी आहेत. त्यांतलीच ही एक आहे. तथापि आर्यावर्त हें एक नांव चित्पावनांना वरील श्लोकांत लाविलेलें दिसतें. तिकडे अद्यापपर्यंत कोणाचें लक्ष गेलेलें दिसत नाही.

देशस्थ कोंकणांत येऊन राहिले त्यामुळे त्यांना कोंकणस्थ म्हणूं लागले. अर्थात् ते देशस्थांपैकीच आहेत ही समजूत भ्रामक आहे असें आम्हांस वाटतें. इतर सर्व ब्राह्मणांत मामेभावंडांत लग्नें होतात; फक्त चित्पावनांत होत नाहीत. चित्पावनांतील बाभ्रव्य व नित्युंदन हीं गोत्रें देशस्थांत नाहीत. ह्यावरून चित्पावनांचें मूळ अन्यत्र आहे असेंच म्हणावें लागेल. भार्गवब्राह्मणांत सुद्धा कौशिक, काश्यप, शांडिल्य, गौरआत्रेय हीं गोत्रें आहेत, परंतु बाभ्रव्य व नित्युंदन हीं गोत्रें नाहीत. भार्गवब्राह्मणांत मामे-आतेभावंडांत विवाहसंबंध होत नाहीत. तथापि एवढ्यावरून गोत्रें जुळत नसतांना भार्गवब्राह्मणांपैकी चित्पावन आहेत असें म्हणतां येणार

१ ना. मुनशी— तोंडी माहिती.

नाही. भार्गवब्राह्मण हे शैव आहेत व त्यांच्यांत चारी वेदांचे लोक आहेत.

चित्पावनांची भाषा आम्हीं दिली आहे तिच्यावरून अनुमानें काढणें तुलनात्मक अभ्यासाच्या अभावीं कठीण झालें आहे. भाषेच्या अनुरोधानें स्वतंत्र संशोधन करण्यास चांगलें क्षेत्र आहे.



# परिशिष्ट

मानरहितः स्वकार्ये पटुश्चतुर्दशजगत्प्रथितगोत्रः ।
मकरालयांतवासी प्रियभक्तश्चित्तपावनो भगवान् ॥

—विठोबाअण्णा दप्तरदार

§कोकणस्थाः कृशाः सूक्ष्मा दर्शनीयमनोरमाः ।
रक्तपीतसिता वर्णास्तेषामोदनभक्षणात् ॥
न कोकणस्थो न च यत्र पंचा
नासौ च पंचा न च यत्र स्वच्छता ॥
अयं पटो मे पितुरंगभूषणः
पितामहाद्यैरपि सेव्यमानः ।
सोऽयं मया कक्षपुटेन धार्यते
मत्पुत्रपौत्रानपि भूषयिष्यति ॥
चूतस्य बीजे मषिकां निधाय ते चार्कपत्रेषु लिखन्ति बालाः ।
तस्मात्तु रत्नाकरतीरवासिनां भवन्ति रम्याणि चाक्षराणि ॥
स्त्रीणां समाजोल्पतरोऽस्ति कोकणे नीराजनार्थं बहुसंकटा जनाः ।
भित्तौ च दीपं विनिधाय कीले कुर्वन्त्यधो वै शिरसो विकंपनम् ॥

---

§ हे श्लोक प्रो. पोतदार यांच्या संग्रहांतील 'कोकणस्थ समाचार' नामक १८ श्लोकांच्या हस्तलिखित पत्रांतून घेतले आहेत. श्लोक करणारा अज्ञात आहे.

